# मिस्-मेयो-खंडन.

"मदर इंडिया"स तर्कशुद्धविवेचनात्मक उत्तर.

श्रीयुत एस्. जी. वर्टी, एम्. ए.,

यांच्या सुप्रसिद्ध

"सिस्टर इंडिया"चें

भाषांतर.

सिस्टर इंडिया ऑफीस
चर्चगेट स्ट्रीट, फोर्ट,
मुंबई.

---

कि. रु. १-८-०

# प्रकाशकाचे दोन शब्द.



एक महिन्यापूर्वी आम्हीं " सिस्टर इंडिया " नांवाचें इंग्रजी पुस्तक प्रसिद्ध केलें. तें थोड्याच दिवसांत सबंध हिंदुस्थानभर वाखाणिलें जाऊन इतक्या झपाट्यानें खपत आहे कीं, लवकरच त्याची दुसरी आवृत्ति काढावी लागेल. इंग्लंड व अमेरिका या देशांतही निराळी आवृत्ति काढण्यासंबंधानें वाटाघाट चालू आहे. फ्रान्स, इटली, जर्मनी, व जपान या देशांतही त्या त्या भाषेंत भाषांतर प्रसिद्ध करण्याचे प्रयत्न चालू आहेत. अशा रीतीनें सर्व जगभर प्रसिद्ध होणाऱ्या या पुस्तकाचा मराठी वाचकांसही लाभ करून द्यावा, या हेतूनें हें मराठी भाषांतर आम्ही प्रसिद्ध करीत आहों. भाषांतर रा. रामकृष्ण विठ्ठल मतकरी यांनीं परिश्रमपूर्वक तयार करून दिलें, आणि कर्नाटक प्रेसचे मालक रा. कुळकर्णी यांनीं तें फार लवकर छापून काढलें, याबद्दल दोघांचे आम्ही फार आभारी आहोंत.

सिस्टर इंडिया ऑफीस,<br>
चर्चगेट स्ट्रीट, मुंबई,<br>
ता. १२ एप्रिल १९२८.

प्रकाशक.

---

# उपोद्घात.



' मिस्-मेयो-खंडन ' हें मिस् कॅथेराइन् मेयो नांवाच्या एका अमेरिकन बाईनें लिहिलेल्या 'मदर इंडिया'ला, ' सिस्टर इंडिया' म्हणून आम्ही लिहिलेल्या इंग्रजी उत्तराचें मराठी वाचकांच्या अभिरुचीस धरून भाषांतर आहे. 'सिस्टर इंडिया'— किंवा आतां मराठी स्वरूपांत 'मिस्-मेयो-खंडन'—हें अलीकडे याच विषयावर प्रसिद्ध झालेल्या कांहीं पुस्तकांप्रमाणें आणि लेखांप्रमाणें, निव्वळ उत्तरच आहे असें नाहीं; त्यांत याहून उच्च आणि विस्तृत अशी दृष्टि ठेवलेली आहे; ती ही कीं, आपल्या हिंदुस्थान देशाच्या सामाजिक आणि राजकीय अडचणी काय आहेत, त्यांचीं कारणें काय आहेत, याचें प्रत्यक्ष चित्र जनतेसमोर मांडून, त्याच्या शेजारीं, मिस् मेयोनें जगभर पसरलेले हिंदुस्थानासंबंधाचे निष्कर्ष ठेवावयाचे, आणि मग त्यांची काय किंमत ठरते हें पहावयाचें.

अशा तऱ्हेचें पुस्तक लिहितांना पाश्चात्य देशांतल्या—विशेषतः युनायटेड् किंगडम् आणि युनायटेड स्टेट्स्मधल्या—सामाजिक राहणीबद्दल व आचारविचारांबद्दल निंदाध्वनि काढण्याचा मोह अनावर होतो. कित्येक लेखकांनीं तर पाश्चात्य देशांचा यथास्थित खरपूस समाचार घेतला आहे, आणि मिस् मेयोच्या मायावी दुष्ट आघातांनीं संतापून जाऊन चिखलफेंक परत केली आहे; परंतु प्रस्तुत लेखकानें अशा तऱ्हेनें पाश्चात्य संस्थांवर आघात करावयाचें शक्य तों टाळलें आहे. परंतु कित्येकदां असे प्रसंग आल्याशिवाय राहत नाहींत, कीं ज्या ठिकाणीं वर्णन विशेष ठळकपणें ध्यानांत भरण्यासाठीं किंवा तें योग्य अशा भूमिकेंत बसविण्यासाठीं किंवा गैरसमज दूर करण्यासाठीं तुलनात्मक दृष्टीनें पाश्चात्य रीतीरिवाज विचारांत घ्यावेच लागतात.

या ठिकाणीं आम्हीं सर्व गोष्टी, एखाद्या सामान्य परंतु स्वाभिमानी हिंदी माणसास जशा दिसतात, आणि जशा त्या निःपक्षपात अशा जिज्ञासूलाहि दिसल्या पाहिजेत, तशा मांडलेल्या आहेत. परंतु इतक्या मर्यादेनें मांडलेलें राजकीय बाबींचें चित्रसुद्धां एका विशिष्ट वाचक वर्गास अनुदारपणाचें आणि अनावश्यक असें वाटण्याचा संभव आहे. त्यावर आम्हांला इतकेंच सांगावयाचें कीं, विज्ञत चाललेले निखारे चाळवले गेले असल्यास, आणि बऱ्याच काळापूर्वी मूठमाती देऊन आतां

निव्वळ पुस्तकी वादाचा विषय होऊन बसलेले प्रश्न पुनः उकरले गेले असल्यास, त्याची सर्व जबाबदारी मिस् मेयोवर येते. राजकारणांत आम्ही नेमस्त मताचे आहों; आम्ही हिंदुस्थानांतल्या ब्रिटिश राज्यावर कधींहि रोप केलेला नाहीं; इतकेंच नव्हे तर आम्हांला नेहमींच असें वाटत आलें आहे कीं, हिंदुस्थानाला ब्रिटिश अंमलाखालींच स्वराज्य मिळण्याची आशा आहे. यामुळें, ब्रिटिशांचा हिंदुस्थानांतील गत राज्यकारभाराचा इतिहास घेऊन त्यांतून कित्येक भूषणावह नसलेले भाग काढून पुढें मांडतांना आम्हांला फार दुःख झालें आहे!

परंतु आतांशा ब्रिटिश मुत्सद्यांची हिंदुस्थानाला असें सांगण्याची जणूं वहिवाटच पडून गेली आहे कीं, 'तुम्ही जिंकलेले लोक आहां,' तुम्ही परक्यांचे ताबेदार आहां,' 'तुम्हांला ब्रिटिश लोक ठेवतील तसेंच तुम्ही राहिलें पाहिजे!! शिवाय असेंहि आणखी अवास्तवपणें सांगण्यांत येत असतें कीं, हिंदुस्थानाला ब्रिटिश राज्यानें अराजकतेंतून सोडविलें; आणि असेंहि कोणी कोणी म्हणतात कीं, ब्रिटिश गेले तर हिंदुस्थानांत पुनः अराजकता माजेल! ही सर्व मतें मोठ्या कुशलतेनें त्या अमेरिकन बाईनें 'मदर इंडिया'त ग्रथित केलेली आहेत. अर्थात् त्या पुस्तकांतली असत्य, अर्ध-सत्य, अशीं सर्व प्रकारची विधानें चव्हाट्यावर आणून उडवून देण्याकरितां, तो सगळा प्रश्नच त्याच्या ऐतिहासिक भागासह देणें जरूर वाटलें.

असल्या या विवेचनांत थोडीबहुत संतप्तता उत्पन्न होणें अपरिहार्य आहे. अंतःकरणावर विशेष परिणाम होऊन लिहूं लागलें म्हणजे ही संतप्तता टाळणें सोपें नाहीं; आणि असल्या या गोष्टींत कोणाच्या मनास चटका बसल्याशिवाय राहील? हिंदुस्थानांतली सर्व पुरुषजात आणि स्त्रीजात हास्यविषय करून टेविली जात असतां, हिंदी लोकांच्या गतकालाची आणि चालू परिस्थितीची बेदरकारपणानें निंदा चालविली असता, अखिल हिंदु मानववंश पृथ्वीच्या पाठीवरून लवकरच साफ नष्ट होऊन जाईल तर बरें, अशी अंतःकरणपूर्वक इच्छा प्रदर्शित केली जात असतांना, कोण स्वाभिमानी हिंदी इसम दंड ठोकून उभा राहणार नाहीं? परंतु एकंदरींत वाचकांस असेंच दिसून येईल कीं, प्रस्तुत लेखकानें जाणूनबुजून वाजवीपेक्षां जास्त असा आवेश मुळींच दाखविलेला नाहीं.

मिस् मेयोनें आपल्या पुस्तकांत हिंदी स्त्रियांसंबंधानें अनन्वित विधानें केलेलीं आहेत. त्यांना उत्तर म्हणून या पुस्तकांत स्त्रियांचा दर्जा, स्त्रियांचें महत्व, स्त्रियांचें

कौटुंबिक आणि सामाजिक कार्य, इत्यादि मुद्यांचा सविस्तर विचार केलेला आहे. त्याचा आमच्या भगिनींना बराच उपयोग होईल अशी आशा आहे.

महात्मा गांधी आणि रवींद्रनाथ टागोर या दोन जगद्विख्यात हिंदु पुत्रांची मिस् मेयोनें नालस्ती केली आहे. त्यासंबंधानें व सगळ्या पुस्तकासंबंधानेंच त्या दोघांनींहि आपले विचार थोडक्यांत व्यक्त केले आहेत. ते बहुमोल म्हणून पुस्तकाच्या शेवटीं परिशिष्टें घालून जोडलेले आहेत.

ग्रंथकर्ता.



# अनुक्रमणिका.

# प्रस्तावना.



मिस मेयोचें 'मदर इंडिया' जेव्हां रॉयल एशिआटिक सोसायटी लायब्ररीच्या मुंबई शाखेकडे प्रथम आलें, तेव्हां तेथल्या ग्रंथालयाधिकाऱ्यांच्या अनुभवी नजरेस त्यांच्यांत वाचकांस उपयुक्त असें कांहींच दिसेना. हे ग्रंथालयाधिकारी कोणी जुन्या हिंदु परंपरेस चिकटून बसलेले नसून, खुद्द स्वतःच्या राहणींत सामाजिकसुधारणा घडवून आणलेले गृहस्थ आहेत. अशा गृहस्थांस सदरहू पुस्तक निव्वळ घाणीनें बरबटलेलें, चिखलफेकीनें लडबडलेलें, आणि सत्यवादिता आणि सभ्यता यांची यत्किंचितहि जाणीव न ठेवितां लाथाळी चालविलेलें असें आढळलें; म्हणून त्यांनीं तावडतोब त्याची ग्रंथालयाच्या बाहेर हकालपट्टी केली.

परंतु त्याच या पुस्तकाचें पाश्चिमात्य देशांत कसें निराळ्याच तऱ्हेनें स्वागत झालें पहा! इंग्लंड व अमेरिका देशांत त्याच्या लाखों कोडों प्रति खपून लेखक आणि प्रकाशक यांनीं खोऱ्यांवारी पैसा ओढला. वृत्तपत्रांत त्याजवर चांगले अनुकूल अभिप्राय आले, आणि ही लेखिका म्हणजे केवढी महान् दिव्यदृष्टि सत्यान्वेषी देवता अवतरली आहे असा तिचा उदो उदो झाला।

**रात्र पडे हिंदभूवरी। सत्तत्वें निमालीं निविडांधकारीं।**
**देव म्हणे ' मेयो निशाचरी। येवो,' सत्वरि उजाडलें !! ॥**

असो. या मिस् मेयोनें सांगितलेल्या गोष्टी आणि काढलेले प्रलाप सत्यकोटींतले समजूं नका, अशी हिंदभूमीची आणि हिंदी लोकांची कैक वर्षांची माहिती असलेल्या अनेक इंग्रज लोकांनीं इंग्रज वाचकांस समजून सांगितलें. आणि त्याचा चांगला परिणामहि होऊन मिस् मेयो म्हणजे सर्वथैव विश्वसनीय लेखिका नव्हे, हें पुष्कळ इंग्रज लोकांस कळून चुकलें. पण हे निषेधपर बोल कांहीं 'आंतरःकोपि हेतुः' लोकांच्या आड येतातसें दिसूं लागतांच लवकरच दाबून गप्प पाडण्यांत आले. हिंदभू आणि हिंदी लोक यांचें नांव बद्दू करण्याच्या कटांत वृत्तपत्रकारहि सामील होऊन ते नाण्याची दुसरी सोनेरी बाजू दाखवावयास इतःपर धावच देईनासे झाले. वृत्तपत्रीय सचोटीचें उदाहरण म्हणून मानलें

जाणारें लंडन टाइम्स; पण त्यानें देखील हिंदुस्थान सरकारचे माजी कायदे-प्रधान सर तेजबहादुर सप्रू, विलायतेंतल्या हिंदी कौन्सिलचे सभासद डॉ. रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे, आणि विलायतेंत हिंदुस्थानच्या हितरक्षणार्थ नेमिलेले हाय कमिशनर सर अतुलचंद्र चतर्जी, यांच्यासारख्या जबाबदार पुढाऱ्यांच्या मुद्देशीर व सौम्य शब्दांत मांडलेल्या उत्तरास स्थळ द्यावयाचें नाकारलें.

अशा तऱ्हेनें मिस् मेयोच्या अनुमानांना आणि निकालांना इंग्लंडसारख्या निर्बंधरहित देशांतहि सर्वतोमुखीं पसंति मिळाली, प्रतिपक्षीयांची जबाबदारीनें दाखविलेली बाजू राष्ट्रीय म्हणविणारीं वृत्तपत्रें जणूं काय युद्धच चालू असल्या-सारखें दाबून दावून टाकूं लागलीं, थोरांतले थोर हिंदी पुढारी बोलूं लागले असतां कान बंद करून घेण्यांत येऊं लागले; यावरून आपण काय तात्पर्य काढावयाचें ? इंग्लंडला आपलें हिंदुस्थानशीं युद्ध चालू आहे असें वाटलें होतें काय ?—म्हणून ह्या त्याच्या वृत्तपत्रांनीं आपलें अखिल राष्ट्रीय बळ हिंदुस्थानास विरोध करण्याकरितां एकजूट राहिलें पाहिजे अशा जणूं खबरदारीनें, हिंदुस्था-नचा पक्षच सपशेल दाबून टाकला ! एरवीं त्यांच्या ह्या वृत्तीचें समर्थन कसें करावयाचें ?

परंतु एवढीच काय ती उद्वेग आणणारी गोष्ट इंग्लंड देशांत, आणि अमेरिका धरून सर्व साधारण पाश्चिमात्य देशांत, आहे असें नाहीं. मिस् मेयोच्या चोपड्या-सारखें घाणेरडें, अश्लील चोपडें वाचण्यांत आनंद मानणाऱ्या तिकडील हजारों लोकांची दिसून येणारी अभिरुचि, आणि असल्या पावित्र्याची होळी करणाऱ्या ग्रंथनाचा सार्वत्रिक होणारा उदो उदो, यांवरूनच पाश्चिमात्य समाजाची मानसिक अधोगति कोणत्या थराला पोंचलेली आहे हें सिद्ध होतें, त्यासाठीं दुसरा पुरावा नको. याहून वरच्या दर्जाच्या गोष्टींची त्यांच्या मनाला चवच लागत नाहीं, असें वाटतें. त्यांची नीतिमत्तेची कल्पना इतकी खालच्या पायरीवर गेली आहे कीं, केवळ मिळेल तें खळबळ उडवून देणारें वर्तमान आणि पिकतील त्या गलिच्छ कंड्या यांवरच त्यांचें मन मुद्दाम चरत राहतें. असेंहि ऐकण्यांत येतें कीं, बहुतेक इंग्रज व अमेरिकन वाचकवर्गांत, त्यांतल्या त्यांत स्त्रियांत, घटस्फोटाच्या फिर्यादी, नीति-च्युततेचें वर्तमान, आणि समाजांतील घाणेरड्या कंड्या, ह्याच वाचण्याची विशेष आवड उत्पन्न झालेली आहे, दुसरें कांहीं बहुधा ते वाचीतच नाहींत. इंग्रज वाचकांची अभिरुची इतकी खालावलेली असेल हें आम्हांस आज दिवसपर्यंत पटतहि नव्हतें, पण आतां 'मदर इंडिया'च्या इंग्लंड आणि अमेरिका देशांत

झालेल्या स्वागताची हकीकत वाचून पद्द लागले आहे. ही अभिरुचि हेंच या देशांच्या मानसिक आणि नैतिक अधःपाताचें प्रमाण म्हणून आम्हीं समजतों.

प्रसिद्ध इतिहासकार मि. लेकी यांनीं आपल्या 'युरोपखंडांतील बुद्धिवादाचा इतिहास' नामक पुस्तकाच्या प्रस्तावनेंत एक सुरेख विचार प्रगट केला आहे. ते म्हणतात कीं, "एखादें मत यशस्वी होणें न होणें, हें त्याजवरील युक्तिवादाच्या बळाबळावर किंवा तें प्रचार करणाऱ्या लायकीवर इतकेंसें अवलंबून नसून, तें मत ग्रहण करण्याकडे समाजाचा कितपत कल आहे त्यावर अवलंबून असतें." आणि तो कल लेकीसाहेब सांगतात कीं, बुद्धीची त्या कालीं जी जात असेल तिजवर अवलंबून असतो. इंग्रजांनीं आणि अमेरिकनांनीं ज्या अर्थी मिस् मेयोनें वाढलेले भिकार पदार्थ मटामट गिळंकृत करण्यापर्यंत आपलें बुद्धिलौल्य वाढवीत आणलें आहे, त्या अर्थी त्यांच्या बुद्धीची आज कोणती जात आहे याची सहजच कल्पना होते. ती इंग्रजांनीं आणि अमेरिकनांनीं अंतर्मुख दृष्टी करून मनाशीं पटवून घ्यावी म्हणजे झालें.

मोर्ले साहेबांचा 'तडजोड' ग्रंथ पहिल्यांदा प्रसिद्ध झाला त्यास आज कित्येक वर्षे होत आलीं. त्या ग्रंथांत ते हळहळून म्हणतात कीं, ब्रिटिश प्रजासत्तेला ज्यांनीं गत कालांत चैतन्य देऊन सळपळून सोडलें तीं दास्यविमोचन, धार्मिक समता, वगैरे मानवजातीच्या कल्याणाचीं मोठमोठीं कार्यें, साध्य होऊन गेल्यामुळें, ब्रिटिश लोकांस आतां उच्च ध्येय म्हणून कांहीं शिल्लक राहिलेलें नाहीं, यामुळें ते खालावत जातील कीं काय अशी भीति वाटत आहे. ही मोर्ले साहेबांची भीति आज खरी ठरली म्हणावयाची काय? रिकाम्या सुताराप्रमाणें ब्रिटिश लोकांनीं स्वतःवरच हात चालवून, आपली मनोभूमिका उच्च ध्येयें आणि औदार्यबुद्धि वाढविण्यास कमताकद, इतकेंच नव्हे तर हलके विचार आणि हलकी अभिरुचि रुजेल इतकी सुगभुशीत, करीत आणिली आहे काय! असो.

मिस् मेयोच्या या पुस्तकाचा मुख्य उद्देश राजकीय आहे हें निर्विवाद होय. एरवीं, आपणास एक निःपक्षपाती निर्हेतुक प्रेक्षक म्हणून समजा अथवा तिनें मिळेल तिथे जो आग्रह धरला आहे तो धरण्याचें तिला कारण नव्हतें. आपण अमेरिकन आहों याचा तर तिनें मोठाच बाऊ करून दाखविला आहे—जणूं काय असल्या सिरासिरांत पुरस्काराइतकें कोणाला दिसतच नाहीं! तिचा उद्देश जर राजकीय नम्रता, आणि तिचें अंतःकरण जर खरोखरीच मनुष्यमात्राच्या हितबुद्धीनें भरलेलें असल्यामुळें हिंदुलोकांच्या सामाजिक अन्यायांनीं होरपळणाऱ्या जीवांसाठीं करुणेनें

कळवळत होतें, तर तिला हिंदुस्थानच्या प्रचलित राजकारणावर चर्चा करण्याची काय जरूर होती ?

ज्या काय सामाजिक चालीरीति राष्ट्रोन्नतीच्या आड येत असतील, त्यांजकडेच तेवढें आपल्या विशिष्ट लेखनशैलीनें आणि रंगभरित लेखनपद्धतीनें लोकांचें लक्ष वेधून तिचें काम भागलें असतें. पण तिला ह्या दुष्ट चालीरीति अशासाठीं दाखवावयाच्या होत्या कीं, त्यामुळें हिंदी लोक जगाच्या दृष्टीनें साफच हलके म्हणून ठरावे, जणूं काय पाश्चात्य समाज या पापांना सोवळाच होऊन बसला आहे ! तिच्या मनांत हिंदुसमाजाबद्दल सद्बुद्धि नाहीं हें अगदीं निःसंशय होय. तिचे हे सामाजिक चालीरीतींवरील हल्ले त्यांच्या राजकीय आकांक्षा छिन्नभिन्न करून टाकण्याचें साधन म्हणून आहेत.

तिच्या ह्या पुस्तकाचा हेतु केवळ एकच, म्हणजे हिंदुस्तानांतल्या ब्रिटिश राज्याचें समर्थन करण्याचा. ब्रिटिश राज्यव्यवस्थेच्या तर्फेची ती एक भली मोठी कैफियतच होय. पण एवढेंच तिचें स्वरूप असतें तर शब्द काढावयास फारशी जागा नव्हती. कारण असलीं अनेक पुस्तकें मागें बाहेर पडलीं आहेत, आज पडत आहेत, आणि पुढेंहि पडतील. त्यांच्याकरवीं दुसरी बाजू कळत असल्यानें तीं प्रसिद्ध झाल्याबद्दल वाईट वाटण्याचें कारण नसतें. पण मिस मेयोचें पुस्तक म्हणजे अगदीं अजीबाद निराळ्या वर्गांत मोडतें. तें लबाडीचें पुस्तक आहे. सामाजिक दुराचारांची चर्चा करण्याच्या मिषानें, हळूच नकळत राजकीय प्रगतीच्या आशेवर काळें फांसण्याचा हा तिचा यत्न आहे.

ब्रिटिश अधिकारी म्हणजे तिला हिंदुस्थानची मुक्तता करण्याकरितां जणुं देवानें पाठविलेला दूत—हिंदुस्थानच्या कल्याणाकरितां रात्रंदिवस तळमळत राहून स्वयंस्फूर्तीनें देह झिजविणारा हुतात्मा—वाटतो; पण मरेपर्यंत सर्व सुखाची होळी करून राहिलेले शूर वीर महान् हिंदी देशभक्त पुढारी, हे मात्र कोणी तरी यःकश्चित् प्राणी, निष्फळ वटवटे वायु, बेजबाबदार टीकाकार, नालायक कमकुवत जीव, निष्फळ स्वार्थापलीकडे अज्ञ जनतेच्या हिताची कल्पनाही कधीं शिवत नसलेले, असे दिसतात.

खरें, ही आपली मतें तिनें प्रामाणिकपणानें आणि उघड्या अंतःकरणानें व्यक्त केलीं आहेत काय ? नाहीं. उलट तीं तशीं व्यक्त न व्हावीं म्हणून तिची खटपट आहे. परंतु एखाद्या कावेबाज कारागिराची हिकमत लढवून, तिनें मांडलेल-

तेथें जवळ जवळ दर एक पृष्ठावर असें भासविण्याचा प्रयत्न केला आहे कीं, हिंदुस्थानास जें जें कांहीं यत्किंचितहि चांगलें म्हणून प्राप्त झालें आहे तें ब्रिटिश अधिकाऱ्याच्या हातून, आणि जें जें वाईट म्हणून आहे तें एक तर सामाजिक चालीरीतीचा परिणाम, नाहीं तर हिंदी राष्ट्राचा राजकीय दर्जा वाढविण्याकरितां हिंदी पुढाऱ्यांनीं केलेल्या खटपटीचा दुष्परिणाम, होय.

तिला सदरहू पुस्तक लिहावयास "कोणीहि सांगितलेलें नाहीं" असें लोकांनीं मानावेंसें तिला वाटतें. ती मुद्दाम विशेष जोर देऊन सांगत आहे कीं, आपण "कोणी नसत्या गोष्टींत हात घालणारी रिकामटेकडी नव्हे, किंवा एखादी राजकारणी दूतही नव्हे, तर आपण केवळ एक सामान्य अमेरिकन नागरिक असून आपल्या स्वतःच्या राष्ट्रासमोर तत्वदर्शक गोष्टी मांडतां याव्या म्हणून त्या शोधावयास येथें आलेली आहें." असल्या गप्पांवर कोणी भोळे असतील तेच काय ते विश्वास ठेवतील. पुस्तकाचा अंतर्गत पुरावा, पुस्तक-प्रसिद्धीनंतरची तिची स्वतःची वागणूक, आणि पुस्तक पाहून ब्रिटिश लोकांना आलेला उल्हास, या सर्व गोष्टी तिचें हें म्हणणें साफ खोटें पाडीत आहेत.

सगळ्या हिंदुस्थान देशाची अगदीं पक्की खात्री झालेली आहे कीं, तिनें हा विडा स्वयंस्फूर्तीनें उचललेला नाहीं. कोणीहि खरेंखुरें अमेरिकन रक्त अंगांत खेळणारी आणि युनायटेड स्टेटसच्या मोकळ्या हवेंत वाढलेली स्त्री स्वतःच्या स्फूर्तीनें उठून, हिंदु मानववंशास काळें फांसून अंगावर शहारे आणणाऱ्या भयंकर स्वरूपांत जगासमोर उभा करण्याचें आगलावें कार्य पत्करून, हिंदुस्थानच्या वाटेस निघेल, अशी मुळीं कल्पनाच करवत नाहीं. ही स्फूर्ति आणि ही लालूच बाहेरून आलेली आहे. गेल्या महायुद्धांत कित्येक ब्रिटिशांकडून जर्मनांबद्दल काय काय खोट्या कंड्या पिकविल्या गेल्या हें ज्यांना स्मरत असेल त्यांना या सर्व प्रयत्नांच्या मुळाशीं कोण आहे त्याची सहज कल्पना होईल.

बायबलांत अशी गोष्ट आहे कीं, मनुष्यजातीचीं पहिलीं मातापितरें प्रथम स्वर्गांत सुखानें राहत होतीं, पुढें त्यांच्या मनांत दुर्बुद्धि घालून त्यांना खालीं पृथ्वीवर दुःखांत ढकलण्यांत आलें. ही दुर्बुद्धि त्यांच्यांत घालावी असा ठराव सभेंत बिएल्झेबब नामक पतित देवदूतानें आणला खरा, पण मिल्टन् कवि सांगतात कीं, "त्या ठरावाची मूळ कल्पना काढणारा आणि अर्धा अधिक मसलत देणारा सैतानच होय;" कारण, ते म्हणतातः "एका विषारी मुळीनें अखिल

मानव जातीचा समूळ नाश करण्याइतका दीर्घद्वेष जगतांतील पापाचें आदिकारण जो सैतान त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणाच्या ठायीं उद्भवेल बरें ?" मिस मेयोनें जें फिलिपाइन् बेटांसंबंधानें " भयोत्पादक बेटें " नांवाचें पुस्तक लिहिलें आहे, तेंच, तशा तऱ्हेचें हिंदुस्थानासंबंधानेंहि पुस्तक लिहावयाचें काम तिजकडे सोंपवावयास शिफारसवजा उपयोगीं पडलें असावेंसें वाटतें.

'मदर इंडिया 'ला आम्ही वर लबाडीचें पुस्तक म्हटलेलें आहे, आणि लबाडीचें म्हणावयास कारण असें दिलें आहे कीं, निःस्वार्थ बुद्धीनें सामाजिक दुराचार दाखविण्याच्या मिषानें तिनें हिंदी राजकारणी पुरुषांवर प्रच्छन्नपणें नीचपणाचे हल्ले चढवून त्यांच्या आकांक्षांना विरोध केलेला आहे. तिनें आपलें हें पुस्तक जर 'राजकीय' म्हणून लिहिलें असतें, तर मग तिचीं मतें कांहींहि असोत, तिला आम्ही प्रामाणिक म्हटलें असतें. उदाहरणार्थ, बहुतेक हिंदी लोक सर मायकेल ओडवायर आणि लॉर्ड सिडन्हॅम यांना हिंदुस्थानचे हितशत्रु समजतात. परंतु त्यांचीं जीं काय मतें आहेत तीं सरळ आणि स्पष्ट आहेत, म्हणून त्यांजवर अप्रामाणिकतेचा आरोप येऊं शकत नाहीं. त्यांच्याशीं युक्तिवाद करतां येईल, कारण त्यांच्या मुद्यांत युक्तिवादास वाव असतो.

तसेंच राजकारणास मध्यें न ओढतां जर नुसतें सामाजिक म्हणून मिस् मेयोनें आपलें पुस्तक लिहिलें असतें तर मग तीं कितीहि का विद्रूप चित्र काढतीना आम्ही तिची दृष्टि चुकली एवढेंच म्हटलें असतें पण तिचा प्रामाणिकपणा कबूल केला असता. परंतु तिनें त्या सामाजिक गोष्टी मारून मुटकून भलतीकडे राजकारणांत वळविल्याबरोबर, तिचा खराखुरा हेतु तावडतोब बाहेर आला आहे. वरून सामाजिक प्रश्नांची चर्चा चालवून, आंतून राजकारणाचें विष तिला वाचकांच्या मनांत भिनवून टाकावयाचें आहे. तिनें आपलें धाईटांतलें धाईट कार्य प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें कल्पना सूचित करून घडवून आणलें आहे. त्यामुळें सर्वथैव दिशाभूल होते, आणि जर गैरसमज करून घेण्याइतकी अगोदरच मनःप्रवृत्ति तयार होऊन राहिली असेल तर मग वाचकांवर केवढा परिणाम होतो याची कल्पनाच करणें बरें.

ही जी तिचीं विशिष्ट मतें आणि राजकारणी गरळ येंद्रुन टोंपून भरल्याप्रमाणें धरून गोवण्याची कार्यसाधनाची कावगारी पद्धत, तीच अत्यंत किळसवाणी होय. वाचक येणाऱ्यानें वाचीत जातो, त्याला वाटत असतें की तिचें सामाजिक

दुराचारासंबंधानें व्याख्यान चाललें आहे, पण इकडे हलुहलु त्याचें भानहि नसतां त्यावर तिचें राजकारणी विष खेळत चाललेलें असतें. वाचकास जर अगोदर कळेल कीं, ती अमुक एक मत आपणावर लादूं इच्छित आहे, तर तो तिचे मुद्दे पाहून आपल्या मनांत तिच्या मताची शहानिशा करील. पण ही मनःक्रिया त्याला करूंच दिली जात नाहीं.

पण ही तिच्या अप्रामाणिकतेची फक्त एक बाजू झाली. आणखी दुसरी एक सांगण्यासारखी बाजू आहे. तिनें गांधी आणि रवींद्रनाथ टागोर यांनीं न म्हटलेल्या गोष्टी म्हटल्यासारख्या दाखविल्या आहेत, आणि खरोखरी म्हटलेल्यांचा भलताच विपर्यास केला आहे, हें आतां निर्विवाद सिद्ध आहे. हिंदभूमीच्या या दोघांहि सुपुत्रांनीं तिला उत्तर देऊन तिच्या चुका तिच्या गळीं उतरविल्या आहेत आणि आपल्या लेखनाचा* तिनें मन मानेल तसा उपयोग केल्याबद्दल संतापहि व्यक्त केला आहे. ह्या गृहस्थांबद्दल जो हा मिस् मेयोनें विपर्यास केला, तो कां बरें? त्यांच्या कीर्तीस कलंक लावण्यासाठीं, कीं स्वतःचा राजकीय हेतु साध्य करून घेण्यासाठीं, कीं निव्वळ भूलचुकीनें? कसेंहि का असेना, पण तिच्या नजरेस चूक आणल्यानंतर तरी तिनें या गृहस्थांची क्षमा मागावयाची नव्हती काय? कारण ह्या कोणी सामान्य व्यक्ती आहेत असें नसून, त्यांची आज त्रिखंड कीर्ति गाजत आहे, जगांत ते कायमचे थोर पुरुष म्हणून राहणार आहेत. त्यांची क्षमा मिस् मेयोनें मागितली काय? नाहीं. यावरून काय सिद्ध होतें? निःसंशय हेंच कीं, हिंदुस्थानांत येण्यांत तिची मुळींच सदिच्छा नव्हती. तिचा हेतु डॉ. टागोरनीं म्हटल्याप्रमाणें हिंदुस्थानास खाली पहावयास लावण्याचा होता, आणि तिची निस्वार्थीपणाची, निःपक्षपातीपणाची वगैरेंची जाहिरात सब झूट होती. जातां जातां एक आश्चर्यकारक गोष्ट म्हणून नमूद करावयाची ती ही कीं, इंग्लंड किंवा अमेरिका देशांतील एकाहि वर्तमानपत्रानें, इतर बाबतींत तिजवर बरीच टीका केली असली तरी गांधी व टागोर यांच्या विधानांचा जो तिनें जाणूनबुजून नीचपणानें विपर्यास केला त्याबद्दल तिची छीः थूः करावयाची ती केलेली नाहीं. असो.

गांधी आणि टागोर हींच काय तीं मिस मेयोनें केलेल्या विपर्यासाचीं आणि त्यांच्या लेखनाचा यथेच्छ दुरुपयोग केल्याचीं उदाहरणें आहेत असें नाहीं. हीं

---

* परिशिष्ट १ आणि २ पहा. विपर्यस्त विधानांचा विचार १२ व्या प्रकरणांत केला आहे.

काय बोलावयाचें ? काढ, बाई मेयो, तूं आपल्या कुजक्या कल्पनाशक्तींतून नागडीं उघडीं चित्रें काढ; तुझी सर्व कला ओतून तीं खऱ्याखुऱ्या माणसांसारखीं बनव; आणि हें पहा हिंदुस्थानचें हुबेहुब चित्र म्हणून तीं आपल्या पश्चिमदेशीयांना दाखीव. असल्या चित्रांना आज अधम अभिरुचि संपादन करून बसलेल्या तुझ्या पश्चिमेंत, गाड्यावारी ग्राहक मिळतील यांत संशय नाहीं !

मूळ चित्राला वेडेंविद्रें स्वरूप दिल्यानें जवळ जवळ सर्वस्व नाश व्हावयाची कशी पाळी येते हें नुकत्याच दिवंगत झालेल्या टॉमस हार्डी या सुप्रसिद्ध इंग्रज ग्रंथकारानें आपल्या ' लाउडिशिअन् ' नामक कादंबरींत मोठ्या कुशलतेनें वर्णिलें आहे. पण मिस मेयोनें ध्यानांत धरण्यासारखी गोष्ट ही कीं, त्या दैववादी टामस हार्डीनासुद्धां तसल्या त्या चित्राचा परिणाम खरोखरच सर्वनाशांत झाला असें दाखववेना. म्हणून त्यांनीं, ऐन वेळीं गुपित बाहेर आलें आणि सर्व लबाडी समजून येऊन शेवट यथास्थित झाला असें दाखविलें आहे.

' मदर इंडिया 'च्या शेवटच्या प्रकरणांत मिस मेयो अगदीं खात्रीपूर्वक म्हणून सांगते कीं, आपण ज्या काय गोष्टी नमूद केल्या आहेत, त्या तशा आज या क्षणीं हिंदुस्थानांत घडत आहेत. आणि त्यावर जणुं काय आव्हानच दिल्याप्रमाणें ती म्हणते कीं, " नुसतें नाहीं म्हणणें सोपें, पण विधानें खपशेल, नव्हे, यत्किंचितहि खोटीं पाडणें फार कठीण आहे." पण जो गोष्ट मुळीं सिद्धच झालेली नाहीं, तिचा खोटेपणा दाखवावयाचा म्हणजे काय ? गोष्ट मुळीं खरी आहे हें तर पहिल्यानें सिद्ध झालें पाहिजे, मग ती खोटी पाडावयाचा प्रश्न. तुम्ही आधीं तुमचा काय तो पुरावा आणून गोष्ट खरी आहे हें सिद्ध केलें पाहिजे. उगाच कांहीं तरी बाजारगप्पा ऐकून आणि अगोदरच कसल्या तरी खोट्यानाट्या कल्पनांचें जाळें मनांत पसरून तुम्ही बोलूं लागलां तर तुमचें म्हणणें खोटें पाडावयाचें म्हणजे काय करावयाचें ? " अशी गोष्ट तुम्हो म्हणतां ती नाहीं " एवढेंच काय तें लोकांना म्हणतां येईल. समजा कीं उद्यां एखादा टवाळ लेखक उठला आणि म्हणत सुटला कीं, ' बहुतेक अमेरिकन अविवाहित स्त्रिया खटियम सोडून इतर मार्गांनीं मौज मारीत असतात; खोडा हें माझें विधान !' तर तुम्हांला तें खोडतां येईल काय ? खोडतां येणें मुळीं शक्य तरी आहे काय ? आतां दुसरें उदाहरण घेऊं. समजा, एखादा हिंदी गृहस्थ इंग्लंडमध्यें गेला आणि त्यानें तेथील सामाजिक परिस्थितीचीं आणि स्त्री-पुरुषविषयक संबंधाची आपल्या समजुतीप्रमाणें चौकशी म्हणून

दोन आम्हांला माहीत झाली आहेत याचें कारण हे दोन पुरुष अत्यंत श्रेष्ठ असून शिवाय त्यांनी तिला उत्तर दिलेलें आहे. पण इतर शेंकडों लोकांसंबंधानें तिनें तसेंच केलें आहे. त्यांपैकीं थोड्याशाच लोकांचीं तिनें नांवें दिलेलीं आहेत, आणि त्यांच्यापैकीं कांहीजण तिनें त्यांच्या तोंडीं घातलेल्या मतांचा आणि विधानांचा इनकारहि करून बसलेले आहेत. राहिलेले अनेक लोक, ज्यांचीं नांवें दिलेलीं नाहींत पण मतें जशीच्या तशीं किंवा फिरवून दिलेलीं आहेत, त्यांजबद्दल खात्रीपूर्वक कांहींच सांगतां येणार नाहीं. परंतु अगदीं अथपासून इतिपर्यंत तिनें या पद्धतीचा खरें खोटें पार गुंडाळून ठेवून मन मानेल तसा उपयोग केलेला आहे, हें मात्र चांगलीं सबळ कारणें देऊन दाखवितां येईल.

पण या सगळ्याचा अझून कळस तर पुढेंच आहे. इतका तिचा उघड उघड लबाडीचा हेतु असून, पुनः बेशरमपणें ती आपल्या पुस्तकांत एखाद्या निरपराध माणसावर आळ घेतल्याचा आव आणून म्हणतेः—

" हें अवजड कार्य शिरावर घेऊन पार पाडीत असतांना मला काय काय सोसून घ्यावें लागेल याची मला पूर्ण जाणीव आहे. कित्येक मजवर संतापतील; कित्येक मजवर घाण उकरण्याचा आरोप करतील; अन्याय केला आहे असें म्हणतील; मला भौतिक सुखास लालचावलेली, सहानुभूतिशून्य, कदाचित् लबाड असेंहि, कदाचित् घाणेरड्या वैषयिक गोष्टींत रमणारी असेंसुद्धां, म्हणतील. परंतु परिस्थिति आणि तिजमधील परस्परविषयक संबंध प्रत्यक्ष पाहिला असतां आणि त्यांचें चित्र उभें करण्याची संधि मिळाली असतां, अनिष्ट परिणाम ओढून आणण्याबद्दल व्यक्तिशः वाटत असलेली नाखुशी तशीच चालूं देण्याचा आपला हक्क नाहींसा होतोसें मला वाटतें. " अरेरे ! सत्याकरितां प्राण वेंचणाऱ्याच्या तोंडीं शोभणारे शब्द ! पण मिस मेयोच्या तोंडीं किती विद्रूप दिसताहेत हे !

पण आश्चर्य असें कीं, चांगल्या चव्हाट्यावर तिच्या लबाड्या उघड्या करून मांडल्यावरहि पुनः तिचा फाजीलपणा शिल्लक आहेच. एका मुलाखतींत तिनें, काय हा आपल्यावर विनाकारण निंदेचा वर्षाव चालला आहे अशी तक्रार केली आहे—आणि दुसऱ्यांवर यथास्थित तोंडसुख घेऊन वाटेल तशा बेलाशक खोट्या गोष्टी रचून अपराधी ठरलेली आहे आपणच ! हिंदुसमाजावरील बुरखा काढून त्यास जगासमोर उघडाबोडका करणारी पहिली आपण, अशी फुशारकी 'लिबर्टी' पत्रांतून मारतांना तिच्या मनास लज्जेचा लवलेशही शिवला नाहीं, मग

काय बोलावयाचें ? काढ, बाई मेयो, तूं आपल्या कुजक्या कल्पनाशक्तींतून नागडीं उघडीं चित्रें काढ; तुझी सर्व कला उधळून तीं खऱ्याखुऱ्या माणसांसारखीं बनव; आणि हें पहा हिंदुस्थानचें हुबेहुब चित्र म्हणून तीं आपल्या पश्चिमदेशीयांना दाखीव. असल्या चित्रांना आज अधम अभिरुचि संपादन करून बसलेल्या तुझ्या पश्चिमेंत, गाड्यावारी ग्राहक मिळतील यांत संशय नाहीं !

मूळ चित्राला वेडेंविद्रें स्वरूप दिल्यानें जवळ जवळ सर्वस्व नाश व्हावयाची कशी पाळी येते हें नुकत्याच दिवंगत झालेल्या टॉमस हार्डी या सुप्रसिद्ध इंग्रज ग्रंथकारानें आपल्या ' लाउडिसिअन् ' नामक कादंबरींत मोठ्या कुशलतेनें वर्णिलें आहे. पण मिस मेयोनें ध्यानांत धरण्यासारखी गोष्ट ही कीं, त्या दैवधादी टामस हार्डीनासुद्धां तसल्या त्या चित्राचा परिणाम खरोखरच सर्वनाशांत झाला असें दाखववेना. म्हणून त्यांनीं, ऐन वेळीं गुपित बाहेर आलें आणि सर्व लबाडी समजून येऊन शेवट यथास्थित झाला असें दाखविलें आहे.

' मदर इंडिया 'च्या शेवटच्या प्रकरणांत मिस मेयो अगदीं खात्रीपूर्वक म्हणून सांगते कीं, आपण ज्या काय गोष्टी नमूद केल्या आहेत, त्या तशा आज या क्षणीं हिंदुस्थानांत घडत आहेत. आणि त्यावर जणुं काय आव्हानच दिल्याप्रमाणें ती म्हणते कीं, " नुसतें नाहीं म्हणणें सोपें, पण विधानें सपशेल, नव्हे, यत्किंचितहि खोटीं पाडणें फार कठीण आहे." पण जी गोष्ट मुळीं सिद्धच झालेली नाहीं, तिचा खोटेपणा दाखवावयाचा म्हणजे काय ? गोष्ट मुळीं खरी आहे हें तर पहिल्यानें सिद्ध झालें पाहिजे, मग ती खोटी पाडावयाचा प्रश्न. तुम्ही आधीं तुमचा काय तो पुरावा आणून गोष्ट खरी आहे हें सिद्ध केलें पाहिजे. उगाच कांहीं तरी बाजारगप्पा ऐकून आणि अगोदरच कसल्या तरी खोट्यानाट्या कल्पनांचें जाळें मनांत पसरून तुम्ही बोलूं लागलां तर तुमचें म्हणणें खोटें पाडावयाचें म्हणजे काय करावयाचें ? " अशी गोष्ट तुम्ही म्हणतां ती नाहीं " एवढेंच काय तें लोकांना म्हणतां येईल. समजा कीं उद्यां एखादा टवाळ लेखक उठला आणि म्हणत सुटला कीं, ' बहुतेक अमेरिकन अविवाहित स्त्रिया स्टेफिक्स सोडून इतर मार्गांनी मौज मारीत असतात; खोडा हें माझें विधान !' तर तुम्हांला तें खोडतां येईल काय ? खोडतां येणें मुळीं शक्य तरी आहे काय ? आतां दुसरें उदाहरण घेऊं. समजा, एखादा हिंदी गृहस्थ इंग्लंडमध्यें गेला आणि त्यानें तेथील सामाजिक परिस्थितीची आणि स्त्री-पुरुषविषयक संबंधाची आपल्या समजुतीप्रमाणें चौकशी म्हणून

केली, आणि मग त्या चौकशीअंतीं आपणास आढळून आलेली गोष्ट म्हणून त्यानें जाहीर केलें कीं, बहुतेक सर्व इंग्रज स्त्रियांमध्यें पातिव्रत्याचा अभाव आहे; तर असा कोण इंग्रज आहे कीं त्याला हें विधान खोटें पाडतां येईल ? असल्या या बाबतींत मूळ विधानच मुळीं प्रथम पूर्णपणें सिद्ध होणें जरूर आहे. नुसतें म्हटलें म्हणजे ती गोष्ट आहे असें होत नाहीं. तिला निर्विवाद पुराव्यानें आणि भरभक्कम पुराव्यांनीं शाबीद करावी तेव्हांच कुठें तिला अस्तित्व प्राप्त होतें. पण अशा तऱ्हेनें प्राप्त होणारें अस्तित्व जेव्हां तुम्ही उडवाउडवी ऐकण्यावर स्वतःची कल्पनाशक्ति चालवून आणि मन मानेल तशी संगति लावून उत्पन्न करूं पाहतां तेव्हां त्याचें 'नास्ति' ठरवा म्हणून सांगावयास तुम्हांला तोंडच कसें येतें मुळीं ! छाती असेल तर घर गृहीत धरलेलें—बहुतेक अविवाहित अमेरिकन स्त्रिया सृष्टिक्रमाविरुद्ध मार्गानीं मौज भोगतात—हें विधान तुम्ही खोटें पाडा, आणि मग तुमचीं हीं विधानें खोटीं पाडावयास आम्हांस सांगा.

असलीं हीं स्वतःचीं विधानें, खरोखरच्या गोष्टी म्हणून, मिस् मेयोनें आपल्या पाश्चात्य वाचकांस ज्ञानप्राप्ति करून देण्याकरितां इंग्लंड आणि अमेरिका देशांत प्रसृत केलेलीं आहेत. समजस पूर्वग्रहविरहित असे लोक, ज्यांना राष्ट्रीय पूर्वग्रहाचें वारेंहि शिवत नाहीं, अशांनीं अगदीं स्पष्ट शब्दांत या पुस्तकाचा धिःकार केलेला आहे. लॉर्ड सिंह म्हणतातः—" तिच्या या चित्राचें पाठपोट कुठें, पत्ताच लागत नाहीं ! ही इकून तिथून एकजात लबाडी आहे, जाणून बुजून पाहून सवरून केलेली लबाडी आहे, असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें. हिंदुस्थानांतल्या जवळ जवळ एकूण एक थोर माणसांवर तिनें चिखल उडविला आहे. पण मला हेंहि ठाऊक आहे कीं, एकूण एक अँग्लो-इंडियन अधिकारी, तें पुस्तक खोट्या गोष्टींनीं भरलेलें एवढेंच नव्हे तर सर्वथैव अपायकारकहि आहे असें मानीत आहे. तिनें आपल्या पुस्तकांत असें म्हटलें आहेसें दिसतें कीं, हिंदी आया आपल्या बालकांस सृष्टिक्रमविरोधी दुराचार शिकवितात. ह्या विधानाइतकें भयंकर असत्यपूर्ण दुसरें कोणतें विधान असेलसें मला वाटेना. म्हणून मी इंडियन मेडिकल सर्व्हिसमध्यें पंचवीस पंचवीस वर्षांहून अधिक काल घालविलेल्या अशा पांच सहा अधिकाऱ्यांना तें विधान तुम्ही खरें मानतां काय म्हणून विचारलें. त्यांनीं मला खात्री देऊन सांगितलें कीं, 'ही गोष्ट जशी तुम्ही कधीं ऐकलेली नाहीं तशी आम्हींहि ऐकलेली नाहीं. आमची तर अगदीं पक्की खात्री आहे कीं, ती साफ खोटी आहे.' "

आणि असेंच एका रेव्ह. जे. टिसल् डेव्हिस् नामक इंग्रज धर्मोपदेशकांनींहि म्हटलेलें आहे. ते म्हणतात कीं, " जे कोणी हें पुस्तक वाचतील, त्यांजपुढें जर दुसरीकडून निःपक्षपात अशी माहिती येणार नाहीं, तर ते निव्वळ एकांगी आणि सर्वथैव खोटी अशी दृष्टि घेऊन बसतील. रोगराईचा उद्भव, सांथीचा प्रसार, बालमृत्यूचीं कारणें, आणि हिंदी लोकांचा शारीरिक ऱ्हास, हें निवळ खऱ्या-खोट्याचें कडबोळेंच मानणें प्राप्त आहे. नेक नामदार चार्लस् बूथ ह्यांनीं " लंडन-मधील जीवित आणि कष्ट" या नांवाखालीं चौदा पुस्तकें लिहिलेलीं आहेत. त्यांत नमूद केलेल्या हालअपेष्टांच्या दुर्दैवी हकीकती नुसत्या मनांत आणणेंसुद्धां नीति-विघातक आहे. मि. अप्टन सिंक्लेअर वगैरे सारख्यांनींहि आम्हांला पाश्चिमात्य सुधारणेच्या पोटांतली घाण दाखविलेली आहे."

हिंदी लोकांना आतां कित्येक जण उपदेश करूं लागले आहेत. हे लोक आमचे हितेच्छु आहेत याबद्दल आम्हीं संशय प्रदर्शित करीत नाहीं. परंतु तो उपदेश असा कीं, हिंदी लोकांनीं हे या पुस्तकांतले दोषारोप लक्षांत घेऊन आतां आपलें घर सुधारावयास लागावें ! मॅन्चेस्टर गार्डिअन् म्हणतें कीं, मदर इंडिया हें पुस्तक असें आहे कीं तें इंग्रजांनीं विसरावें आणि हिंदी लोकांनीं स्मरणांत बाळगावें ! सल्ला तर मोठी नामी आहे खरी. पण इंग्रज लोक हें पुस्तक कधीं तरी विसरतील काय ? निदान आमची तरी नजर पोंचते आहे तेवढ्यावर तसें घडून येण्याचा संभव आम्हांला दिसत नाहीं. सर्वसाधारण ब्रिटिश माणसाला तर देवच पावल्यासारखें झालें आहे. कितीहि का दणकट हिंदी माणूस असेना, घ्यावें हें पुस्तक आणि द्यावें त्याच्या तोंडावर फेंकून. जगांत इतर कोणीहि माणूस हिंदुस्थानच्या नांवास काळिमा लावून त्याच्या राजकीय उन्नतीस खो घालण्याकरितां या पुस्तकाचा इतका उपयोग करणार नाहीं. या पुस्तकाचीं पहिलीं फळें तर आलीं, आणि हिंदी हितास नाशकहि होऊन गेलीं; आतां पुढचीं कशा प्रकारचीं येणार आहेत याचा संशयच नको. यावरून मॅन्चेस्टर गार्डियनचा इंग्रजांना केलेला उपदेश निवळ उपड्या घागरीवरचें पाणी कसा ठरला आहे हें सांगावयास नकोच.

आतां हिंदी लोकांसंबंधानें. त्यांना ह्या पुस्तकाचें स्मरण राहील यांत संशयच नाहीं, पण तें निराळ्या कारणाकरितां; आणि तें कारणहि तेच काय ते बरोबर जाणूं शकतील. गार्डियन् आम्हांला तें पुस्तक स्मरणांत ठेवण्याचा उपदेश करीत आहे, याचें कारण त्या पुस्तकामध्यें त्याला आमच्या सामाजिक सुधारणाविषयक:

चळवळींना दुप्पट जोरानें चालना देण्याचें सामर्थ्य आहे असें वाटतें. पण हें वाटणेंच मुळीं सर्वस्वी निराधार आहे. या पुस्तकानें आमच्या सामाजिक जीवनाचें भलतेंच वेडेंविद्रें स्वरूप करून दाखवून लोकांना इतकी चीड आणली आहे कीं, आतां राष्ट्रीयत्वाच्या नांवावर त्यांच्या मनानें उलट खाऊन चुकीच्या देखील हिंदु चालीरीतींना नसतें महत्व देण्याकडे त्यांचा कल वाढत चालला आहे. हिंदु लोकांना—त्यांच्यापैकीं सुशिक्षितांना सुद्धां—असें वाटूं लागलें आहे कीं, आपल्या मधल्या वाईटांत वाईट सामाजिक गोष्टी घेतल्या तरी त्या पाश्चिमात्य सामाजिक दुराचारांइतक्या नैतिक आणि शारीरिक अधःपाताला नेणाऱ्या नाहींत. अशा या परिस्थितींत आतां समाजसुधारकांचा मार्ग फार बिकट होऊं पाहत आहे. असा हा मिस् मेयोच्या 'मदर इंडिया'नें हिंदुस्थानच्या समाजसुधारणेचा घात केलेला आहे; आणि राजकीय घात तर पुस्तकास प्रसवणारा—तो तर सगळेच बिनचूक ओळखून आहेत !

परंतु हिंदी लोकांना या पुस्तकाचें स्मरण रहावयास दुसरें कारण आहे. या पुस्तकाचा उद्देश हिंदुस्थानास जगासमोर हीन दीन म्हणून दाखवावें असा आहे. असला हा अपमान स्वाभिमानी हिंदी लोकांच्या मनांतून निघून जाणें शक्य आहे काय ? आपल्या सगळ्या संस्कृतीची, अत्यंत जिव्हाळ्याच्या गोष्टींची, आपला धर्म, आपलें तत्वज्ञान यांची, टर उडविली जात असतांना कोणता हिंदु हाडाचा मनुष्य, सात्विक वा तामसी कसल्याहि वृत्तीचा असो, स्वस्थ बसून पाहत राहील ? या अपमानाचा प्रत्यक्ष प्रतीकार आज करण्याची आमच्यांत ताकद नाहीं हें खरें पण तो अखंड स्मरणांत राहील एवढें तरी करणें आपलें कर्तव्य नव्हे काय ? राष्ट्रीय अपमानाच्या पोटीं काय ब्रह्मांड असतें, याची जाणीव अपमान करणाऱ्यापेक्षां अपमान झालेल्याला अचूक होते. एवढेंसें अर्भक, मनोविकारांची पुरती वाढहि झालेली नाहीं, पण त्यालासुद्धां स्वतःच्या अपमानापेक्षां आईबापांचा अपमान जास्त झोंबतो. मग चांगला वाढला सवरलेला हिंदु जीव, आज परकी अंमलशाली दीन दुबळ्या कशाहि स्थितींत असला, तरी स्वस्थ आपल्या संस्कृतीचा, सुधारणेचा, स्त्रीजातीचा, धार्मिक कल्पनांचा, अपमान झोंबल्याशिवाय कसा राहील ! तो अपमान तो कसा विसरेल ! जगाच्या चारी दिशांहून प्रवासी हिंदुस्थानांत येतात, आणि आमची निंदा करीत सुटतात; कारण आम्ही परवशाच्या जोखडासालीं आहों. हेंच जर आमचें स्वराज्य असतें, तर त्यास इतकी आमची दुर्दशा झाली नसती.

आपणाहून निराळे जे लोक आहेत, त्यांच्या चालीरीतींचा विचार करितांना कोणती दृष्टि आणि कोणती भावना ठेविली पाहिजे हें मरहूम मि. आल्फ्रेड वेब यांनी सन १९०० सालीं हिंदुस्थानासंबंधानें लिहिलेल्या एका पुस्तकाच्या प्रस्तावनेंत सांगितलेलें आहे. त्या पुस्तकाबरोबर ते शब्दहि कधींच्या कधींच लोक विसरून गेले आहेत. पण ते पुनः जीवंत करून ठेवण्याच्या लायकीचे आहेत. वेबसाहेब म्हणतातः—

" 'रानटी' म्हणून संबोधून त्या लोकांच्या अनीतीचें चित्र रंगवितांना आपण आमच्या मोठमोठ्या शहरांत, विशेषतः फौज असलेल्या शहरांत, रात्री रस्त्यांवर काय काय प्रकार घडत असतात याचा पुरता विचार करतों काय? युरोप पहायास निघालेल्या एखाद्या हिंदी गृहस्थास उदाहरणार्थ पॅरिस लँडन सारख्या ठिकाणीं उच्च नैतिक कल्पनांशीं विसंगत असें जितकें कांहीं दिसणें संभवनीय आहे, तितकें आणि तसलें कांहींहि एखाद्या युरोपियन गृहस्थास हिंदुस्थानांत दिसण्याचा संभव नाहीं. वेश्यागमन हें, ख्रिस्ती धर्माची विशेष प्रौढी मारणाऱ्या अशा अनेक राष्ट्रांत एक कायमची सामाजिक संस्था बनून राहिलें आहे, याची आम्हांस आठवण आहे काय? ब्रिटिश सैनिकांना नित्य नियमानें वेश्यांचा पुरवठा करण्यांत येतो ही गोष्ट दोघां अमेरिकन स्त्रियांनीं उघडकीस आणिली नसती तर ब्रिटिश अधिकारी तिला आजहि मान्यता आणि प्रोत्साहन देत राहिले असते हें आम्ही विसरलों आहों काय? मी हिंदुस्थानांत कांहीं दिवस होतों, तेव्हां पाहिलें तों तेथील छावण्यांत चालू असलेली पद्धत सगळ्या 'ख्रिस्ती' अधिकाऱ्यांना पसंत दिसली, पण ज्या ज्या हिंदु किंवा इतर हिंदी गृहस्थांशीं मी त्यासंबंधानें बोलणें काढलें त्या सर्वांनी तिचा तीव्र निषेध केला."

आणखी पुढें ते म्हणतात कीः—

"जसे आम्ही सुसंस्कृत ख्रिस्ती लोक आमच्या चालीरीतींतल्या वाईट भागाबद्दल नापसंती व्यक्त करतों, तसे हिंदु आणि इतर धर्मीय सुसंस्कृत लोक हिंदी चालीरीतींत हलक्या प्रवृत्तीकडे नेणारें जें कांहीं आहे त्याजबद्दल नापसंती व्यक्त करीत नाहींत असें समजण्याचें कांहींच कारण नाहीं. जो न्याय आपण ख्रिस्ती धर्माची पारख करतांना लावण्यांत यावा असें इच्छितों, तोच न्याय लावून आपण हिंदु धर्माची किंवा इतर धर्मांची पारख, त्यांतल्या सर्वोत्कृष्ट भागावरूनच केली पाहिजे."

---

## प्रकरण १ लें.

# काली आणि कली.



मिस् मेयोच्या पुस्तकाच्या पहिल्या प्रकरणाचें नांव "मोटारींतून मंडालेस" असें आहे. पण मंडाले पडलें ब्रह्मदेशांत, आणि मिस मेयोची मोटर जाते बंगाल्यांत,—कलकत्त्याच्या कोंपऱ्यांतल्या कालीघाटावर! अर्थ उघड आहे कीं, तिला मंडाले म्हणजे कलकत्त्याचा एक भाग वाटतो! हाच गोंधळ तिनें पुस्तकभर करून ठेवला आहे!

यावरून आम्हांला एक गोष्ट आठवते ती अशी. त्या गोष्टींतली चूक करणारे एक इंग्लंडमधले प्रतिष्ठित गृहस्थ असून त्यांना आपल्या भूगोलाच्या ज्ञानाबद्दल जरा विशेष घमेंड असे. गोष्ट अशी कीं, इंग्लंडमध्यें एक धर्मविषयक परिषद भरली होती, आणि तिच्यांत हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून गेलेले लाहोरचे बिशप एका ठरावावर भाषण करीत होते. प्लॅटफॉर्मवरच्या एका श्रोत्यांनी शेजारच्या एका प्रतिष्ठित गृहस्थास हे वक्ते कोण म्हणून विचारलें. त्या इसमानें सांगितलें कीं, "लाहोरचे बिशप." "लाहोर! कुठें आहे हें लाहोर?' पहिल्यानें प्रश्न केला. त्यावर दुसरा म्हणतो, "वाहवा! भले! लाहोर कुठें एवढेंदेखील तुम्हाला ठाऊक नाहीं? अहो, दक्षिण आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर!"

असें हें इंग्लंडमधल्या बहुतेकांचें हिंदुस्थानाबद्दलचें अगाध ज्ञान असतें!! पण त्या अज्ञानाचें तितकें कांहीं वाटत नाहीं; वीट येतो, तो हे लोक सपशेल खोट्या गोष्टी अगदीं न कचरतां छातीठोकपणें खऱ्या म्हणून दडपून देतात म्हणून!

दुसरें एक मिस मेयोच्या त्याच प्रकरणांतलें उदाहरण घ्या. काली घाटाचें वर्णन देतांना ती काली म्हणजे कली असें धरून चालली आहे. ज्या देवळांत ती गेली तें देऊळ कालीचें म्हणजे एका देवतेचें आहे. परंतु काली आणि कली यांतला फरक लक्षांत न घेऊन ती कलीचें वर्णन कालीस लावून म्हणते कीं, "ह्या देवतेचें जगावर आध्यात्मिक साम्राज्य सुरू झाल्याला आज सुमारें पांच हजार वर्षे झालीं, आणि पुढेंहि तें आणखी जवळ जवळ चारशें बत्तीस हजार वर्षे राहणार आहे!"

पण गोष्ट अशी आहे की, हिंदुस्थानच्या कोणाही माणसास, कालीचेंचरसें काय, कोणाहि देवदेवतेचें किती वर्षें राज्य चालणार न चालणार याची कसलीच कल्पना नाहीं. मिस् मेयो जो काल आणि जीं वर्षें सांगत आहे तीं कलियुगाचीं—अर्थात् कलीच्या म्हणजे कलहाच्या युगाची होत. हिंदुलोक जगाच्या इतिहासाचे चार भाग मानतात. त्यांतला कलीचा भाग, म्हणजे कलियुग, हें शेवटचें होय. ह्या कलीचा आणि मिस मेयो अगदीं पहिल्या प्रथम उभ्या मारीत गेली त्या तिच्या आवडत्या कालिघाटावरील कालीचा, कांहीं म्हणजे कांहीं देखील संबंध नाहीं.

असल्या अनेक चुका या पुस्तकांत आहेत हें आम्ही पूर्वीच सांगितलें आहे. आम्हांला तर वाटतें की दर पृष्ठागणिक असल्या चुका आहेत. पुस्तकांत इकडे तिकडे कांहीं चुका असल्या आणि एकंदरींत तात्पर्य बिनचूक असलें म्हणजे मग त्याबद्दल फारसा प्रश्न नाहीं. परंतु दरएक पानावर प्रत्यक्ष गोष्टींबद्दलच्या चुका भरलेल्या असतां, तात्पर्य—तेंहि त्या तशा गोष्टींवरून काढलेलें तात्पर्य—कोणत्याहि दृष्टीनें बिनचूक असूं शकेल अशी कल्पनाहि करवत नाहीं.

आम्ही सांगितलेल्या ह्या चुका म्हणजे पुस्तक पाहून सहज दुरुस्त करतां आल्या असत्या अशा होत्या. मग जेथें प्रत्यक्ष पाहून, प्रश्न विचारून, बारकाईनें चौकशी करून, आणि अगदीं निकट संबंध आणून माहिती मिळवावयाची, तेथल्या चुकांचें काय सांगावें ? असली माहिती मिळवितांना वैयक्तिक पूर्वग्रह, सहानुभूतिशून्य दृष्टि, पाहतांना होणाऱ्या नजरचुका आणि गैरसमज, किंबहुना जाणून बुजून केलेला विपर्यास, या सर्वांना अगदीं ऐसपैस क्षेत्र मोकळें असतें.

ही जी दुसऱ्या प्रकारची सांगितलेली माहिती आणि ती मिळवितांना मनांत आलेले पूर्वग्रह, यांच्यामुळेंच सदरहू पुस्तकांत भयंकर गोंधळ माजून तें पुस्तक म्हणजे आजवर कोणी कधींहि हिंदुस्थान आणि तेथील जनता यांजबद्दल लिहिलें नाहीं अशा तऱ्हेचें भयंकर नालस्तीनें भरलेलें पुस्तक होऊन राहिलें आहे; कारण हिंदु चालीरीतींचें वर्णन देतांना कांहीं ठिकाणीं भयंकर अतिशयोक्ति केली आहे, कांहीं ठिकाणीं जाणून बुजून विपर्यास केला आहे, आणि सर्वच ठिकाणीं अगदीं कल्पनाहि होणार नाहीं असा ओढून ताणून अर्थ लादला आहे.

काली देवीचें वर्णन तर अगदीं रंगभरित आहे. मिस् मेयोनें आपली असेल नसेल ती हिकमत खर्च करून त्या देवीला शक्य तितकी विद्रूप करून दाखविली आहे. खरें, समजा कीं, काली विद्रूप आहे आणि मांस-रक्त-मदीला चटाव-

केली आहे; पण एवढीच काय ती हिंदुस्थानांत देवता आहे असें मिस् मेयोनें कां मानावें ? हिंदुस्थानांत शेंकडों-हजारों रूपांत परमेश्वर पूजिला जातो, त्यांतलेंच काली हें एक परमेश्वरी कोपाचें निदर्शक असें रूप आहे. वास्तविक पाहतां काली ही एक अनार्यांची देवता असून, जेव्हां आर्यांनीं अनार्यांना आपल्यांत समाविष्ट करून घेतलें, तेव्हां त्यांच्या या देवतेलाहि त्यांनीं ईश्वरी तेजाचें एक विशिष्ट स्वरूप म्हणून मान्यता देऊन आपल्यांत घेतलेलें आहे.

हिंदुस्थानांतील हिंदु देवतांचा इतिहास चांगला मननीय असा आहे. एखाद्या परकी माणसाला वाटतें कीं, जणूं काय हिंदुधर्मीयाला ईश्वर एक आहे हें माहीतच नसून तो ईश्वर अनेक आहेत असें मानतो. वास्तविक या कल्पनेइतकी अवास्तव अशी दुसरी कोणतीच कल्पना नसेल. हरएक हिंदुधर्मीय मनुष्य आपल्या हृदयाच्या आंतल्यांत आंतल्या गाभाऱ्यांत अशी अखंड जाणीव ठेवून असतो कीं, ईश्वर एक आहे, त्याहून अन्य कोणी नाहीं. अनादि कालच्या वेदांपासून एकूण एक धर्मग्रंथ त्याला हेंच शिकवीत आले आहेत. कोणाहि देवाचें देऊळ दिसो, हिंदूची मान वांकलीच; याचें कारण त्याची अशी पूर्ण जाणीव आहे कीं हीं सर्व त्या एकमेवाद्वितीय परमेश्वराचींच निरनिराळीं रूपें होत. सर विल्यम हंटर यांनीं आपल्या हिंदुस्थानच्या संक्षिप्त इतिहासांत म्हटल्याप्रमाणें, प्रत्येक हिंदूला वाटत असतें कीं, "आपण ज्या बाह्य मूर्तीपुढें आपलें डोकें नमवितों ती केवळ आपली इष्ट-देवता म्हणजे सर्वश्रेष्ठ परमेश्वराच्या अनंत रूपांतून स्वतःच्या आवडीनें पसंत केलेलें एक रूप होय." हिंदु इसम मुसलमान मशीदीपुढें किंवा ख्रिस्ती चर्चपुढें सुद्धां डोकें लववावयास फारसें मागें पुढें पाहणार नाहीं. जगताचा ईश्वर एकच आहे, तो निरनिराळ्या रूपांत, निरनिराळ्या लोकांस, आणि निरनिराळ्या धर्मांत दिसतो असा हिंदुधर्मीयाचा दृढ विश्वास आहे, हें दाखवावयास याहून आणखी काय पुरावा पाहिजे ?

काली ही ईश्वराचें भयानक स्वरूप व्यक्त करणारी असली, तरी तिची पूजा निरनिराळ्या कुटुंबांत निरनिराळ्या पद्धतींनीं होत असते. ती आज अखिल बंगालची राष्ट्रीय देवता अशी मानली जाते. हजारांतून ९९९ देवळांत, तिला सर्व सुखाची, कल्याणाची, दात्री म्हणूनच पूजितात, विघ्नें आणणारी दुष्ट पिशाचिका म्हणून नव्हे. ती प्राण्यांचा बलि मागत नाहीं, बकरे मेंढ्या मारावयास सांगत नाहीं, केवळ भक्तिभावानें, प्रार्थनेनें, पुष्पोपहारांनीं, बहुमोल दरवळणाऱ्या सुवासांनीं, तिची सेवा होते. कालीमातेस सबंध बंगालभर कोणत्या भावनेनें

पूजितात हें अगदीं सहज समजावयास एकच गोष्ट सांगितली म्हणजे पुरे कीं, बंगालमधील आधुनिक कालचे महान सुविख्यात साधुवर्य श्री रामकृष्ण परमहंस, यांची भक्ति–देवता ' कालीमाता ' ही होती. हिंदुस्थानांत अनेक साधुसंत निर्माण झाले, पण मॅक्समुल्लरसारख्या जगविख्यात महान् पंडितांनीं फक्त श्रीरामकृष्णाचेंच काय तें चरित्र त्यांच्या वचनांसह लिहिलें आहे, ही गोष्टहि वाचकांनीं लक्षांत घेण्याजोगी आहे.

कालीघाटावर बकरे मारतात म्हणून मिस् मेयोनें मोठी तुच्छता दर्शविली आहे. परंतु असा प्राणिवध सगळ्याच कालिदेवीच्या देवळांत होतो असें दाखविणें ही तिची चूक आहे. प्राणिवध अगदीं अपवादभूत म्हणून मानलेला असून आतां फारच थोड्या ठिकाणीं शिल्लक राहिला असेल, आणि तेथेंहि तो झपाट्यानें नाहींसा होत चालला आहे.

भूतदयेची शिकवण देणारी पहिली भूमि भरतखंड होय, आणि आपली शिकवण प्रत्यक्ष आचरणांत आणून प्राणियज्ञ अजीबाद बंद करून टाकणारीहि पहिली भूमि भरतखंडच होय, हें सबंध जगाला मान्य आहे. ज्या कालांत पाश्चिमात्य राष्ट्रें रानटी दशेंत पार निमालेलीं अशीं होतीं, त्या कालापूर्वीच हिंदुस्थान देशानें भगवान् बुद्धाकडून भूतदयेची दीक्षा घेतलेली आहे. तेव्हांपासूनच पशुयज्ञ असा क्वचित्च होत आला आहे. तो अजीबाद सोडून देण्यांत आला आहे असें कदाचित् म्हणतां येणार नाहीं; कारण अद्याप कित्येक मूळच्या अनार्य लोकांमध्यें आणि त्यांच्या उपाध्यायांमध्यें पशुयज्ञ चालतो. पण तो निव्वळ अपवादरूप होय.

समजा कीं, मिस् मेयो सूचित करूं पाहत आहे तसा सरांस पशुयज्ञ हिंदुस्थानांत चालू असता. पण त्यानें काय सिद्ध होणार ? पाश्चिमात्य लोक हरहमेष असंख्य पशु-हत्या करीत नाहींत काय ? हिंदुस्थानांत निदान इतकें तरी आहे कीं, निरपराध जीवाची हत्या झाली तरी तिजपासून कांहीं तरी आपलें कल्याण होईल, अशी त्या यज्ञकर्म आचरणाऱ्यांची भावना असते. पशुहत्येच्या कल्पनेनें शिसारी येण्याचें कारण, आपल्या हातून निरपराध जीव मृत्युमुखीं पडतो. पण त्याचबरोबर आपण हेंहि विसरतां नये कीं, त्या हत्येला जोडून, यज्ञाची–म्हणजे आपल्या मालकीच्या अशा असल्या तरी वस्तूचा त्याग करण्याचीहि बुद्धि असते. हेतु चुकीचा किंवा बरोबर हा भाग निराळा, पण तो निदान धार्मिक तरी असतो.

पण पाश्चिमात्य देशांत काय प्रकार चालतो पहा ! ते लोक पशूंना पोसतात, त्यांना पुढें मारून त्यांचें मांस खावयास मिळावें म्हणून ! मुख्य कल्पना त्यांत ही.

इंद्रियसौख्यापलीकडे दुसरा हेतु नाहीं! पशुवधासंबंधानें हिंदुस्थानांत धार्मिक कल्पनेला भलती दिशा लावली आहे किंवा तिचा दुरुपयोग करण्यांत येत आहे असें म्हणतां येईल. पण त्याला कारणहि पुरेसें आहे तें हें कीं, तो गतगोष्टींचा अवशेष होय. पण पाश्चिमात्यांमधलें तें तर निव्वळ उदरपूजन आहे. ह्या उदररूपी राक्षसाला संतुष्ट करण्याकरितां तिकडे दररोज हजारों निरपराधी जीव यमसदनीं धाडण्यांत येत असतात.

कालीचें देऊळ आणि त्यांत चालत असलेला व्यवहार हा हिंदुस्थानच्या धार्मिक व्यवहाराचा यत्किंचितहि निदर्शक म्हणतां येणार नाहीं. तो अपवाद आहे, नियम नव्हे. सबंध हिंदुस्थान धुंडाळून असलीं वीस तरी देवळें मिळतील कीं नाहीं याची शंका आहे, कीं ज्यांत सर्रास रोजच्या व्यवहारांत पशुयज्ञ चालू असून, पाणेरड्या कल्पनांचें साम्राज्य माजून राहिलें आहे. बंगालचे ब्राह्मणच नव्हे तर खालचे वर्गहि आपल्या घरच्या किंवा गांवच्या देवळांत देखील कालीमातेची पूजा कोणाहि हिंदुमात्रानें करावी तशी खऱ्या भक्तिभावानें करतात; किळसवाणे प्रकार पाहूं गेलें तरी दिसणार नाहींत, इतकेंच नव्हे तर ते कोणाला माहीतहि नाहींत. आणि म्हणूनच मिस् मेयोला कलकत्त्यास एका थिऑसॉफिस्ट बाईनें विचारलें कीं "तुम्ही कालीघाट पहावयास कशाला गेलां होतां? कालिघाट म्हणजे कांहीं हिंदुस्थान नव्हे. अगदीं खालच्या वर्गांचे अडाणी लोकच काय ते काली-पूजक आहेत." हें त्या बाईचें म्हणणें मिस् मेयोनेंच आपल्या पुस्तकांत दिलेलें आहे.

मिस् मेयोच्या पुस्तकाच्या ह्या पहिल्या प्रकरणांत आणखी एक मोठी सूचक अशी गोष्ट आहे तीहि लक्षांत घेण्याजोगी आहे. तिच्या लिहिण्याचा रोख असा कीं, जणुं काय ती सहज कालीघाटावर गेली होती आणि तिनें आपण प्रत्यक्ष पाहिल्या म्हणून सांगितलेल्या गोष्टी एकाच वेळीं एकदम पाहिल्या. आतां असें कीं, जर ती सहज म्हणून गेली असेल तर त्या सगळ्याच गोष्टी जणुं काय तिला दिसाव्या म्हणूनच एकदम घडून येणें बहुतेक असंभाव्य आहे. बलिदान वगैरे ज्या गोष्टी ती सांगते त्या रोज घडून येणाऱ्या गोष्टी नव्हेत. त्या निरनिराळ्या वेळीं आणि प्रसंगोपात्त घडत असतात. अर्थात् एकतर ती आपण पाहिल्या म्हणून सांगत असलेल्या गोष्टी एकाच दिवशीं एकदम घडून याव्या अशी पूर्वी योजना केलेली असेल; अथवा तिनें एक दोन गोष्टीच काय त्या स्वतः पाहून बाकीच्या दुसऱ्यानें सांगितलेल्या माहितीवरून किंवा स्वतःची कल्पना-

शक्ति लढवून भरीस घातल्या असतील. कसेंहि का असेना; ही तिनें प्रत्यक्ष पाहि-लेल्या गोष्टींची जशीच्या तशी लिहिलेली हकीगत नव्हे हें सिद्ध आहे. तिनें जागो-जाग रिकाम्या राहिलेल्या भागांत भर घालून सर्व मिळून एक सुसंगत हकीगत दिसेल अशी व्यवस्था केली आहे. म्हणजे कादंबरीकार जसा जगांतल्या व्यवहाराच्या चित्रांत तपशीलाच्या किरकोळ गोष्टी स्वतःच रचून तें चित्र कलेच्या दृष्टीनें सर्वांग-सुंदर बनवितो; तसा हा प्रकार तिनें केलेला आहे. आणि त्यामुळें तिनें आपल्या सत्यवादित्वावर आपणहून कुऱ्हाड मारून घेतलेली आहे.

---

## प्रकरण २ रें.

# मूर्तिमंत काळ ! !



मिस मेयोच्या पुस्तकाचा थोडक्यांत सारांश असा आहे कीं हिंदी लोक हा एक जगाला, त्यांतल्या त्यांत अमेरिकेंतल्या युनायटेड स्टेटसला, "मूर्तिमंत काळ" आहे. हें पुस्तक लिहिण्याचा आपला उद्देश ती सांगते कीं, आपल्या देशबांध-वांना हिंदुस्थानविषयक खरी कल्पना आणून द्यावी, "कारण इतकें अवाढव्य शरीर घेऊन अगदीं निकट येऊन बसलेल्या शेजाऱ्याबद्दल आम्हांला ठळक ठळक माहिती असणें **स्वसंरक्षणाच्या** दृष्टीनें अत्यावश्यक आहे." यांत तिनें असें सुचविलें आहे कीं, अमेरिकन लोकांनीं हिंदुस्थानची परिस्थिति कां समजून घेणें जरूर आहे, तर स्वतःचा बचाव करण्यासाठीं, नाहीं तर हिंदुस्थानांतलें विष अमेरिकन लोकांच्या अंगात शिरून हिंदु लोकांबरोबर तेहि यमाची वाट चालू लागावयाचे !

असें जर खरोखरच हिंदुस्थानांत विष असतें, तर हिंदु लोक एव्हांना कधींच रसातळाला गेले असते. अमेरिकन लोक कालचे तीनशें वर्षांतले, पण हिंदु लोक ग्रीक आणि रोमन यांच्याहि पूर्वींचे असून, ते तिकडे नाहींसे झाले तरी हे पुनः इकडे शिल्लक आहेतच. त्यांच्या बुद्धीमध्यें इतकी जबरदस्त ताकद आहे कीं, आज हजार वर्षांचा परकी अंमल झाला असतांहि त्यांच्यांत सर जगदीशचंद्र *बोस, डॉ. रवींद्रनाथ टागोर, सर पी. सी. रे, डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर,* आणि महात्मा गांधी असे एक एक मोठमोठे पुरुष निर्माण होतात, कीं ज्यांचें मानवजातीच्या इतिहासांतील महत्व आणि ज्यांची जगाच्या ज्ञानभांडारांतली

आणि संस्कृतीमधली भर पाश्चिमात्य राष्ट्रे अत्यंत कृतज्ञतापूर्वक प्रशंसोद्गार काढून कबूल करीत आहेत.

अशा रीतीनें जे लोक सतत तीन हजारांहून अधिक वर्षे मुळींच खंड न पडतां, तत्वज्ञानी, शास्त्रज्ञ, साधुसंत, धर्मसंस्थापक, शास्त्रीपंडित, मुत्सद्दी, राजकारणी पुरुष, साम्राज्यसंस्थापक वीर, महान् कवी, संगीत कलाविशारद, आणि ज्योतिर्विद्, असे अनेक प्रकारचे थोर थोर पुरुष निर्माण करूं शकतात, त्यांची सामाजिक व्यंगें कांहींहि असलीं तरी ते जगाला 'काळरूपी' होत असें कोणाहि शुद्धीवर असलेल्या माणसास कधीं वाटणें शक्य नाहीं. ही कल्पना मुळीं दिसण्यांतच पराकाष्टेची हास्यास्पद आहे; ती करून घेणारा एक तर पक्का मूर्ख, किंवा अट्टल शठ तरी असला पाहिजे, दुसऱ्या तिसऱ्याचें हें काम नव्हे.

"हिंदुस्थान, आणि त्याजपासून आपणास काय शिकतां येईल ?" या आपल्या पुस्तकांत प्रोफेसर मॅक्स मुल्लरसाहेब म्हणतात कीं, "मानवी मनाचा इतिहास आणि स्वतःमधील सत्तत्व यांच्या अभ्यासांत हिंदुस्थान दुसऱ्या कोणत्याहि देशाहून कमी नाहीं. मानवी मनाचें कोणतेंहि क्षेत्र तुम्हीं विशेष अभ्यासाकरितां निवडा, तें भाषाशास्त्र असो, धर्मज्ञान असो, पुराणकथा असो किंवा तत्वज्ञान असो, धर्मशास्त्र किंवा चालीरीति असो, अगदीं आरंभींची कला किंवा शास्त्र असो, प्रत्येक बाबतींत तुम्हांला आवडो न आवडो हिंदुस्थान हें गांठलेंच पाहिजे, कारण मानवी संस्कृतीच्या इतिहासांतील कांहीं कांहीं अति अमोलिक आणि अत्यंत बोधक अशा गोष्टी फक्त हिंदुस्थानांतच जपून ठेविलेल्या आहेत, दुसऱ्या कोठेंहि नाहींत."

"राजस्थान" ग्रंथाचे लेखक कर्नल टॉड, यांनीहि हुबेहुब हीच कल्पना मांडलेली आहे. ते विचारतात, "असले ऋषिवर्य आपणास कुठें तरी दुसरीकडे पहावयास मिळतील काय कीं ज्यांचीं तत्वज्ञानविषयक दर्शनें ग्रीसदेशाच्या तत्वज्ञानपद्धतींना मूलस्थानीं होतीं, ज्यांचें कार्य प्लेटो, थेल्स, आणि पायथॅगोरास यांना गुरुस्थानी होतें ! ज्यांचें ग्रहमालिकाविषयक ज्ञान पाहून युरोपखंड अद्याप आश्चर्यानें थक्क होतें, असले ज्योतिर्विद् आम्हांला अन्यत्र कुठें दिसतील काय ! सारखी प्रशंसाच करीत सुटावें असे कुशल कारागीर आणि शिल्पकार, मनास आनंदांतून दुःखांत आणि दुःखांतून आनंदांत हेलकावे खात ठेवणारे, रडणाऱ्यास हंसविणारे आणि हंसणाऱ्यास रडविणारे, सहस्वर नानाविध रागांत खेळविणारे, असे महान् गंधर्वराज दुसऱ्या कुठें तरी पहावयास मिळतील काय ! "

अशा प्रकारचा हिंदुस्थानांत कैक वर्षे राहून आणि सबंध आयुष्यभर हिंदुस्थानासंबंधानें अभ्यास करून अनेक इंग्रज व अमेरिकन गृहस्थांनीं अगदीं निर्दोष अशा पद्धतीनें आपला अभिप्राय व्यक्त केला असतां, ही मिस मेयो येते, आणि पुरते हिंवाळ्याचे देखील महिने लागले नसतील एवढया कालांत आपली " चौकशी " म्हणून करते, आणि हिंदुलोकांच्या सामाजिक चालीरीति, आचारविचार, आणि धार्मिक संस्कार हे जगाच्या सुधारणेस धोका आणणारे आहेत असा सबंध हिंदुस्थानच्या लोकांवर सरसहा दोषारोप करते याला काय म्हणावें !

असा हा एकादा सबंध राष्ट्रावर सरसकट दोषारोप करतांना, मिस मेयोच्या मनावर, अँग्लो–सॅक्सन् लोक आपल्या संस्कृतीचा ज्या मार्गांनीं सबंध जगावर प्रसार करीत आले आहेत त्या मार्गांचा पगडा बसलेला होतासें दिसतें. अमेरिकेंत वसाहत करावयास गेलेल्या अँग्लो–सॅक्सन लोकांनीं तेथल्या मूळच्या रेड इंडियन् लोकांना पाश्चिमात्य सुधारणेचें अमृत म्हणून दारू प्यावयास शिकविलें आणि त्यामुळें त्यांची मूळची जोमदार आणि विस्तार पावत असलेली जात साफ नाहींशी करून टाकिली, हा इतिहास कोणास माहीत नाहीं ? आफ्रिकेंत आणि जगांतल्या बाजूबाजूच्या ठिकाणीं, ब्रिटिश संस्कृतीचें आगमन म्हणजे मूळच्या लोकांच्या संख्येचा आणि शारीरिक बळाचा ऱ्हास, हें आतां कोणास कळावयाचें राहिलें आहे ? न्यूझीलंडच्या मावरी लोकांत देखील ऱ्हासाचीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं आहेत. ही जी अँग्लो–सॅक्सन् लोकांची सुधारणेच्या नांवाखालीं दुष्ट गोष्टी पसरविण्याची पद्धत, तिचा हर्बर्ट स्पेन्सर प्रमुख अनेक विचारी लोकांनीं वेळोवेळीं निषेध केलेला आहे.

ह्या दृष्टीनें पाहतां, जर अँग्लो–सॅक्सन लोकांपासून, मग ते इंग्लंडमधील असोत, युनायटेड स्टेटसमधील असोत, किंवा डोमिनिअन्समधील असोत— जगांतील इतर लोकांना आणि त्यांच्या संस्कृतीला खराखुरा धोका आहे असें आम्ही म्हटलें, आणि एकदरींत मनुष्य जातीलाच ते कलंकभूत आहेत असें म्हटलें तर तें वावगें होईल काय ? कदाचित् हीच आपल्या लोकांबद्दलची जाणीव मिस् मेयोनें हिंदु लोकांवर ढकलून दिलेली असावी !

हिंदु लोकांचा बाह्य जगाशीं व्यवहार हा आजकालचा नसून तो कमींत कमी २००० वर्षे तरी चाललेला आहे. एवढया या दीर्घ इतिहासकालांत, हिंदु लोक

बाह्य जगाला 'धोका' म्हणून ठरल्याचें एक तरी उदाहरण आहे काय?— मग त्यांचे सामाजिक दुराचार कांहीं का असेनात! उलट, हिंदु लोकांनीं शतकानुशतकें अखिल जगाला आणि मुख्यतः इंग्लंडाला आणि युरोपखंडाला आपला उत्तमोत्तम तयार केलेला माल, आणि कलाकौशल्याचे व उदीमधंद्याचे जिन्नस पुरविलेले नाहींत काय? तसेंच त्यांनीं जगाच्या ज्ञानांतहि भर टाकून शास्त्राभिवृद्धि, तत्वज्ञानाचा विकास, आणि कलाकौशल्याची वाढ यांनाहि हातभार लावलेला नाहीं काय?

आजच्या अवनतावस्थेंतहि हिंदु लोक हे निःसंशय थोर आणि उच्च दर्जाच्या संस्कृतीचे लोक आहेत. सर टॉमस् मनरो म्हणून एक आरंभीं डिस्ट्रिक्ट ऑफिसर असलेले पुढें गव्हर्नराच्या हुद्यावर चढले होते; त्यांनीं हिंदुस्थानांत एकंदर ३२ वर्षे नोकरी केली; हिंदुलोकांची आणि त्यांच्या राहणीची त्यांनीं फार चांगली माहिती करून घेतलेली होती. ते १८१३ सालच्या पार्लमेंटरी कमिटीपुढें साक्ष देतांना म्हणतातः—

"हिंदु लोकांची 'सुधारणा' म्हणजे काय हें मला बरोबरसें समजत नाहीं. भौतिक शास्त्रांच्या उच्च शाला, राज्यव्यवस्थेची उपपत्ति आणि प्रयोग, आणि पूर्वग्रह व खुळ्या समजुती नाहींशा करून कोणतेंहि ज्ञान कुठूनहि मिळो तें पदरांत पाडावयास मनाची तयारी करून देणारें शिक्षण, यांत ते युरोपियन लोकांच्या पुष्कळ मागें आहेत. परंतु चांगली शेती, वस्तु तयार करण्यांत अनुपम कौशल्य, ज्यानें सोय वाढेल आणि चैन साधेल तें घडवून आणण्याचें सामर्थ्य, वाचन, लेखन आणि अंकगणित शिकविण्याकरितां गांवोगांव स्थापलेल्या शाला, एकमेकांत पाहुणचार आणि दानधर्म करण्याची सार्वत्रिक वहिवाट, आणि त्याहूनहि महत्वाची गोष्ट म्हणजे स्त्रीजातीशीं विश्वासाची, आदराची आणि मर्यादशील वागणूक, इत्यादि जर सुधारलेल्या लोकांचीं लक्षणें म्हणावयाचीं, तर त्यांत हिंदुलोक युरोपियन राष्ट्रांहून कांहीं कमी नाहींत. आणि जर या दोन देशांमध्यें सुधारणेचा 'व्यापारच' सुरू केला, तर माझी खात्री आहे कीं, त्यांत इकडे येणाऱ्या मालानें इंग्लंडचाच फायदा होईल."

अशा प्रकारचे आजचे हे हिंदु लोक आहेत. मेजर-जनरल सर ओ. टी. बर्न, के. सी. एस्. आय., हिंदुस्थानच्या कमांडर-इन-चीफचे माजी मिलिटरी सेक्रेटरी, हे "हिंदुस्थानचे राज्यकर्ते" नामक ग्रंथमालेंतील आपल्या "क्लाइड आणि स्ट्रेथनेअर्न"वरील ग्रंथांत म्हणतात,—

"सामान्यतः बोलावयाचें तर हिंदु माणूस शांत-वृत्तीचा, उद्योगी, आणि धर्मविषयक बाबतींत मुद्दाम चिडविला नाहीं तर सहनशील, असा असतो. एका मोठ्या युद्धविषयक लेखकानें म्हटल्याप्रमाणें हिंदी लोकांनीं शत्रु आणि मित्र दोन्ही नात्यांनीं आपण युरोपियन शिपायांच्या तोडीचे शूर शिपाई आहों असें सिद्ध केलेलें आहे."

आणि याच हिंदु लोकांना मिस् मेयो ही जगाला आणि विशेषतः तिच्या देशाला 'मारक' म्हणून संबोधीत आहे. वास्तविक कोण कोणाला मारक आहे? हिंदु लोक जगाला, कीं युरोपियन लोक हिंदूंना? १९१८–१९ सालीं जेव्हां युरोपहून इन्फ्लुएन्झाची सांथ हिंदुस्थानांत आली आणि तिनें १ कोटी ३० लक्ष लोकांची स्वर्गांत रवानगी करून त्याच्या दसपट लोकांना शरीरांत व्यंग उत्पन्न केलें, तेव्हां जगाला 'मारक' कोण ठरलें? हिंदु लोकांचें हें नुकसान पश्चिमेच्या संसर्गामुळें झालें; म्हणून पाश्चिमात्य देश आणि त्यांतल्या त्यांत युरोपखंड हेंच हिंदुस्थानाला मारक ठरलें नव्हे काय? येथें आम्ही फक्त आरोग्याच्या दृष्टीवर विशेष जोर देत आहों, याचें कारण मिस् मेयोनें सर्वांत त्या दृष्टीला जास्त महत्व दिलेलें आहे. दुसऱ्या ज्या अनेक बाबींत युरोपखंड हिंदुस्थानाला मारक झालेला आहे—म्हणजे हिंदी उद्योगधंद्याला, हिंदी पौरुषाला, इतकेंच नव्हे तर हिंदी लोकांच्या उदरनिर्वाहाला—त्या सर्व बाबी सध्या बाजूस ठेवूं.

'फिरंगी रोग' म्हणून वाचकांनीं एका रोगाचें नांव ऐकलें असेल. हा रोग म्हणजे 'उपदंश' होय. तो हिंदुस्थानाला युरोपियन लोक येण्यापूर्वीं कधींच माहीत नव्हता; एवढेंच नव्हे तर तो युरोपियन लोकांनींच हिंदुस्थानांत आणून सोडलेला आहे, आणि म्हणूनच त्याला फिरंगी (म्हणजे युरोपियन) रोग असें म्हणतात. या विधानाला आमच्यापाशीं हिंदुस्थानांतल्या एका ब्रिटिश मेडिकल ऑफिसरचा आधार आहे.

अतएव कोणत्याहि दृष्टीनें विचार करतां, गतकालचा अनुभव अगदीं निर्विवाद सिद्ध करीत आहे कीं, हिंदुस्थान हें कधीं काळीं जगाला, किंवा युरोपखंडाला किंवा अमेरिकेला 'काळ' होण्याची तर गोष्ट दूरच पण उलट युरोप आणि अमेरिका हें मात्र हिंदुस्थानाला 'काळ' झाले आहेत आणि पुढें होतील। याच्या उलट काय पुरावा असेल तर तो मिस् मेयो आणि तिचे मोठ्यांत मोठे कोणी साथीदार असतील त्यांनीं पुढें आणावा असें आमचें त्यांना आव्हान आहे.

हिंदी लोकांना जगाच्या दृष्टीनें अगदीं हलकें करून सोडण्याकरितां मिस् मेयोनें अगदीं भयंकर विषारी बुद्धीनें अनेक वेळां अॅबे जे. ए. डुबॉय नांवाच्या एका कॅथोलिक पंथी मिशनरीनें लिहिलेल्या पुस्तकांतून उतारे घेतलेले आहेत. म्हणून त्याच लेखकानें युरोपियनांशीं तुलना करतां हिंदू लोक आणि त्यांची संस्कृति यांजबद्दल काय म्हटलें आहे त्याचे एक दोन उतारे देऊन हें प्रकरण संपवितों. प्रत्येक समाजांत सामाजिक दुराचार हे असावयाचेच, त्याप्रमाणें हिंदुस्थानांतहि ते असल्याचें फादर डुबॉय यांनीं दाखविलें आहे. परंतु राष्ट्रा-राष्ट्रांची तुलना करतांना, ते काय म्हणतात पहा. तारीख १५ डिसेंबर १८२० च्या एका पत्रांत ( एका ख्रिस्ती मिशनरीचीं पत्रें ) ते म्हणतातः—

" अलीकडे एक असें बोलण्याची टूम निघाली आहे कीं, हिंदु लोकांच्या सामाजिक संस्थांमध्यें आणि त्यांच्या संस्कृतीमध्यें ' सुधारणा' घडवून आणावी. आणि त्याबद्दल ज्याची त्याची स्वतःची म्हणून निरनिराळी योजना चालली आहे. पण आपण एक क्षणभर जर आपली युरोपियन दृष्टि आणि युरोपियन पूर्वग्रह बाजूस ठेवून थोड्याशा निःपक्षपातपणानें हिंदुलोकांसंबंधानें विचार करूं लागलों तर आपणास बहुधा असें दिसून येईल कीं, ज्या ज्या चांगल्या म्हणून गोष्टी आहेत त्यांत हिंदु लोक जवळ जवळ आमच्या बरोबरीचे आहेत, आणि जें काय वाईट म्हणून आहे त्याच्यांतच काय ते आमच्याहून कमी आहेत ! "

त्याच पत्रांत ते पुढें म्हणतातः—

" शिक्षणांत, रीतीभातींत, कलानैपुण्यांत आणि सामाजिक कर्तव्यें पारपाडण्यांत, मला वाटतें, हिंदु लोक कांहीं युरोपियन राष्ट्रांहून वरिष्ठ दर्जाचे आहेत, आणि कमी असे तर कोणाहूनहि नाहींत."

पुढें त्यांनीं आपलें स्पष्ट मत म्हणून असें सांगितलें आहे कीं—

" जर आपण युरोपांतून आणि हिंदुस्थानांतून, दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडलेल्या लोकांच्या सारखी संख्या घेतली तर त्यांत हिंदुस्थानापेक्षां युरोपियन बाजूलाच निगरगट्ट शठांची संख्या अधिक आढळून येईल."

हें मत हिंदु लोकांना चांगलें म्हणण्याकडे कल नसलेल्या माणसाचें आहे हें त्यांत विशेष आहे. त्याच पत्रांत त्यांनीं अगदीं मोकळ्या मनानें कबुली दिलेली आहे कीं,

" हिंदुलोकांसंबंधाच्या माझ्या लेखनांत जर कांहीं दोषार्ह म्हणून असेल तर तें हें कीं, माझ्यापेक्षां निःपक्षपाती माणसानें कदाचित् ज्या गोष्टींची स्तुति केली असती त्या गोष्टी मी फाजील कठोरपणानें वाईट म्हणून म्हटलेल्या आहेत."

---

प्रकरण तिसरें.

## सव्वा हात गप्पा !



मिस् मेयोनें चार पांच महिन्यांत आपली 'पाहणी' संपविली, आणि तेवढयावर ती म्हणते कीं, हिंदी कुटुंबांतल्या अगदीं अंतर्गत गोष्टींसंबंधानेंहि बोलण्याची आपली तयारी आहे. यावर आम्ही एवढेंच विचारतों कीं, ही गोष्ट निदान शक्य कोटींतली तरी आहे काय ?

हिंदुस्थान हा एक विस्तीर्ण खंडवजा देश आहे. त्यांत राहणारे लोकहि निरनिराळ्या मानववंशाचे आहेत. एकटा हिंदुधर्मीय वंश घेतला तरी त्याच्यांत असंख्य जाती आणि पोटजाती आहेत; आणि त्यांच्या चालीरीतींत पुनः जमीन अस्मानाचें अंतर आहे. नुसतीं मोठमोठीं महत्वाचीं आणि सृष्टिसौंदर्याचीं स्थानें पाहूं म्हटलें तरी प्रवासांतच महिनेच्या महिने जातील. मग सामाजिक जीवन— तेंहि अनेक प्रकारचें आणि अनेक दर्जाचें—अगदीं बारकाईनें पहावयास त्याच कामांत तरबेज झालेल्या इसमालासुद्धां किती काळ लागेल याची कल्पना करा !

पण इकडे मिस् मेयोनें तर आपण केवढी विलक्षण सर्वगामी चवकशी केली याचें कसें अद्भुत वर्णन केलें आहे पहा ! ती म्हणतेः—" हिंदुस्थानच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंतचा हा सर्व प्रवास, आणखीहि बराच प्रवास, मी केला. प्रत्येक ठिकाणीं माझें हिंदी आणि ब्रिटिश अशा दोन्ही प्रकारच्या आणि सर्व दर्जाच्या अधिकाऱ्यांबरोबर बोलणें झालें. त्यांजबरोबर मी शहरांत किंवा खेड्यांत जेथें त्यांचें काम असेल तेथें गेलें, ते काय काम करतात आणि कसें करतात हें पाहिलें. मी निरनिराळ्या प्रकारचीं आणि निरनिराळ्या ठिकाणचीं दवाखानें पाहिलीं, तेथल्या डॉक्टरांकडून सर्व कांहीं माहिती घेतली, तेथली सर्व परिस्थिति पाहिली आणि रोग्यांची माहिती काढली. नॉर्थवेस्ट फ्रंटिअर चे

मद्रासपर्यंत सर्व ठिकाणचा प्रदेश मी पाहिला, जिल्ह्याच्या कमिशनरबरोबर त्याच्या फिरतीवर जाऊन त्याचें बहुरंगी काम पाहिलें, कधीं कधीं खेड्यांत शेतकऱ्यांबरोबर बसून त्यांच्या पंचायती कशा चालतात हें पाहिलें. म्युनिसिपल बोर्डांच्या सभांस हजर राहिलें, कोर्टांत खटले चालू असतां जाऊन तेथला तो सर्व थाटमाट पाहिला. इंग्रज सुइणींबरोबर मी भर बाजारहाटीच्या जागीं, घरापुढील अंगणांत, घरांतल्या आंतल्या भागांत आणि गच्चीवर देखील—काम पडेल त्या ठिकाणीं गेलें. तशीच मीं श्रीमंतांचींहि घरें आंतून पाहिलीं. बाळंतिणीची शुश्रूषा कशी चालते, मुलांबाळांची आणि आजारी माणसांची कशी काळजी घेतात, अन्न किती काळजीपूर्वक रक्षण करतात, आणि स्वच्छतेला कितपत महत्व दिलें जातें, इत्यादि गोष्टी मी लक्षपूर्वक पाहिल्या. निरनिराळ्या जातींच्या आणि उचनीच वर्गांतल्या लोकांची वैयक्तिक राहणी प्रवासांत तसेंच रोजच्या घरच्या व्यवहारांत कशी असते हें मी पाहिलें. मी शेतवाडीचीं ठिकाणें आणि गुरांच्या गोठवण्या प्रत्यक्ष पाहून शेतीची आणि गुराढोरांची कशी व्यवस्था लाविली जाते हें पाहिलें. हिंदी दानशूर लोकांनीं स्थापना केलेल्या पांजरापोळांची मी माहिती काढली. मी शाळा पाहिल्या, आणि शिक्षक व विद्यार्थी यांच्याशीं त्यांचा अनुभव काय, ध्येय काय, इत्यादिसंबंधानें चर्चा केली. मध्यवर्ती आणि प्रांतिक कायदेमंडळांच्या बैठकांस हजर राहून, तेथें जमलेल्या निरनिराळ्या जातींच्या आणि पक्षोपपक्षांच्या मानसिक दर्जा ओळखला. मी संधि साधून मोठमोठ्या हिंदी गृहस्थांच्या मुलाखती घेतल्या. यांत राजेमहाराजे, राजकारणी पुरुष, सरकारी कामगार, धार्मिक पुढारी, असे निरनिराळ्या वर्गांचे लोक होते. त्यांनीं अगदीं खुल्या अंतःकरणानें हिंदी जनतेच्या शारीरिक आणि मानसिक स्थितीबद्दल आपलें मत व्यक्त केलें, तें मी स्वतः पाहिलेल्या स्थितीशीं ताडून पाहतां अगदीं अव्वल दर्जाचा पुरावा म्हणून ठरलें. "

अशी ही मिस् मेयोनें आपल्या चौकशीकरितां योजलेल्या साधनांची अद्भुत हकीगत आहे! कितीहि तरबेज आणि विचक्षण मनुष्य असो, आणि त्याला कितीहि भरपूर साहाय्य असो, त्याला अशा तऱ्हेच्या सर्वगामी चवकशीला वर्षांचीं वर्षे पुरणार नाहींत. पण मिस् मेयोला तें सर्व कांहीं एखाद्या अद्भुत चमत्काराप्रमाणें हिंवाळ्याच्या चार पांच महिन्यांतच साध्य होऊन गेलें !

यावरून एकच निष्कर्ष निघतो. तो हा कीं, एक तर तिनें आपण एवढा शोध केल्याची मारलेली बढाई सर्व खोटी आहे, किंवा तिनें रस्त्यानें जातां जातां

मिळाल्या तशा गोळा केलेल्या गोष्टी पुराव्याच्या अभावीं इतक्या कुचकामाच्या आहेत कीं, त्यांवरून कसलाच निष्कर्ष काढणें शक्य नाहीं.

हें एक दोन उदाहरणांनींच स्पष्ट होईल. मिस् मेयो म्हणते कीं, आपण कायदे-मंडळें जाऊन पाहिलीं. हिंदुस्थानांत अशीं जाऊन पाहण्यासारखीं कमींत कमी आठ तरी कायदेमंडळें आहेत; तीं मिस् मेयोनें पाहिलीं असें आपण धरून चालूं. पण नुसतें या कायदेमंडळांत कसें काय काम चालतें याचीच पुरती कल्पना याव-यास सतत महिनाभर एका अधिवेशनास हजर राहिलें पाहिजे, मग त्यांत काय काय निरनिराळे घटक आहेत, त्यांचा 'मानसिक दर्जा' उच्च आहे कीं नीच आहे, इत्यादि गोष्टींची कल्पना येणें तर दूरच! मिस् मेयोनें दर मंडळास पंधरवडाच द्यावयाचा असें ठरवलें असतें तरीदेखील तिला तेवढयाच कामाला चार महिने लागले असते. मग तिची हिंवाळ्यांतली इतर चौकशी तर अजीबादच राहून गेली असती!

दुसरें उदाहरण, समजा तिनें १०० रुग्णालयें पाहिलीं. एक रुग्णालय बारकाईनें पहावयास खास एक दिवस तरी पाहिजेच. पण आपण धरून चालूं कीं तिला दर दिवशीं दोन रुग्णालयें तपासतां आलीं. शिवाय तिजकरितां आपण हीहि गोष्ट सोडून देऊं कीं, हिंदुस्थानांतली रुग्णालयें, शहरें वजा करतां, एकमेकांपासून फार दूर असतात, आणि एकाहून दुसऱ्याकडे जावयास बराच वेळ लागतो. तरीदेखील तिला १०० रुग्णालयें पहावयास ५० दिवस लागतील.

याशिवाय मिस् मेयोच्या चवकशींत बाजारहाटीच्या जागा आहेत, हिंदी कुटुंबांच्या घराचे आंतले भाग आहेत, खेड्यापाड्यांतल्या पंचायती आहेत, देवळें आहेत, सर्व कांहीं आहे. समजा हीं सर्व मिळून २०० ठिकाणें होतात. तशांत ती ह्या ठिकाणीं नुसती नांवाला जाऊन आली होती असेंहि नव्हे. तिनें ओळखी केली, संभाषणें केलीं, चर्चा केली, प्रश्न विचारले, नवीन माहिती मिळविली. असलीं कामें कोणाहि मनुष्यास दिवसांतून चारांहून अधिक ठिकाणीं करतां येतील असें वाटत नाहीं. अर्थात् तिच्या चवकशीच्या या भागालाच कमींत कमी ५० दिवस लागतील.

याशिवाय तिनें अनेक आरोग्यखात्यांवरील अधिकाऱ्यांच्या, शिक्षकांच्या, डॉक्टरांच्या मुलाखती घेतलेल्या आहेत. इतकेंच नव्हे तर खासगी रीतीनें मोठमोठ्या राजेमहाराजांशीं, राजकारणी पुरुषांशीं, सरकारी अधिकाऱ्यांशीं, धार्मिक

पुढाऱ्यांशीं, प्रश्नोत्तरें करावयाचे तिनें प्रसंग साधून घेतले आहेत. या कामालाहि पुनः आणखी ५० दिवस लागतील.

दुसरे आणखी तिचे चवकशीचे मार्ग राहिले आहेतच, पण ते आपण सोडून देऊं. तरी देखील ती सांगते तेवढ्या काळांत, आणि तिला पाहिजे होती ती साधनसामग्री प्रत्येक ठिकाणीं लोकांनीं अगदीं जय्यत तयार करून ठेविली होती अशी कल्पना करूनहि, तिचें हें काम संपर्णे सर्वथैव अशक्य दिसतें.

याचा परिणाम असा झाला आहे कीं, तिचें पुस्तक म्हणजे अथपासून इतीपर्यंत खोट्या गोष्टींचें, चुकीच्या कल्पनांचें, आणि निराधार निष्कर्षांचें निव्वळ एक बाड होऊन राहिलें आहे. जेथें कांहीं गोष्टी कांहीं प्रमाणांत सत्य मानतां येतील अशा आहेत, तेथेंसुद्धां त्या भलतीकडे वळवून विद्रूप करून टाकल्या आहेत. पुस्तकांत पहावयाचें तें एवढेंच—कल्पनाशक्तीची अमर्याद भरारी, आणि हुबेहूब चित्र उभें करणारें लेखन! असलें लेखन करणाऱ्यांचा अमेरिकेंत एक "कुविख्यात" वर्गच तयार झालेला आहे.

मिस् मेयोनें हिंदुस्थानांत वरवर पाहून काढलेला निष्कर्ष कितपत बरोबर आहे हें पहावयास, एखाद्या हिंदी गृहस्थानें इंग्रज समाजांत सर्वांदेखत चालणारा चुंबनविधि आणि स्त्रीपुरुषांची मोकळेपणाची वागणूक पाहून 'इंग्रज लोक इंद्रियसुखांत लोळणारे वैषयिक लोक आहेत आणि इंग्रज स्त्रिया नित्याच्या व्यभिचारी आहेत' असा काढलेला निष्कर्ष विचारांत घ्यावा म्हणजे झालें; आम्हांला तर वाटतें पहिल्याहून दुसराच कमी चुकीचा ठरेल.

जातां जातां मिस् मेयोला आम्ही असें विचारतों कीं, बाईला जर खरोखरच सत्याची चाड होती तर तिनें आपल्या बऱ्याचशा मुद्यांवर महात्मा गांधी किंवा रवींद्रनाथ टागोर यांचें मत कां घेतलें नाहीं? आपण मोठमोठ्या वजनदार माणसांच्या मुलाखती घेतल्या अशी ती बढाई मारते, पण त्या सर्वांची नांवें मात्र सांगत नाहीं! ज्यांचीं तिनें नांवें दिलेलीं आहेत, ते तर सामान्य मनुष्य म्हणून हिंदुस्थानांत समजले जातात, आणि त्यांतल्या बऱ्याच जणांनीं आपल्या तोंडीं मिस् मेयोनें भलतेच विचार घातले आहेत असें सांगून तिच्या विधानांचा इनकार केलेला आहे.

घरें असो. पण तिनें डॉ. रवींद्रनाथ आणि महात्मा गांधी यांच्यासारख्या हिंदुस्थानच्या अत्यंत श्रेष्ठ व्यक्तींची मुळींच गांठ घेऊं नये, हें खरोखर चमत्कारिक नव्हे काय? आणि गांठ घ्यावयाचें टाळून पुनः उलट त्यांच्या तोंडीं त्यांनीं

न म्हटलेल्या गोष्टी, त्यांनीं कधींहि प्रदर्शित न केलेले विचार, कधीं मनांतहि न आणलेल्या कल्पना, अगदीं नेमक्या धलाव्या हें त्याहूनहि चमत्कारिक नव्हे काय?

मिस मेयो म्हणते कीं आपण इकडे सामाजिक गोष्टींची चवकशी करण्याकरितां आलें. पण हिंदी लोकांच्या चालीरीतींची माहिती घ्यावयास आलेला एकहि इंग्रज किंवा अमेरिकन गृहस्थ श्रीयुत कामाक्षी नटराजन् यांना भेटल्याशिवाय राहत नाहीं. नटराजन् हे 'इंडियन् सोशल रिफॉर्मर' वर्तमानपत्राचे विद्वान् संपादक आहेत; गेल्या ४० वर्षांत हिंदुस्थानांत काय काय सामाजिक चळवळी झाल्या त्या ते सतत लक्षपूर्वक पाहत आलेले आहेत; हिंदु लोकांतील दुष्ट सामाजिक चालीरीतींचीं कारणें आणि दुष्परिणाम यांचा त्यांनीं चांगला अभ्यास केलेला आहे; थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, ते हिंदु सामाजिक चालीरीतींसंबधानें मत घ्यावयास सर्वमान्य अधिकारी गृहस्थ आहेत. त्यांना मिस मेयोनें अचूक कां टाळलें? त्यांच्याबरोबर तिनें मागाहून पुस्तकांत उपस्थित केलेल्या प्रश्नांसंबंधानें चर्चा कां केली नाहीं? आपल्याला पाहिजे ती माहिती मिळविण्यांत तिनें त्यांचें सहाय्य कां मागितलें नाहीं?

उलट, ती सरकारी अधिकाऱ्यांच्या मध्यस्थीनें सी. आय्. डी. च्या लोकांची मात्र मदत मागावयास गेली असें अलीकडे बाहेर आलेलें आहे. हिंदु धर्म, हिंदु तत्वज्ञान, हिंदु शास्त्रें, इत्यादि अनेक विषयांची माहिती तिला या असल्या लोकांनीं पुरविलेली आहे, आणि तिच्यावर मग तिनें आपली इमारत उभारली आहे।

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे मिस मेयो जाचें त्यांजकडे मुळींच गेली नाहीं; ती भावरली; कारण मग तिनें हिंदुस्थानांत पाय टाकण्यापूर्वीच डोक्यांत गृहीत धरून ठेवलेल्या कल्पना चुकीच्या ठरावयाच्या। दुसरी गोष्ट, तिनें 'जमविलेली' माहिती; ती केवळ वरवरचीच असूं शकेल हें आम्ही वर दाखविलेंच आहे. तिला तिनें बाजारगप्पांची भर दिली, मग आपली ती लेखनकला चालविली, आणि हें सर्व मिळून असें चित्र उभें केलें कीं, जें एकजात खोटें आणि जें तिलाहि, ती स्वतःची फसवणूक करून घेत नसेल तर, ठाऊक आहे कीं एकजात खोटें। भलतीकडून घेतलेली माहिती, खऱ्या म्हणून मानलेल्या निष्फळ बाजारगप्पा, आणि काळें करण्याकरितां यथास्थित ओतलेला मनचा काळाकुट रंग, यांजवर हें 'मदर इंडिया' बनलेलें आहे; इतकें दुष्ट पुस्तक जगांत आजवर झालें नाहीं।।

---

प्रकरण चवथें.

# सरकार कसें का असेना ! !



मिस् मेयो म्हणतेः—" ब्रिटिश लोकांचा हिंदुस्थानांतला राज्यकारभार बरा वाईट कसाहि असो, त्याचा वर सांगितलेल्या परिस्थितीशीं काडीचाहि संबंध पोंचत नाहीं. मानसिक जाड्य, किंकर्तव्यमूढता, स्वतः होऊन पुढें सरण्याची आणि नवीन कल्पना काढण्याची असमर्थता, मानसिक आणि शारीरिक स्थैर्याचा अभाव, उत्साहशून्यता, चैतन्यशक्तीचाच कमकुवतपणा—हीं व्यंगें आजच्याच हिंदी लोकांचीं नसून त्यांच्या प्राचीन इतिहासांतहि हाच प्रकार आढळतो. "

समजा कीं हिंदी लोकांच्या डोक्यावर लादलेलीं हीं सर्व व्यंगें त्यांच्यांत आहेत, आणि त्यांचें प्रमाणहि मिस् मेयो वाचकांस समजावीत आहे तितकें आहे; पण या व्यंगांत कांहींच फरक करण्याचें सामर्थ्य, सबंध जनतेच्या नाड्याचीं सूत्रें हालविणाऱ्या सरकारांत नाहीं, असें कसें म्हणतां येईल ? मिस मेयो ही युनायटेड् स्टेट्स सारख्या सुधारलेल्या राष्ट्राची एक बुद्धिमान् नागरिक म्हणवीत असून तिची सरकारच्या कार्यक्षेत्रासंबंधानें आणि वजनासंबंधानें इतकी कोती कल्पना असावी हें नवल होय.

एखादा सामान्य मनुष्यसुद्धां सांगेल कीं, जर सरकार " चांगलें " असेल, आणि तें प्रजेच्या कल्याणार्थ अंतःकरणपूर्वक झटत असेल, तर त्याच्या हातून सामाजिक, राजकीय, आणि नैतिक सुधारणेसंबंधानें केवढें तरी कार्य होईल. जपानचेंच उदाहरण घ्या. सुमारें ७५ वर्षांपूर्वी त्या सरकारांत प्रमुख स्थानीं कांहीं दूरदर्शी पुरुष होते. त्यांनीं राज्ययंत्राची नवीन घडी बसवून तें विस्तृत केलें. आणि त्यांत शीघ्र अभ्युदयाचें तेज ओतून, सबंध राष्ट्राची मनोभूमिका पार बदलून टाकिली. त्यांच्याच प्रयत्नांमुळें जपानची अवघ्या तीस वर्षांत उन्नति होऊन तें अत्युच्च सुधारलेल्या आधुनिक राष्ट्रांच्या मालिकेंत बसलें. आणि आज त्याचें सामर्थ्य अगदीं पहिल्या प्रतीचें झालेलें असून त्याबद्दल युनायटेड् स्टेटसला दिवसेंदिवस अधिकाधिक हेवा वाटत चालला आहे. इतक्या ह्या गोष्टी सरकार चांगलें असल्यानें होतात.

सरकार वाईट असेल, किंवा धड चांगलें नाहीं वाईट नाहीं असें असेल, तर जनता मूळच्याच आपल्या खालावलेल्या स्थितींत राहील. ब्रिटिशांचा हिंदुस्थानांत राज्यकारभार आज १५० वर्षें चाललेला आहे. तथापि मिस मेयोच्याच दाखल्यावरून दिसतें कीं, जनतेचें मुळींच पुढें पाऊल पडलेलें नाहीं. यावरून कोणीहि समंजस मनुष्य काय निष्कर्ष काढील? अर्थात् हाच कीं हिंदुस्थानचा ब्रिटिश राज्यकारभार वाईट, किंवा धड वाईट नाहीं धड चांगलाहि नाहीं, असा चालत आलेला आहे. हिंदुस्थानांत सामाजिक काम करणाऱ्या बहुतेक पाश्चात्य लोकांनीं त्याला दुसऱ्या प्रकारचा म्हटलेलें आहे. कारण त्यांना असें आढळून आलें कीं, *ब्रिटिश लोकांना हिंदुस्थानची काळजी फक्त एवढीच कीं आपला* व्यापार कायम राहून कसा वाढेल, आणि आपली राजकीय सत्ता कायम कशी टिकेल. सर्व शक्ति आणि सर्व उद्योग केवळ ब्रिटिश सत्तेच्या या एका ध्येयासाठीं चाललेले आहेत. मि. मेह्यू देखील आपल्या अलीकडे प्रसिद्ध झालेल्या "हिंदुस्थानांतील शिक्षण" या पुस्तकांत उघड सांगतात कीं, ब्रिटिश सरकारनें सामान्य *जनतेच्या सामाजिक सुधरणेकडे मुळींच लक्ष दिलेलें नाहीं.*

या प्रश्नाचा विस्तारपूर्वक विचार आम्ही पुढें करणार आहों. सध्यां वाचकांनीं एवढेंच ध्यानांत घ्यावें कीं, सरकार जर आपला कारभार सतत त्या दृष्टीनें चालवील तर त्याच्यासारखें जनतेची नैतिक, सामाजिक, आणि राजकीय सुधारणा करणारें दुसरें साधन नाहीं. सरकार, विशेषतः केंद्रीभूत असलेलें सरकार चांगलें, वाईट, किंवा तटस्थ जसें असेल तसा त्याचा प्रजेवर परिणाम झाल्याशिवाय राहत नाहीं. सरकार हें उघड उघड लोकांसाठीं आहे. सरकारचा कारभार आणि रयतेची सुधारणा यांचा संबंध न ओळखण्याइतकें मिस् मेयोचें अज्ञान पाहून मोठी मौज वाटते. अथवा ही कदाचित् हिंदी रयतेची सुधारणा करण्याच्या जबाबदारींतून ब्रिटिश सरकारला मुक्त करण्याचीहि तिची युक्ति असेल! असो.

मिस् मेयोचा मुद्दा असा आहे कीं, "मानसिक जाड्य, किंकर्तव्यमूढता, स्वतः होऊन पुढें सरण्याची आणि नवीन कल्पना काढण्याची असमर्थता, इत्यादि" हीं सर्व हिंदी मानववंशांत आंगचींच आहेत, आणि तीं "केवळ आजच्याच हिंदी माणसांत दिसतात असें नसून प्राचीन इतिहासांतहि हाच प्रकार आढळतो."

यावर आतां आजचा काल सोडून प्रथम आपण प्राचीन इतिहासकालाबद्दल पाहूं. त्या काळांत हिंदु लोक जगांतल्या इतर लोकांहून किती साहसी आणि दीर्घोद्योगी होते हें आम्ही वर २ ऱ्या प्रकरणांत मेजर मुन्रो आणि कर्नल टॉड्

यांचे उतारे देऊन दाखविलें आहे. आणखी शेंकडों उतारे हिंदु लोकांच्या गतेतिहासाचें सांगोपांग अध्ययन केलेल्या पाश्चात्य पंडितांच्या ग्रंथांतून आम्हांस देतां येतील, पण स्थलाभावामुळें तसें करणें इष्ट नाहीं. अलीकडे झालेल्या संशोधनावरून असें सिद्ध झालें आहे कीं, हिंदु लोक हे मोठे वसाहती लोक असून, त्यांनीं दूरदूरच्या ठिकाणीं जाऊन वसाहती स्थापन केल्या होत्या. जावा, माडागास्कर, आणि सुमात्रा, येथें अद्यापि हिंदु लोकांची बरीच संख्या आहे.

प्राचीन हिंदु लोक व्यापारांत आणि उद्योगधंद्यांतहि मोठे साहसी होते. त्यांचें व्यापारी नौसाधन दुसऱ्या कोणत्याहि देशाहून कमी नव्हतें, असें सुप्रसिद्ध प्राच्यविद्याविशारद डॉ. राधाकुमुद मुकर्जी यांनीं दाखविलें आहे. त्यांचीं गलबतें तत्कालीन ज्ञात जगाच्या सर्व भागांत फिरत असत; सागराच्या प्रचंड लाटांना ते जुमानीत नसत !

दोन शतकांपूर्वी हिंदुस्थान हें उद्योगधंद्यांत भरभराटलेलें राष्ट्र असे. ब्रिटिश बेटांसकट बहुतेक सर्व युरोपखंडांत हिंदुस्थानांतून कापूस आणि रेशीम यांच्या तयार केलेल्या मालाचा भरपूर पुरवठा होत असे. त्याचप्रमाणें देशांत प्रचंड कालवे खणून प्रजेला पीकपाण्याची सोय करण्याचे राजेलोकांचे उद्योग शतकानुशतकें अखंड चाललेले असत. एवंच "प्राचीन इतिहासकालांतील" हिंदी लोक फक्त तत्वज्ञान, धर्मशास्त्र, ज्योतिःशास्त्र, वगैरे शास्त्रें आणि कला यांतच काय ते निपुण होते असें नसून, साम्राज्यें उभारण्यांत आणि चालविण्यांत, उद्योगधंद्यांत, व्यापारांत, आणि परदेशीं वसाहत करण्यांतहि दुसऱ्या कोणास हार जाणारे नसत; एवढेंच नव्हे तर जगांतल्या दुसऱ्या एकूण एक राष्ट्रांवर कडी करीत असत.

हें गतकालीन साहसी वारें, आणि ही पराक्रमाची स्फूर्ति, आज तेवढ्या प्रमाणांत दिसत नसल्यास त्याचें कारण हिंदुस्थान हें गेल्या एक हजार वर्षांत परकीयांच्या जोखडाखालीं दबून जात चाललें आहे हें होय. परकी अंमल लोकांतलें तेज आंसडून धरतो, चैतन्य चिरडून टाकतो, उपजत शक्ति चालवावयास वाव देईत नाहीं, आणि पौरुषाचा विकास करावयाची संधि देत नाहीं.

यावर प्रश्न असा येईल कीं, "हिंदुस्थान परक्याच्या जोखडाखालीं मुळीं गेलेंच कसें ?" तर त्याचीं अनेक कारणें आहेत. कदाचित् असें असेल कीं, सुधारणा आणि कलाकौशल्य यांच्या संस्कृतीबरोबर क्षात्रतेज थोडथोडें कमी होत गेलें. हें असें

कसें होतें हें पहावयास एवढया मोठ्या प्रचंड रोमन साम्राज्याची काय गत झाली आणि तें उत्तरेकडील पुंड लोकांच्या टोळ्यांच्या टोळ्या येऊन आघातांवर आघात केल्याबरोबर कसें कोलमडून पडलें याचा विचार करावा म्हणजे झालें.

लोकांमध्यें सुधारतां सुधारतां नाजूकपणा येऊं लागला कीं, त्यांच्यांतलें शिपाईगिरीचें बळ बहुधा कमी होत जातें, आणि मग अडाणी स्थितींत पाशवी बळ आणि तेज आहे तसेंच बाळगून राहिलेले दुसरे लोक त्यांना सहज जिंकूं शकतात. उदाहरणार्थ, इंग्रज इसम कधींहि कबूल करणार नाहीं कीं, जर्मन आपणाहून संस्कृतीमध्यें वरच्या दर्जाचा आहे; पण जर का त्यानें गेल्या महायुद्धांत दाखविलें तसें वरिष्ठ शारीरिक बळ आणि क्षात्रतेज दाखविलें तर मग इंग्रज ताबडतोब म्हणूं लागेल कीं, "अंः! कसचा जर्मनचा वरचढपणा! केवळ पाशवी गुणांचा आहे झालें!" समजा कीं, गेल्या महायुद्धांत इंग्लिश लोक हरले असते; समजा कीं, ज्या हिंदी सैनिकांनीं अगदीं ऐन वेळीं अघाडीवर जाऊन जर्मन लोकांच्या सुरवातीच्या भयंकर धडाडीला सरसहा बळी पडून तेवढया अवधींत तिकडे इंग्लंड व फ्रान्स या देशांत तयारी होई तों जर्मनीला थोपवून धरलें, ते हिंदी सैनिक तिकडे तसे मुळीं गेलेच नसते; समजा कीं, हिंदी सैन्यानें इंग्लंडचा बचाव केला नसता (इंग्रज हें सर्व आतां कृतघ्नपणानें विसरून गेले आहेत!) आणि इंग्लंड देश जर्मन तरवारीला बळी पडून जर्मनीचा अंकित होऊन राहिला असता; तर तेवढयावरून जर्मनीची संस्कृती इंग्लंडच्या संस्कृतीहून वरिष्ठ दर्जाची आहे असें इंग्रजांनीं म्हटलें असतें काय? उलट, आपला पराजय केवळ जर्मनांकडे पाशवी शक्ति जास्त होती म्हणून झाला असेंच त्यांनीं म्हटलें नसतें काय?

सांगावयाचें तात्पर्य हें कीं, परकी अंमल राष्ट्राचा अधःपात करतो; त्याचें पौरुष नष्ट करून, त्याची राष्ट्रीय वृत्ति खालीं खेंचतो; लोकांत असलेले साहस, स्वयंस्फूर्ति इत्यादि गुण नाहींसे करून त्यांना असहाय आणि निराश बनवितो. मग आज हजार वर्षांच्या परकी अंमलाखालीं राहून हिंदी लोक आजच्या या स्थितींत पोंचले असले तर त्यांत आश्चर्य तें काय? उलट आश्चर्य मानावयाचें तर हें कीं, एवढया परकी अंमलाखालीं राहून देखील हिंदु लोकांत अद्याप त्यांचें मूळचें तेज दिसत आहे! आणि जर खरें राष्ट्रीय हितदर्शी राज्य असेल, तर हिंदी लोक थोडक्याच काळांत, इतर राष्ट्रांनीं पटकाविलेलें स्थान त्यांजबरोबर जोडीनें बसून पटकाविल्याशिवाय राहणार नाहींत यांत तिळमात्र शंका नको.

---

प्रकरण पांचवें.

# संधि मिळेल तर !



परकी अंमलाचे देशावर आणि लोकांवर सर्वसाधारणपणें काय अनिष्ट परिणाम होतात, हें आम्ही गेल्या प्रकरणांत सांगितलें. तसेंच, हिंदी मनोवृत्ति-जिचा मुख्य घटक मिस् मेयोच्या म्हणण्याप्रमाणें आपणहून अंगावर कार्य न घेण्याकडे कल हा होय—खालावली जाण्यास केवळ एक हजार वर्षांचें परकीय राज्य एवढेंच कारण कसें पुरे आहे हेंहि दाखविलें. या प्रकरणांत आम्ही हे दुष्परिणाम ब्रिटिश राजवटींत कसे विशेष प्रमाणांत वाढलेले आहेत हें दाखविण्याचें योजिलें आहे.

मागील ब्रिटिश राज्यकारभारापासून हिंदुस्थानाला काय तोटे झाले आहेत, आणि हिंदी मनोवृत्तींतील दुर्गुण त्यानें कसे वाढविले आहेत, एवढेंच काय तें आम्ही मोठ्या विशेष उत्साहानें आणि आनंदानें दाखवीत आहों, आणि ब्रिटिशांशीं संबंध जडल्यापासून हिंदुस्थानचे जे फायदे झाले आहेत ते आम्ही नाकबूल करीत आहों, असा प्रश्न नाहीं. कायद्याचें अनिर्बंध साम्राज्य,—हें अद्याप पूर्णावस्थेस पोंचलेलें नाहीं तरी—आणि निःपक्षपातपणें केलेलें न्यायदान, हे दोन फायदे हिंदुस्थानाला ब्रिटिश राज्यापासून मिळाले आहेत हें निर्विवाद होय. पण या फायद्याबरोबर जे ब्रिटिश राज्यापासून हिंदुस्थानचे तोटे झालेले आहेत, आणि जे ब्रिटिशांपूर्वीच्या मुसलमानादि राजवटींत हिंदुस्थानाला भोगावे लागले नाहींत, त्याजकडे दुर्लक्ष करता येत नाहीं. या तोट्यांचा हिंदी लोकांच्या मनोवृत्तीशीं प्रत्यक्ष संबंध आहे; आणि युनायटेड किंग्डम्‌मधील व ब्रिटिश साम्राज्यामधील सर्व ठिकाणच्या ब्रिटिश लोकांनीं, तसेंच जगांतल्या इतर राष्ट्रांनीं आणि मानववंशांनीं देखील ही गोष्ट माहीत करून घेणें जरूर आहे कीं, हिंदी मनोवृत्तींतील कित्येक दुर्गुणांची जी वाढ झालेली आहे ती, हिंदुस्थानचा ब्रिटिश राज्यकारभार ज्या पद्धतीनें हांकला जातो ती पद्धत, आणि जो हेतु मनांत धरून तो हांकला जातो तो हेतु, या दोहोंमुळें झालेली आहे.

मुसलमान लोकांनीं हिंदुस्थान देश जिंकला होता खरा, परंतु जिंकल्यावर ते येथेंच राहिले, आणि त्यांनीं हिंदुस्थान हेंच आपलें घर केलें. त्यामुळें हिंदुस्थानचा पैसा हिंदुस्थानाच्या बाहेर गेला नाहीं. हिंदुस्थान हें आपलें घर करून, त्याच्या कल्याणांत त्यांनीं आपलें मन घातलें. हिंदुस्थानची शेती, हिंदुस्थानचे

उद्योगधंदे, आणि हिंदुस्थानचा व्यापार त्यांनीं वाढवीत नेला. हिंदूंना त्यांच्या राज्यांत कोणत्याहि हुद्यापर्यंत चढतां येत असे. मोंगलांच्या राज्यांत अत्यंत विश्वासाचे सेनापति हिंदु होते. बहुतेक सगळ्या मुसलमानी राज्यांत,—मग तीं दक्षिणेंतलीं असोत, त्याहूनहि खालच्या दक्षिण मुलुखांतलीं असोत, किंवा बंगालमधील असोत—हिंदू हे विश्वासपात्र समजले जात, आणि त्यांना राज्यांत उच्च अधिकाराच्या आणि जबाबदारीच्या जागा मिळत. म्हणजे, देशांतल्या कोणाहि इसमास राजपद सोडून दुसरें कोणतेंहि पद मिळवावयास मोकळें क्षेत्र होतें. ह्यामुळें वैयक्तिक कार्यशक्ति आणि मनोवृत्ति वाढवावयास आणि बळकट करावयास संधि मिळे. राष्ट्रीय वृत्ति खालावली तरी ती फार सावकाश, कारण तिचा वेग थांबविणाऱ्या तशा संधि असत.

पण तेंच ब्रिटिश राज्य आल्याबरोबर काय झालें पहा! एकदम अजीबाद गैरविश्वासाची पद्धत सुरू करण्यांत आली. एका राष्ट्राला जर दुसऱ्या राष्ट्राचें कांहीं मोठ्यांत मोठें नुकसान करतां येण्यासारखें असेल तर तें त्यास एकजात शस्त्रविहीन करणें हें होय. हें ब्रिटिश सरकारानें हिंदुस्थानांत केलें. हिंदुस्थानांत स्वसंरक्षणाचें तेजच राहूं नये, आणि लोकांनीं निर्बल व क्षीण होऊन स्वसंरक्षणार्थ सदैव ब्रिटिश लोकांवर अवलंबून रहावें, अशीच त्यांची इच्छा असावी की काय कोण जाणे. अशा तऱ्हेनें सबंध राष्ट्रास पौरुषहीन करून टाकण्याचा प्रयत्न सुद्धां ब्रिटिशांशिवाय दुसऱ्या कोणत्याहि परकी राज्यकर्त्यांनीं हिंदुस्थानांत कधीं केला नाहीं.

सर फेरोजशहा मेहतांनीं, १८८८ सालच्या अलाहाबाद काँग्रेसमध्यें हत्यारांच्या कायद्यावरील ठराव मांडतांना, सबंध हिंदी राष्ट्राला शस्त्रविहीन करणें हा केवढा मोठा भयंकर अन्याय करण्यांत आलेला आहे हें सांगून, अत्यंत संतापानें असे उद्गार काढले की, "सबंध राष्ट्राच्या राष्ट्रास पौरुषहीन करणें तुम्हांला योग्य नाहीं, आणि तुम्हांला तसें करतांहि येणार नाहीं."

दुसरी गोष्ट. ब्रिटिश लोक हे सर्वथैव परकी होत. त्यांना मुसलमानांप्रमाणें हिंदुस्थानांत कायम वस्ती करणें शक्य झालें नाहीं आणि शक्य होणार नाहीं. मुसलमानांप्रमाणें त्यांना हिंदुस्थान हें आपलें घर आहे असें वाटणें शक्य झालें नाहीं, आणि होणार नाहीं. ते बोलून चालून उघड उघड परकी लोक; त्यांचें काम म्हणजे गुन्हेगाऱ्या राखणें, स्वतःचे हितसंबंध कायम राखणें, आपल्या

राजवटीचें बळ वाढविणें, पैसे मिळविणें, आणि विलायतेस निघून जाणें ! हिंदी लोकांचें कल्याण पाहण्यांत त्यांना फायदा कोणता ?

तिसरी गोष्ट म्हणजे ही कीं, ब्रिटिश अंमलांत हिंदी लोकांना जबाबदारीच्या जागा मिळण्याची आशा नसे. ब्रिटिश राज्य १५० वर्षे झाल्यानंतर, आणि सतत चळवळ व प्रखर वाग्युद्ध चालविल्यानंतर, आतां कुठें त्या दिशेनें थोडीशी सुरवात करण्यांत येत आहे. पण ही अलीकडची प्रगति सोडून दिल्यास, असेंच आढळून येईल कीं, ब्रिटिश राजवटीनें आजवर एकहि सुविख्यात असा राजकार्यधुरंधर हिंदी इसम तयार केलेला नाहीं. याचें कारण उघड आहे कीं, कोणत्याच जबाबदारीच्या हुद्यावर कधीं हिंदी इसमास मुळीं नेमलेंच नाहीं ! अत्यंत श्रेष्ठ अशा हिंदी इसमासमुद्धां दुय्यम जागाच ठेवलेल्या ! उलट, हिंदी संस्थानांकडे पहा. त्यांजकडे हिंदी इसमांस जबाबदारीचे हुद्दे मोकळे ठेवल्यामुळें तिकडे कै. सर टी. माधवराव, दिवाणबहादुर रघुनाथराव, सर शेषाद्रि अय्यर, सर सालरजंग, यांच्यासारखे हिंदभूमीनें सदैव अभिमान बाळगावा असे महान् राजकार्यधुरंधर पुरुष निपजले.

यांत गोष्ट अशी आहे कीं, अत्यंत मोठी जबाबदारीची परिस्थिति असल्याशिवाय आपल्या गुप्त असलेल्या अत्युच कार्यशक्ति वाढतील अशी आशाच नको. अशा परिस्थितीला ब्रिटिश अंमलांत हिंदी लोकांना पारखें करून टाकण्यांत आलेलें होतें. अगदीं अलीकडे १९०६ त कै. नामदार गोखले यांनीं बजेटावर भाषण करतांना उद्गार काढले होते कीं:—

"जेव्हां सत्तेच्या, अधिकाराच्या, आणि जबाबदारीच्या सर्व जागा एकाच ( युरोपियन् ) वर्गाच्या हातीं जणूं काय मक्ताच करून दिल्याप्रमाणें असतात, तेव्हां त्या वर्गाच्या बाहेरील लोक आपण कमी आहों अशा भावनेनें दबले जाऊन, त्यांच्यांतल्या थोरांत थोर व्यक्तीला परिस्थितीपुढें नमून चालल्याशिवाय गत्यंतर नसतें."

ज्यांना १९०९ सालच्या मोर्ले-मिंटो सुधारणांचा इतिहास माहीत आहे, त्यांना आठवत असेल कीं, हिंदुस्थानच्या दर एक एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलांत एक एक हिंदी इसम नेमण्याची आपली योजना तडीस नेतांना मोर्लेसाहेबांस कोण विरोध झाला ! या बाबतींत लॉर्ड मोर्लेनीं लॉर्ड मिंटोना लिहिलेली पत्रें, लॉर्ड मोर्लेनीं आपल्या 'आठवणी'च्या २ ऱ्या भागांत प्रसिद्ध केलीं आहेत; तीं चांगलीं वाचनीय आहेत. हिंदुस्थानांतल्या सिव्हिलियनांचें आणि ॲंग्लोइंडियन लोकांचें मन

ओळखून मोर्लेसाहेब कांहींसे निंदाव्यंजक शब्दांत म्हणतातः—" तुमच्या एक्झिक्यूटिव्ह काउन्सिलमध्यें एक हिंदी इसम, ही कल्पनाच मुळीं चालण्यासारखी नाहीं. खरें ना ? मला तर खरें वाटतें, तिनें त्या स्वभावतःच घाबरट असलेल्या व्यक्तींची—अँग्लोइंडियनांची—तर घाबरगुंडीच वळली असेल ! " दुसऱ्या एका पत्रांत ते या संबंधांत इंग्लंडच्या लोकांना काय वाटत होतें त्याजबद्दल लिहितातः— " नेटिव्ह मेंबर त्यांना जिथें तिथें नडतो आहे. कुठेंहि कांहीं बोलणें चाललेलें असो, अर्थाअर्थी कांहींहि संबंध नसतां, नेटिव्ह मेंबर आपला त्यांच्या मनांत सदैव उभा ! "

दुसरी गोष्ट तर आतां सर्वांनाच माहीत झाली आहे, ती ही कीं, खुद्द बादशहा या योजनेच्या विरुद्ध असून अडयळा आणूं पहात होते. लॉर्ड रिपन् सारखा हिंदुस्थानचा हितचिंतक आणि हिंदुस्थानची बाजू उचलून धरणारा, पण तोहि साशंक झाला. यावरून गेल्या वीस वर्षांपूर्वीपर्यंत, अत्यंत श्रेष्ठ आणि राजनिष्ठ हिंदी गृहस्थांबद्दल देखील थोर थोर ब्रिटिश लोकांच्या मनांत केवढा अविश्वास वागत होता हें स्पष्ट दिसतें. मोठी भीति वाटे ती ही कीं, सरकारच्या गुप्त गोष्टी बाहेर पडतील ! मोर्लेसाहेब आपलें म्हणणें धरून राहिले, आणि त्यांचें कॅबिनेटमध्यें आणि पार्लमेंटमध्यें चांगलें वजन होतें, म्हणूनच शेवटीं त्यांना यश आलें.

ब्रिटिश राज्यानें त्यांतल्या त्यांत विशेष वाईट केलें तें हें कीं, देशांतील आर्थिक जीवन शोषून टाकून लोकांचें दारिद्य वाढविलें. हें सर्व आपण गतकाला-संबंधानें बोलत आहों, चालू कालाबद्दल नव्हे, हें विसरतां नये. दोन शतकांपूर्वीपर्यंत हिंदुस्थान हा मोठा उद्योगधंद्याचा देश असून, तो ग्रेट ब्रिटन आणि युरोप यांना वस्त्रांचा पुरवठा करीत असे, हें सर्वांना ठाऊक आहे. ब्रिटिश राज्यकर्ते जर या देशांत कायमची वस्ती करून राहिले असते, आणि मुसलमानांप्रमाणें हिंदवासीयांचा एक घटक बनून हिंदी जनतेचें आर्थिक हित तेंच आपलें असें समजले असते, तर हिंदुस्थान देशांतले उद्योगधंदे आज ब्रिटिश व्यापाराच्या हितसंबंधाच्या छायेंत मरून पडले आहेत तसे पडले नसते !

*ब्रिटिश सरकारनें इंग्लंडांत आणि हिंदुस्थानांत हिंदी उद्योगधंद्यांचें काय केलें पहा.* हिंदुस्थानची राजकीय सत्ता हातीं आली, आतां आपणास हिंदुस्थान हें *आमचा तयार माल खपविण्याचें अत्यंत फायदेशीर ठिकाण बनवितां येईल,* असा इंग्लंडांतल्या ब्रिटिश सरकारनें विचार केला. पण परिस्थिति विरुद्ध होती. कारण हिंदुस्थानचा तयार माल इतका सुबक आणि स्वस्त असे कीं तो खुद्द इंग्लंडांत

इंग्लिश मालाबरोबर स्पर्धा करून त्यास मागें टाकी. मग इंग्रज लोकांनीं अशी युक्ति काढली कीं हिंदी मालावर मोठी जकात ठेवावी; आणि मग तशी ठेवून, त्यांनीं शेवटीं हिंदी मालास बाहेर काढलें.

ही सर्व हकीकत, हिंदुस्थानचा इतिहास लिहिलेले प्रोफेसर एच. एच. विल्सन् यांनीं पुढें दिल्याप्रमाणें वर्णिली आहे. ते म्हणतातः—

( "ही हकीकत म्हणजे हिंदुस्थान देश ज्यांच्या हातीं पडलेला आहे त्यांजकडून त्या देशावर झालेल्या अन्यायाचें एक दुःखद उदाहरण होय. १८१३ सालीं साक्षीमध्यें सांगण्यांत आलेलें आहे कीं, त्या कालपर्यंत हिंदुस्थानांतला कापसाचा आणि रेशमी माल इंग्लंडांत नेऊन, इंग्लंडांत तयार झालेल्या मालाहून शेंकडा ५० किंवा ६० टक्के कमी किंमतीला विकूनहि फायदा राहत असे. यामुळें मग इंग्लिश मालाचा बचाव करण्याकरितां, हिंदी मालावर किंमतीच्या शेंकडा ७० किंवा ८० टक्के जकात ठेवणें, किंवा त्याला साफ मनाई करणें, भाग पडलें. ही प्रतिबंधक जकात किंवा हे प्रतिबंधक हुकूम जर नसते, तर पेस्ली आणि मॅन्चेस्टर येथील गिरण्या आरंभींच बंद पडून पुढें वाफेच्या शक्तीनेंहि पुनः सुरू करतां आल्या नसत्या. त्या गिरण्यांची उत्पत्ति आणि वाढ, हिंदी कारागिरीच्या आहुतीवर झालेली आहे. हिंदुस्थान देश जर स्वतंत्र असता, तर त्यानें याचा प्रतीकार केला असता; त्यानें ब्रिटिश मालावर प्रतिबंधक जकात बसविली असती, आणि आपला धंदा नष्ट होऊं न देतां तो रक्षण केला असता. स्वसंरक्षणाचा हा उपाय हिंदुस्थान देशाला करतां येईना; कारण तो सर्वस्वी परक्याच्या हातीं पडलेला। एकीकडे ब्रिटिश माल कांहीं जकात न ठेवतां हिंदुस्थानांत आणण्यांत आला, आणि दुसरीकडे ब्रिटिश माल तयार करणाऱ्यांनीं राजकीय जुलमाचें शस्त्र हातीं धरून आपल्या हिंदी प्रतिस्पर्ध्याला दाबीत दाबीत शेवटीं गळा दाबून मारलें। एरवीं समसमान परिस्थितींत त्याच्याशीं त्याला स्पर्धा करणें कधींहि शक्य होतें ना।" )

"अशा रीतीनें जो हिंदुस्थान देश पूर्वी वस्तूत्पादक होता त्याला केवळ शेतकीचा देश बनविण्यांत आलें." असे हेन्री सेंट् जॉर्ज टकर यांनींहि त्या वेळीं उद्गार काढले.

मि. मॉन्टगॉमेरी मार्टिन यांनीं १८३८ सालीं लंडनमध्यें "पूर्व हिंदुस्थान" नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्याच्या तिसऱ्या भागाच्या प्रस्तावनेंत त्यांनीं तत्कालीन ब्रिटिश राजनीतितत्व पुढील झणझणीत शब्दांत चव्हाट्यावर आणलें आहे—

"खुल्या व्यापाराच्या तत्त्वाचें ढोंग करून इंग्लंड देशानें लँकेशायर, यॉर्कशायर, ग्लासगो इत्यादि ठिकाणच्या वाफेनें चालणाऱ्या मागांवरील माल केवळ नांवाची जकात भरून हिंदु लोकांना घ्यावयास भाग पाडलें आहे; उलट, बंगाल आणि विहारमधील सुबक व टिकाऊ अशा हस्तकौशल्यानें तयार झालेल्या मालावर इंग्लंडांत अतिशय मोठी म्हणजे जवळ जवळ प्रतिबंधक अशी जकात ठेवण्यांत आलेली आहे."

परंतु ईस्ट इंडिया कंपनीच्या हिंदुस्थानांतील ब्रिटिश नोकरांनीं तर हिंदी कारागिरांशीं अमानुषपणाचें वर्तन करून ह्याहूनही कहर केला! डाक्याची मलमल तयार करणाऱ्या कित्येक कारागिरांचीं त्यांच्या कौशल्याबद्दल दंड म्हणून बोटेंच कापून टाकिलीं ही तर गोष्ट अनेकदां सांगण्यांत येऊन आतां सर्वविश्रुत झालेली आहे. तसेंच, देशांतल्या बहुतेक सर्व विणकऱ्यांना कर्जाऊ पैसे देण्याच्या एका विशेष पद्धतीनें हुकमतींत ठेवलें जाई, आणि या कर्जाच्या गुंतागुंतींत मिळालेल्या माणसास बाहेर पडण्याची कधींच आशा नसे! विणकऱ्यांवर अनेक प्रकारचे निर्बंध घालणारे कायदे केलेले असत. यांपैकीं एक कायदा असा होता कीं, "एकाहून अधिक माग बाळगणाऱ्या आणि एक किंवा अधिक मजूर कामावर ठेवणाऱ्या विणकऱ्यास प्रत्येक कापडाच्या ठरेल त्या किंमतीवर शेंकडा ३५ टक्के दंड द्यावा लागेल."

डॉ. बुचानन् यांनीं सरकारच्या विशेष हुकमाखालीं उत्तर हिंदुस्थानांत आर्थिक चौकशी करून हिंदी उद्योगधंद्याची भयंकर दुर्दशा उघडकीस आणली, तरी देखील त्या दुर्गतींत पडलेल्या कारागिरांना मदत द्यावी म्हणून कसलीच कांहीं खटपट इंग्लंडांत अगर हिंदुस्थानांत करण्यांत आली नाहीं. उलट, वर सांगितलेले मॉंटगॉमेरी मार्टिन् लिहितात, "या इंग्रजांच्या व्यापारी स्वार्थास बळी पडलेल्या दुर्दैवी लोकांना अधिकाधिक दारिद्र्यांत लोटावयाची मात्र आम्ही शक्य ती खटपट केली आहे."

ब्रिटिश लोकांच्या हिंदुस्थानांतील मागील राज्यकारभाराच्या ह्या बाजूसंबंधानें कोणास अधिक आणि तपशीलवार माहिती पाहिजे असल्यास त्यानें कै. श्रीयुत रमेशचंद्र दत्त, आय. सी. एस., सी. आय. ई. यांचा "ब्रिटिश हिंदुस्थानचा आर्थिक इतिहास" हा ग्रंथ वाचावा. रमेशचंद्र दत्त यांना सरकारी खात्यांतली नोकरी झाल्यानंतर लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजमध्यें 'हिंदुस्थानचा इतिहास' या विषयावर लेक्चरर म्हणून नेमण्यांत आलें होतें.

ब्रिटिश लोक जर मुसलमानांप्रमाणें हिंदुस्थानांत कायमचे रहिवासी म्हणून राहिले असते, तर त्यांनीं जे, वर सांगितल्याप्रमाणें, आपल्या देशांत तयार झालेला माल हिंदी लोकांत चांगला खपावा म्हणून हिंदी उद्योगधंद्यांना मारून टाकण्याकरितां प्रत्यक्ष प्रयत्न केले, ते न करतां, हिंदुस्थानचे उद्योगधंदे वाढविण्याकरितां आणि परदेशांच्या चढाईपासून त्यांचें संरक्षण करण्याकरितां प्रयत्न केले असते. ब्रिटिश लोकांच्या गत राज्यकारभाराचा हिंदी आर्थिक परिस्थितीवर जो विशेष परिणाम झाला—आणि जो मुसलमान परकी होते तरी त्यांच्या कारभारापासून झाला नाहीं—तो हा.

यावर कोणी असें म्हणेल कीं, मुसलमानांनीं आरंभींच्या स्वाऱ्यांत हिंदुस्थानांतून बरीच लूट नेली, आणि पुढील मोंगल राजवटींत देखील नादिरशहानें अलोट संपत्ति नेली असें सांगतात. समजा कीं हें सर्व जसेंच्या तसें अगदीं खरें आहे. पण आम्ही असें विचारतों कीं, ही सगळी संपत्ति मिळून, ईस्टइंडिया कंपनीच्या पहिल्या अमदानींत तिच्या नोकरांनीं भरून नेलेल्या संपत्तीच्या एक शतांश तरी होईल काय?

लॉर्ड मेकॉलेनीं आपल्या "लॉर्ड क्लाइव्ह" वरील निबंधांत दिलेलें पुढील हुबेहूब चित्र पहाः—'रोमन साम्राज्यांत एखाद्या प्रांताचा सुभेदार एक दोन वर्षांतच, रहावयास टोलेजंग संगमरवरी वाडे, प्यावयास स्फटिकाचे प्याले, खावयास मधुर कंठाचे पक्षी, परिवारांत मोठमोठे मल्ल, इतका थाटमाट आणण्याइतकी खासगी कमाई करी; स्पेनच्या साम्राज्यांत एखादा मेक्सिकोचा नाहीं तर लिमा प्रांताचा व्हाइसरॉय, प्रजेला नाडून सोनेरी गाड्यांतून आणि रुप्यानें मढविलेल्या तट्टांच्या परिवारांतून मिरवत स्वगृहीं मॅड्रिड राजधानींत प्रवेश करीत असे. पण यांचा हा कमाईचा पराक्रम, म्हणजे कंपनीच्या नोकरांच्या पराक्रमापुढें कांहींच नव्हे! कंपनीच्या नोकरांमध्यें अनेक दुर्गुण होते, पण "क्रौर्य" म्हणतां येईल असा दुर्गुण त्यांच्यांत नव्हता. पण क्रौर्यानेंसुद्धां जीं पापें उद्भवणार नाहींत, तीं पापें त्यांच्या अनिवार अनिर्बंध द्रव्यलोभामुळें उद्भवलीं!"

श्रीमंत होण्याकरितां त्यांनीं कोणकोणत्या मार्गांचा आणि साधनांचा अवलंब केला, याचें मेकॉले साहेबांनीं पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहेः—

"कंपनीच्या नोकरांनीं, आपल्या मालकांकरितां नव्हे तर स्वतःसाठीं, बहुतेक सगळ्या अंतर्गत व्यापाराचा मक्ता घेतला. व्यापाऱ्यांना त्यांनीं आपणाकडून

महागाईनें विकत घेऊन गिन्हाइकांस स्वस्ताईनें विकावयास लाविलें. देशांतल्या न्यायकोर्टांचा, पोलिसांचा, आणि आर्थिक अधिकाऱ्यांचा ते बेलाशक अपमान करीत असत, आणि याबद्दल त्यांना कोणीहि विचारीत नसे. त्यांनीं आपल्या पंखाखालीं कित्येक हिंदी लोक घेऊन ठेविले होते, ते प्रांतोप्रांतीं फिरून जेथें जात तेथें धडकी भरवून ओसाड पाडून जात असत. ब्रिटिश वखारींतल्या प्रत्येक नोकराच्या पाठीशीं त्यांच्या मालकाची सत्ता असे, आणि त्याच्या मालकाच्या पाठीशीं कंपनीची सत्ता असे. अशा तऱ्हेनें कलकत्त्यास भराभर अवाढव्य संपत्ति गोळा झाली, आणि इकडे तीस कोटी लोकांच्या दुर्दैवाचा कळस झाला ! ''

यापुढें मेकॉले साहेब, स्थानिक राजवटीच्या जुलमाशीं तुलना करतांना ब्रिटिशांच्या जुलमाचें कसें चमत्कारिक स्वरूप होतें हें सांगतातः—

'' जुलम सोसण्याची हिंदी लोकांना संवय होती खरी, पण तो असला जुलम नव्हे ! त्यांना सुराजउद्दौल्याच्या कंबरेहून, कंपनीचें बोट जास्त कणखर वाटे ! जुन्या राजवटींत त्यांना जुलम असह्य झाला म्हणजे निदान एक तरी उपाय शिल्लक असे, कीं बंड करून सरकारास खेचून खालीं काढावें. पण इंग्रज सरकार असें हालणारें नव्हतें ! तें जुलम करण्यांत रानटी, पण सामर्थ्यांत सुधारणेच्या सर्व शस्त्रास्त्रांनीं सज्ज होतें. त्याला मानवी प्रजापीडकांचें राज्य म्हणण्यापेक्षां, पिशाचांचें राज्य म्हणणें जास्त शोभलें असतें ! ''

घरें ह्या मागील गोष्टी असोत; पण गेलीं शंभर किंवा त्याहूनहि अधिक वर्षे हिंदुस्थानांतून पैशाची जी अखंड ओहोटी चालली आहे, आणि जी थांबावी म्हणून परलोकवासी दादाभाई नौरोजी यांनीं कैक वर्षे एकसारखी खटपट चालविली परंतु कांहींहि उपयोग झाला नाहीं, त्या ओहोटीचें काय ?

दादाभाई '' ब्रिटिशांना न शोभणारा हिंदुस्थानचा राज्यकारभार, आणि हिंदुस्थानचें दारिद्र्य '' या आपल्या ग्रंथाच्या ५७९ व्या पृष्ठावर म्हणतातः— स्थानिक राजांच्या राजवटींतल्या हिंदुस्थानच्या राज्यकारभारांत कांहींहि गुणदोष असोत, परंतु एवढी एक गोष्ट सचित की, त्यांच्यांत, आज ब्रिटिश राजवटींत ब्रिटिशांना न शोभणाऱ्या राज्यपद्धतीमुळें जें मोठ्यांत मोठें अरिष्ट ओढवलें आहे तें नसे. हें अरिष्ट म्हणजे, ( १७८७ सालीं सर जॉन शोअरनीं म्हटल्याप्रमाणें ) 'हजारों मैलांवरून राज्यकारभार हांकण्याच्या पद्धतीच्या अंगभूत असलेल्या व्यंगांमुळें,' आणि ग्रेट ब्रिटनच्या हिताकरितां हाकेला खर्चसुद्धां हिंदुस्थानच्या

माथीं मारल्यामुळें, हिंदुस्थानांतून बाहेर लागलेला पैशाचा अखंड आणि दिवसेंदिवस वाढत चाललेला प्रवाह, हें होय. हें अरिष्ट विशेष जड वाटावयाचीं कारणें: लॉर्ड सॅलिसबरी म्हणतात तो 'राजकीय दांभिकपणा,' किंवा लॉर्ड लिटन् म्हणतात ती 'जाणूनबुजून काढलेली उघड लक्षांत येणारी पळवाट,' यांनीं उत्पन्न केलेलीं लॉर्ड सॅलिसबरी म्हणतात ती 'भयंकर दुर्दशा,' किंवा लॉर्ड क्रोमर म्हणतात तें 'कमालीचें दारिद्य,' किंवा लॉर्ड लॉरेन्स वर्णन करतात तें 'सर्वसाधारण हिंदी रयतेचें अर्धपोटीं जीवन' हीं होत."

१८३८ सालीं मि. मॉन्टगॉमेरी मार्टिन् हे आपल्या 'पूर्व हिंदुस्थान' ग्रंथाच्या पहिल्या भागांत म्हणतातः—"ब्रिटिश इंडियामधून, दर वर्षी ४॥ कोटी रुपये, म्हणजे आज ३० वर्षांत (हिंदुस्थानांत चालू असलेल्या) एकोत्र्याच्या चक्रवाढ राशीनें झालेले १०८५८५००००० रु., इतका पैसा बाहेर गेलेला आहे. इतकी संतत आणि जमत जाणारी धार लागल्यास, इंग्लंडासारखा देशदेखील केव्हांच फफल्लक होऊन जाईल. मग तिचा हिंदुस्थानावर म्हणजे ज्या ठिकाणीं दिवसा २ पासून ३ आणे मजुरी मिळते तेथें केवढा भयंकर परिणाम झाला असेल बरें?"

ह्यावर दादाभाई म्हणतातः—"ही जर १८३८ सालची स्थिति तर त्याहून आतां दसपट पैसा बाहेर जात असतां, आणि शिवाय देशांतल्या देशात पूर्वीहून अधिक पैसा देशाबाहेरच्या लोकांकडून गिळंकृत केला जात असतां, देशाची काय दुर्दशा होत असेल हें काय सांगावयास पाहिजे? महासागरांतून वर वाफेच्या रूपानें गेलेलें पाणी जर अंशतः पावसाच्या आणि नद्यांच्या रूपानें परत येणार नाहीं, तर तो महासागरसुद्धां पार आटून जाईल. ह्या पैशाच्या ओहोटींत जर आणखी व्याजाची भर घातली, तर सर्व मिळून केवढें प्रचंड नुकसान आहे याची कल्पना तरी होईल काय?"

सर जॉर्ज विन्गेट् म्हणून मुंबई इलाख्यांत जमीन महसूल बसविण्यासंबंधांत सदैव आठवण राहील असे मोठे आदरणीय अधिकारी होऊन गेले. त्यांनीं हिंदुस्थानांतून लागलेल्या ह्या ओहोटीच्या परिणामाचें १८५९ सालीं "हिंदुस्थानशीं आमचा आर्थिक व्यवहार" या आपल्या पुस्तकांत पुढें दिल्याप्रमाणें वर्णन केलें आहे:—

"ग्रेट ब्रिटन्ला दिला जाणारा कर, हा हिंदुस्थानावर होणाऱ्या अनिष्ट परिणामाच्या दृष्टीनें पाहतां आमच्या सध्यांच्या राजनीतीचा अत्यंत निषेधार्ह असा

भाग आहे. घेतला त्याच देशांत खर्च होणारा कर, आणि एका देशाकडून घेऊन दुसऱ्या देशांत खर्च करण्यांत येणारा कर, ह्या दोहोंच्या परिणामांत महदंतर आहे. पहिल्या प्रकारचा कर हा सर्वसाधारण जनतेकडून घेऊन, त्या जनतेचा जो राज्यकारभार चालविणारा भाग, त्याला दिला जातो, आणि त्याच्याकडून तो खर्चाच्या रूपानें पुनः त्याच देशांत उद्योगधंद्यांत गुंतलेल्या वर्गाकडे परत येतो; म्हणजे फक्त वांटणी वेगळ्या प्रकारानें होते, परंतु राष्ट्रीय उत्पन्नांत तोटा होत नाहीं. दुसऱ्या प्रकारचा कर हा केवळ राष्ट्रीय उत्पन्नाचा अंश एका वर्गाकडून दुसऱ्या वर्गाकडे जाणें अशा रूपाचा नसून, त्याची ती सर्व रक्कम देशाबाहेर जाऊन, त्या देशाला अजीबाद नाहींशी होते. म्हणजे ती रक्कम दुसऱ्या देशीं गेली काय, आणि समुद्रांत फेंकून दिली काय, त्या देशाला धनोत्पादनाच्या दृष्टीनें सारखेंच. कारण त्या रकमेचा अंशदेखील गेला तेथून पहिल्या देशांत कोणत्याहि रूपानें परत येणार नाहीं. हें आम्ही आज इतकीं वर्षें हिंदुस्थानाकडून घेतलेल्या कारभाराचें स्वरूप आहे.''

आतां दुसरी मद्यपानाची गोष्ट घ्या. मद्यपान हें कायद्यानें मान्य करून उत्पन्नाची बाब बनविणें हें ब्रिटिश राजसत्तेचेंच कर्म होय. हिंदु राजवटींत आणि मुसलमान राजवटींत दोहोंतहि मद्यपान निषिद्ध मानलें जाऊन देशाच्या अगदीं अज्ञात कानाकोपऱ्यांतच चालू असे. ब्रिटिश राजवटींत हें व्यसन अत्यंत अनुकूल परिस्थिती मिळाल्यामुळें फारच बळावलेलें आहे; आणि आज इतकी विकट परिस्थिति प्राप्त झाली आहे कीं, त्यामुळें होणारें उत्पन्न दुसरीकडून भरून निघणें फार कठीण असल्यामुळें, तें व्यसन बंद करण्याकरितां उपाययोजना करणें वस्तुतः अशक्य होऊन बसलें आहे. येणेंप्रमाणें आज ब्रिटिश राजवटींत मद्यपानाच्या प्रसारामुळें लोक नीतिदृष्ट्या इतके खालावत गेलेले आहेत कीं, ह्या नीतिभ्रष्टतेस कधीं आळा घालणें शक्य होईल तें एक ईश्वरच जाणे !

अशा ह्या अनेक प्रकारांनीं ब्रिटिशांची हिंदुस्थानावरील सत्ता हिंदी लोकांस आणि त्यांच्या हितसंबंधास विघातक झालेली आहे. शस्त्रविहीन करून टाकल्यामुळें त्यांचें क्षात्रतेज आणि धाडस दिवसेंदिवस कमी होत गेलें. दीर्घकालपर्यंत त्यांना जबाबदारीच्या जागा बंद करून ठेविल्यामुळें त्यांचें राज्यकारभार हांकण्याचें बुद्धिसामर्थ्य वाढावयास वाव मिळाला नाहीं. इंग्लंडांत भयंकर जकात ठेवून,

अलोट संपत्ति भरून नेल्यामुळें, आणि हिंदुस्थानांतून या क्षणापर्यंत पैशाची संतत धार चालल्यामुळें,–मुख्यतः या दोन कारणांनींच त्यांना दारिद्य आलें. ब्रिटिश अंमलापूर्वी त्यांना मद्यपान जवळ जवळ माहीत नसल्याप्रमाणें होतें, पण आज ब्रिटिश अंमलांत त्यांच्यामध्यें मद्यपान हें सार्वत्रिक व्यसन होऊन बसलें आहे !

हे हिंदुस्थानांतल्या ब्रिटिश राज्याचे अनिष्ट परिणाम लक्षांत घ्यावे, म्हणजे हिंदी पुढारी स्वराज्य कां मागतात हें समजेल. या सर्व अरिष्टांचा मनुष्याच्या शीलावर काय परिणाम होतो हें लक्षांत आणावें, म्हणजे हिंदी माणसाचें शील कां खालावलें, त्यांच्यांतलें साहस कसें गेलें, त्याची स्वयंप्रेरणा कां बंद पडली, त्याच्यांत सुस्ती, कंटाळा आणि मांद्य कां आलें याचा उलगडा होईल.

आम्हीं पुनः एकदां येथें सांगतों कीं, ब्रिटिश लोकांच्या हिंदुस्थानांतल्या राज्यकारभारासंबंधाचा हा गर्हणीय भाग उकरून काढण्यांत आम्हांला कांहीं सुख नाहीं. तो भाग नजरेसमोर ठेवून ब्रिटिश लोकांना लाजवावें, असा आमचा मुळींच हेतु नाहीं. त्यांच्या पूर्वजांचीं हिंदुस्थानविषयक कृष्णकृत्यें आणि लज्जास्पद वर्तन, यांचें मुद्दाम त्यांना स्मरण द्यावें अशी आमची इच्छा नाहीं. परंतु मिस मेयो ही स्वतःला हिंदुस्थानच्या इतिहासाची काडीचीहि माहिती नसतां जेव्हां उलट आम्हांलाच आव्हान टाकून जगासमोर 'कसें चकविलें' म्हणून विजयोत्साहानें मिरवूं पाहते तेव्हां जगासमोर हिंदुस्थानाबद्दलचें खरें खरें काय आहे तें मांडून आमची अब्रू रक्षण करणें हें आमचें कर्तव्य ठरत नाहीं काय ?

मिस मेयो बेपर्वाईनें म्हणते कीं, ब्रिटिश सरकार हें चांगलें वाईट कसेंहि असो, त्याचा आजच्या हिंदुस्थानच्या परिस्थितीशीं काडीमात्र संबंध नाहीं. पण आतां या प्रकरणांतला पुरावा वाचून, तिला जर कांहीं मन म्हणून शिल्लक असेल तर ती पुनः तसें म्हणेल कीं काय याची शंका आहे !

---

## प्रकरण ६ वें.

# सामाजिक नव्हे, राजकीयच !

परकीय सत्तेमधील अनिष्ट गोष्टींचा हिंदुस्थानच्या राष्ट्रीय शीलावर काय परिणाम झाला आहे, तसेंच मिस मेयोला हिंदी इसमाचा स्वभावविशेष म्हणून वाटत असलेले जे जाड्य, साहसशून्यता, स्वयंस्फूर्त्यभाव, इत्यादि दुर्गुण, त्यांचेंहि

मूळ शेवटीं त्याच अनिष्ट भागांत कशें सांपडतें याचा आपण गेल्या दोन प्रकरणांत विचार केला. अर्थात् आतां मिस मेयोचें जें म्हणणें कीं, ब्रिटिश सरकार बरें वाईट कसेंहि असो त्याचा या वरील दुर्गुणांशीं कांहींहि संबंध नाहीं, तें याउपर मुळींच टिकत नाहीं.

परंतु मिस् मेयोचा दुसरा मुद्दा असा आहे कीं, हिंदी स्वभावांत हीं अनर्थावह व्यंगें हिंदी समाजांतील अनिष्ट चालीरीतींमुळें आलेलीं आहेत. त्यावर आमचें असें म्हणणें आहे कीं, हिंदु समाजांत जसे हे अनिष्ट प्रकार आहेत तसे ते इंग्रज, अमेरिकन, किंवा दुसऱ्या कोणत्याहि समाजांत आहेत. या अनिष्ट प्रकारांचा हिंदी लोकांच्या शीलावर मुळींच परिणाम झालेला नाहीं असा आम्ही वाद घालीत बसत नाहीं. आमचें म्हणणें असें आहे कीं, त्यांचा परिणाम झालेला आहे, आणि तो बराच झालेला आहे; परंतु तीं सर्व दुय्यम कारणें असून मुख्य आणि सर्वगामी कारण म्हणजे परकीय सत्तेचें नाशकारक बीज हें होय.

ह्या सामाजिक दोषांकडे हिंदी पुढारी दुर्लक्ष करून आहेत असें वाटण्याचें कारण नाहीं. प्रत्येक हिंदी राजकारणी पुरुषाला तसेंच समाजसुधारकाला पूर्णपणें माहीत आहे कीं, आपल्या समाजांत अनेक अनिष्ट प्रकार आहेत, व ते काढून टाकणें जरूर आहे, आणि तसा त्यांचा सतत प्रयत्नही चालू आहे. परंतु हीं सामाजिक अनिष्टें आहेत म्हणून हिंदुस्थानची राजकीय प्रगति करणें इष्ट नाहीं, असा जेव्हां कार्यकारणभाव लावण्यांत येतो तेव्हां तो लावणाऱ्यांशीं वादांत आम्हांला दोन हात केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. मिस मेयोचें पुस्तक म्हणजे हिंदुस्थानाला आणखी राजकीय अधिकार कां देऊं नये याबद्दलचा एक लांबलचक तयार केलेला युक्तिवाद आहे. तिच्या म्हणण्याचा सारांश असा कीं, हिंदी लोकांनीं आपलें सर्व लक्ष आणि आपली सर्व शक्ति सामाजिक दुराचार काढून टाकून सर्व वर्गांत आणि सर्व दर्जांच्या लोकांत सरास सामाजिक सुधारणा घडवून आणण्याकडे खर्च केली पाहिजे, आणि असें हें सामाजिक परिवर्तन पूर्ण होई तों त्यांनीं आजच्याहून अधिक राजकीय सत्ता मुळींच मागतां नये.

असला हा फुकटा उपदेश हिंदी लोकांना आज, कैक वर्षे, हिंदी राष्ट्रीय सभा स्थापन झाल्यापासून, करण्यांत येत आहे. परंतु राष्ट्रीय सभेचे संस्थापक परलोकवासी *महनीय मि. ह्यूम, आणि ज्यांच्याहून शुद्धहृदय, थोर, सुविचारी, असा कोणी देशभक्त अर्वाचीनकाळीं हिंदुस्थानात झाला नाहीं ते पंडितवर दादाभाई नौरोजी, ह्या दोघांनीं राष्ट्रीय सभेचें मुख्य कार्य राजकीयच असावें असें*

ठरवून टाकिलें आहे. परंतु त्याचबरोबर त्यांनीं सामाजिक बाजू मागें न टाकतां, लोकांमध्यें प्रत्यक्ष कार्य करून, आणि सामाजिक परिषदा भरवून, सामाजिक सुधारणेबद्दलहि आपली कळकळ आणि उत्साह व्यक्त केला होता.

गेल्या शतकाच्या ऐशीं नव्वदच्या दरम्यान सर ऑक्लंड कॉल्व्हिन् यांनीं राष्ट्रीय सभेची तत्कालीन वृत्ति आणि तिनें राजकीय सुधारणांना दिलेलें महत्व यांजवर कडक टीका केलेली होती. अगदीं अलीकडे १९१० त देखील सर व्हॅलेन्टाइन् चिरोल यांनीं आपल्या 'हिंदुस्थानची अस्वस्थता' या पुस्तकांत राष्ट्रीय सभेच्या वृत्तीबद्दल खेद प्रदर्शित करून, राष्ट्रीय सभा ही सर्वस्वी सामाजिक सुधारणेस वाहून न घेतां राजकीय सुधारणा मागत आहे यांत तो भलत्या दिशेनें चालली आहे असें आपलें मत दिलें होतें. हें मत सर व्हॅलेन्टाइन यांनीं आतां बदलेलें असून, अलीकडच्या आपल्या पुस्तकांत ते हिंदी राजकीय प्रगतीस अनुकूल झालेले दिसतात.

आम्हीं आमच्या समाजांत संपूर्ण सामाजिक सुधारणा घडवून आणल्याशिवाय मुळीं राजकीय प्रगतीची खटपटच करूं नये, असा इंग्रजांनीं आम्हांला उपदेश देणें अगदीं स्वाभाविक आहे. आणि त्यांत त्यांचा स्वार्थी हेतु आहे हें आम्हांला आणि सगळ्या जगालाहि चांगलें ठाऊक आहे. परंतु जेव्हां एखादी अमेरिकेंतल्या युनायटेड् स्टेटसमधली बाई त्रयस्थ म्हणून, निस्वार्थी म्हणून, आम्हांला शिकवायास धांवते, तेव्हां तिला आणि सगळ्या जगाला आमचे स्वतःचे विचार काय आहेत हें दाखविणें भाग आहे.

म्हणून या ठिकाणीं आम्ही आतां दोन गोष्टी दाखविणार आहों. पहिली अशी कीं, राष्ट्राची प्रगती व्हावयास राजकीय सुधारणेच्या आधीं प्रथम सामाजिक सुधारणा घडून आलीच पाहिजे असें नाहीं. आणि दुसरी ही कीं, ज्याअर्थी हिंदुस्थानांतल्या ब्रिटिश कारभाऱ्यांनीं हिंदी समाजसुधारणेबद्दल आणि तद्विषयक कायदेकानू करण्यासंबंधांत सर्वथैव अनास्था दाखवून हिंदुस्थानांत समाजसुधारणा घडवून आणण्याच्या कामीं स्वतःची नालायकी सिद्ध केली आहे, त्याअर्थी आतां हिंदी लोकांना जास्त राजकीय अधिकार देण्याची वेळ आलेली आहे—म्हणजे त्यांना तरी त्या अधिकारांचा उपयोग करून आपल्यांत लवकर सामाजिक सुधारणा घडवून आणतां येईल !

"राजकीय सुधारणेच्या आधीं सामाजिक सुधारणा झाली पाहिजे काय ?" या विषयावर कै. न्यायमूर्ति तेलंग यांनीं १८८६ सालीं एक अत्यंत बोधप्रद असें

व्याख्यान दिलें होतें. त्यांत त्यांनीं अगदीं स्पष्टपणें सिद्ध केलें आहे कीं, बहुतेक समाजांत, राजकीय सुधारणा आधीं आणि सामाजिक सुधारणा मागाहून, असा प्रकार घडून आलेला आहे. त्यांनीं आणखी हेंहि दाखवून दिलें आहे कीं, राजकीय क्षेत्रांत वावरणारा प्रगतिपर भाव कमजास्त जोरानें सामाजिक क्षेत्रांतहि व्यक्त होतो; अर्थात् सामाजिक प्रगति आणि राष्ट्रीय प्रगति ह्या परस्पराभेद्य असलेल्या गोष्टी नव्हत. आपल्या मुद्याच्या समर्थनार्थ, तेलंगांनीं हर्बर्ट स्पेन्सरच्या "चालीरीति आणि संप्रदाय" या निबंधांतून पुढें दिलेला अगदीं अचूक लागू पडणारा उतारा घेतला होताः—

"छंदानुवर्तन, मग तें सरकारचें असो, पुरोहितांनीं घालून दिलेल्या विधींचें असो, किंवा समाजानें तयार केलेल्या नीतिनियमांचें असो, सर्व मिळून एकाच स्वरूपाचें होय; आणि जी भावना ऐहिक किंवा पारमार्थिक सत्ताधीशांच्या जुलमास विरोध करावयास शिकवितें, तीच लोकमताच्याहि जुलमास विरोध करावयास शिकवितें."

पुढें हा मुद्दा तेलंगांनी ऐतिहासिक पुरावे देऊन विशद केला आहे. मराठी साम्राज्याची स्थापना आणि विस्तार ही हिंदु लोकांची मोठी विलक्षण कर्तबगारी होय याबद्दल वाद नाहीं; पण त्याकाळीं हिंदु लोकांची सामाजिक परिस्थिति काय होती बरें ? त्या काळचा सर्व इतिहास धुंडाळून तेलंग म्हणतात कीं, त्या वेळची सामाजिक परिस्थिति आजच्या परिस्थितीहून फारशी उच्च दर्जाची होती असें दिसत नाहीं. "त्याकाळीं आमच्यांत बालविवाह होता, जबरदस्तीचें वैधव्य होतें, सतीची चाल सरास नसली तरी होती."

ह्या कालाच्या मागें जाऊन आपण पाहिलें तर, इ. स. च्या ७ व्या शतकांत हिंदुस्थानांत आलेल्या हुएनत्संग् नामक चिनी प्रवाशानें लिहून ठेवलेल्या वर्णनावरून त्याकालची राजकीय स्थिति चांगली भरभराटीची दिसते, परंतु सामाजिक परिस्थिति आजच्याहून फारशी वरच्या दर्जाची दिसत नाहीं. "त्या कालीं जातिभेद चालू होता, आणि हुएनत्संगनें मुद्दाम स्पष्टपणें लिहून ठेवलेलें आहे कीं, विधवापुनर्विवाह होत नसे."

तेलंगांनीं याच्याहि पुढें जाऊन खुद्द इंग्लंडच्या इतिहासांतून उदाहरणें दिलीं आहेत. १७ व्या शतकाचा आरंभ म्हणजे इंग्लंडच्या इतिहासांत एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीचा शेवट होय. या राणीच्या पूर्वी इंग्लंडच्या राजांना दीर्घकाल-

पर्यंत अनिर्बंध सत्ता उपभोगावयास मिळालेली होती, परंतु हिच्या कारकीर्दीत जनतेचे हक्क आणि अधिकार पुढें येऊं लागले. पुढें पहिला चार्लस् आला. " त्याच्या कारकीर्दीत ती सुप्रसिद्ध राजकारणी नररत्नांची मालिका—हॅम्प्डेन्, पार्लमेंटचें सभासद-पंचक, लाँग पार्लमेंटचे सभासद, इत्यादि—तिचे पराक्रम दृष्टिपथावर येतात. "

यानंतर आपण क्रॉमवेलच्या प्रोटेक्टरेटमध्यें येतों. हें तर राजसत्तेविरुद्ध लोकसत्तेच्या विजयाचें मूर्तिमंतच उदाहरण होय. पुढें रेस्टोरेशनच्या नंतर आपणास हेबिअस् कॉर्पस ॲक्ट दिसतो. आणि मध्यंतरीं कांहीं काळ दुसऱ्या जेम्सची लहानशी दुष्कीर्तिकर कारकीर्द झाल्यानंतर आपण १६८८ च्या ग्रेट रेव्होल्यूशनवर येऊन पोंचतों. पुढें डेक्लेरेशन् ऑफ् राइटस् आणि बिल् ऑफ् राइटस्, आणि शेवटीं " ॲक्ट ऑफ् सेटलमेंट " येऊन १७ वें शतक संपतें.

तेलंग म्हणतात, " ह्या गोष्टींनीं जें राजकीय अभ्युदयाचें भराभर पुढें चाललेलें पाऊल आपल्या नजरेसमोर उभें राहतें, त्याला इतिहासांत अन्यत्र उपमा नाहीं ! त्यानें त्या कालीं तर इंग्लंडची स्थिति सुधारलीच, परंतु त्यामुळें पुढेंहि सतत इंग्लंडची तीच अभिवृद्धि चालत राहून आज आमच्या डोळ्यांसमोरहि ती चाललेली आहे."

असें हें राजकीय हक्कांचें पाऊल त्या शतकांत भराभर पुढें पडत चाललें असतां, त्या कालीं इंग्लंडची सामाजिक स्थिति काय होती हें पहावयाचें असल्यास,. मेकॉले साहेबांच्या इंग्लडच्या इतिहासाचें तिसरें प्रकरण वाचावें म्हणजे पुरे आहे. " मजूर वर्गाची आणि शेतकरी वर्गाची काय दुर्दशा होती, दूरदूरच्या ठिकाणांमधील व्यवहाराच्या साधनांची काय व्यवस्था होती, लहान मुलांस कसे मरे मरेपर्यंत कामास लावीत असत, सहज बोलतांना सुद्धां केवढा उच्छृंखलपणा आणि अश्लीलपणा दिसून येई, इत्यादि सर्व कांहीं मेकॉलेनें मनोरंजक पद्धतीनें वर्णन करून ठेविलें आहे. "

ह्या कालीं स्त्रीशिक्षणाची काय दुर्दशा होती त्यासंबंधानें तत्कालीन सार्वत्रिक परिस्थितीचें एक नमुनेदार उदाहरण म्हणून मेकॉलेनें तिसऱ्या वुइलियमची राणी मेरी हिच्यासारख्या उच्च दर्जाच्या स्त्रीचें देखील केवढें अज्ञान होतें तें सांगितलें आहे. मेरी राणीला तर तिची मातृभाषा सुद्धां नीट येत नसे !

लॉर्ड मेकॉलेनें असेंहि लिहून ठेवलें आहे कीं, त्या कालीं साधारण वरच्या दर्जाच्या पुरुषांना स्वतःच्या बायकोला-मारहाण करावयाची देखील लाज वाटत

नसे. " म्हणजे इंग्लंडच्या इतिहासांतील अत्यंत प्रभावशाली राजकीय अभिवृद्धीच्या काली, स्त्रीपुरुषसंबंधविषयक सामाजिक स्थिति फार उच्च दर्जाची होती असें म्हणतां येत नाही. "

ह्या ऐतिहासिक उदाहरणांवरून, आणि आपल्या वेळच्या चालू इंग्लिश इतिहासांतील उदाहरणें देऊन, न्यायमूर्ति तेलंगांनीं जो निष्कर्ष काढला तो हा कीं, " सामाजिक दुराचार आहेत तसे चालू असतां, किंवा सुधारणेकडे लागणारें लक्ष आणि शक्ति यांचा फार तर लहानसा अंश सामाजिक सुधारणेंत खर्च होत असतां, राजकीय प्रगति करणें शक्य आहे, आणि आज प्रत्यक्ष आमच्या डोळ्यांपुढें केली जात आहे."

अशी ही वस्तुस्थिति असतां, हिंदुस्थानच काय तें सर्व सामाजिक सुधारणा पार पाडल्याशिवाय राजकीय सुधारणेस लायक होणार नाहीं, ह्या म्हणण्यांत काय अर्थ आहे ! सामाजिक सुधारणा आणि राजकीय सुधारणा दोन्ही एकसमयावच्छेदेंकरून चालूं शकतील; आणि खरें पाहिल्यास याच दिशेनें हिंदुस्थानचे सर्व सुधारी चाललेले आहेत. ते आपली सर्व शक्ति एकट्या राजकीय सुधारणेकडे किंवा एकट्या सामाजिक सुधारणेकडे लावीत असतात असें नाहीं. वर्तमानपत्रांतून राजकीय चळवळीला विशेष प्रसिद्धि दिली जाते ती विशेष कारणांमुळें; तीं कारणेंहि उघड आहेत.

तरी देखील, त्यांतल्या त्यांत राजकीय सुधारणेलाच पहिलें स्थान कां द्यावें याला कारणें आहेत. तीं दोन. पहिलें असें कीं, हिंदुस्थानांतील सर्व सुशिक्षित वर्गांच्या एकजुटीच्या प्रयत्नांनीं जर राजकीय सुधारणा घडून आली, तर त्याचा सामाजिक सुधारणेच्या प्रगतीवर इष्ट परिणाम झाल्याशिवाय मुळींच राहणार नाहीं. आसामचे माजी गव्हर्नर सर हेन्री कॉटन् यांनीं आपल्या "अभिनव हिंदुस्थान" या पुस्तकांत म्हटल्याप्रमाणें, " राजकीय स्वातंत्र्य नष्ट झाल्यामुळें त्यांच्या सामुदायिक कार्यांच्या कल्पनांना निर्दोष युक्तिवादाचा आणि नीतिवादाचा संस्कार मिळणें शक्य नाहीं; तो संस्कार प्रत्यक्ष सामुदायिक कार्यांनेंच मिळू शकतो. अलीकडे राजकीय बाबींत विचारशक्ति आणि कार्यशक्ति बऱ्याच वरच्या पायरीवर येऊन बसलेल्या आहेत; त्याचा परिणाम लवकरच नैतिक आणि सामाजिक प्रश्नांतहि दिसून येईल अशी आशा करावयास हरकत नाहीं."

दुसरें कारण असें कीं, सुधारणा ही ज्या दिशेनें कमींत कमी विरोध येईल त्या दिशेनें करण्याचा प्रयत्न केला पाहिजे, अशा व्यवहारबुद्धीचा आणि दूरदर्शित्वाचा

सिद्धांत आहे. "कमींत कमी त्रास होऊन जी सुधारणा घडवून आणतां येईल ती पहिल्यानें घडवून आणा, आणि मग ज्या सुधारणांमध्यें त्याहून ज्यास्त विरोध होणार आहे त्यांजकडे आपली शक्ति वळवा. अशानें सुधारणेच्या भावनेला यशस्वितेनें अवश्यमेव मिळणारा जोर तो तुम्हांला प्राप्त होऊन, तुम्ही प्रगतीचें सर्व कार्य अन्य मार्गानें झालें असतें त्याहून सत्वर पार पाडाल."

न्यायमूर्ति तेलंग सांगतात त्याप्रमाणें, "युक्तिवादानें राजकारणांत बरेंच काम होतें, पण सामाजिक सुधारणेंत होत नाहीं; कारण त्या ठिकाणीं भावना आणि परंपरा फार मोठ्या प्रमाणांत गुंतून राहिलेल्या असतात." तसेंच. दुसरेंहि आहे. राजकारणांत आपण सगळे—हिंदु, मुसलमान, पार्शी, पूर्वेकडचे, दक्षिणेकडचे, पश्चिमेकडचे, आणि उत्तरेकडचे सगळे एकदम एकत्र होऊं शकतों. अडचणी, खऱ्या किंवा मानलेल्या, सगळ्यांच्या एकच असतात; उपायसुद्धां, फारसे कोणाच्या प्रबळ परंपरेशीं जखडलेले नसल्यानें, एकच असतात; अर्थात् सर्व समंजस सुशिक्षित हिंदी लोकांचें अवश्यमेव एकमत असतें. परंतु सामाजिक सुधारणेंत ही परिस्थिति अजीबाद निराळी पडते. "पहिली गोष्ट म्हणजे, सर्वांच्या अडचणी एकच असतात असें नाहीं. सभोंवतालच्या परिस्थितीमध्यें हरतऱ्हा असते. परंपरा आणि गतकालीन स्मृती यांचा जोर सर्वत्र सारखाच नसतो. आणि म्हणून निरनिराळ्या माणसांना निरनिराळे उपाय सुचणें अपरिहार्य होतें."

या सर्व विवेचनावरून स्पष्ट दिसून येईल कीं, हिंदुस्थानांत राजकीय सुधारणेच्या आधीं सामाजिक सुधारणा झाली पाहिजे अशा प्रकारची ओरड ही केवळ स्वार्थबुद्धीची ओरड होय, आणि ती आजच्यासारखा जेव्हां राजकीय प्रगतीचें पाऊल पुढें पडावयाचा प्रश्न येतो तेव्हां विशेष ऐकूं येते. परंतु अशा ओरडीला इतिहासाचा मुळींच पाठिंबा नाहीं. उलट, सामाजिक सुधारणेच्या आधीं राजकीय सुधारणा होणें योग्य असें म्हणावयाला मात्र इतिहासाचा आधार आहे.

---

## प्रकरण ७ वें.

# सरकारला सामाजिक सुधारणा पाहिजे आहे काय?



येथवर आपण गेल्या प्रकरणांत सांगितलेल्या दोन प्रश्नांतून एकाचा विचार केला. आतां दुसऱ्याचा विचार करूं. आमचें म्हणणें थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे

असें की, आम्हांला सामाजिक सुधारणा घडवून आणण्याकरितां राजकीय सत्ता पाहिजे आहे. 'पण ब्रिटिश सरकारास आपल्या सत्तेचा उपयोग करून तशी सामाजिक सुधारणा हिंदुस्थानांत घडवून आणतां येणार नाहीं काय?' 'नाहीं,' हेंच आमचें या प्रश्नास उत्तर. 'सरकारी कायद्याच्या मदतीशिवाय तुम्हांला सामाजिक सुधारणा घडवून आणतां येणार नाहीं काय?' या प्रश्नालाहि पुनः तेंच उत्तर कीं, 'नाहीं' त्रिवार 'नाहीं'। अर्थात् आतां आमच्या सामाजिक-सुधारणा घडवून आणण्याचा उपाय राहतो तो एकच कीं आमच्या हातीं आजच्या-हून अधिक राजकीय सत्ता देणें; तिचा उपयोग करून मग आम्ही आमचा समाज सुधारूं.

यांत पहिली गोष्ट अशी की, ब्रिटिश सरकार हें परकीय सरकार असल्यामुळें, लोकांची सामाजिक प्रगति करण्यांत तें मन घालीत नाहीं. समाजसुधारणेकरितां जर एखाद्या कायद्याची आवश्यकता भासून आली, आणि बऱ्याच लोकांनीं त्याबद्दल मागणी केली असली, तरी देखील सरकार कांहींसे घाबरत असतें. त्याला अशी भीति वाटते कीं, आपण जर अर्धसामाजिक अर्धधार्मिक अशा एखाद्या प्रश्नांत सुधारणा करण्याकरितां हात घातला, तर त्यामुळें जुन्या पंथाच्या लोकांत असंतोष उत्पन्न होऊन ब्रिटिश राजसत्तेला कांहींसा धोका येईल. ही भीति निराधार असल्याबद्दल आमची खात्री आहे, पण परकी राजसत्तेला अशी भीति वाटणें साहजिक आहे हेंहि कबूल करणें भाग आहे.

हिंदी राजवटींत अशी स्थिति नव्हती, आणि असणारहि नाहीं. सुप्रसिद्ध कायदेपंडित आणि हिंदुस्थान सरकारचे एक माजी कायदे-प्रधान सर हेन्री मेन् यांनीं ब्रिटिश हिंदुस्थानच्या कोर्टांत चालणाऱ्या 'हिंदु लॉ'संबधानें म्हटलें आहे कीं "त्या कायद्यांत जो आज एक प्रकारचा ताठपणा आणि लवचीकपणाचा अभाव दिसतो तो त्याच्यांत नवीन आला आहे. ब्रिटिश राज्य होण्यापूर्वी तो त्याच्यांत नव्हता." परकी सरकारास जें करावयास भीति वाटते, तें देशी सरकार सहज करूं शकेल. कारण, सरकार देशी असलें म्हणजे मग कायद्यानें केलेली एखादी सुधारणा आपणावर जबरीनें लादण्यांत आली असें लोकांना वाटत नाहीं. न्यायमूर्ति तेलंग हे मराठ्यांच्या इतिहासाचे एक चांगले निष्णात अभ्यासक होते; ते सांगतात कीं, पेशवाईच्या काळीं महाराष्ट्रांत सामाजिक मतौदार्य वाढ झालेलें होतें, आणि "पेशवाई जर आणखी कांहीं काळ राहती, तर

आज ज्या कित्येक सामाजिक सुधारणा आम्हांला आणि ब्रिटिश सरकारला इतक्या जड वाटत आहेत त्या शतपटीनें सोप्या झाल्या असत्या.”

आजहि देशी संस्थानें, त्यांतल्या त्यांत मोठीं देशी संस्थानें, समाजसुधारणाविषयक उपाय योजण्यांत ब्रिटिश सरकारहून निर्विवाद श्रेष्ठ ठरतात. उदाहरणार्थ, म्हैसूर आणि बडोदें घ्या. म्हैसूरमध्यें अनेक सामाजिक सुधारणा सरकारमार्फत, नुसत्या अंमलबजावणी खात्याच्या हातूनसुद्धां झालेल्या आहेत. या कामीं हिंदी संस्थानिकांना मुळींच कसला तो घावरटपणा वाटत नाहीं. त्यांना जनतेच्या गरजा जणूं काय उपजत बुद्धीनेंच कळून येतात. या संस्थानिकांचें वाईट तें एवढेंच कीं, त्यांपैकीं बहुतेक जण सुखासीन आणि चैनबाज असून आपली जबाबदारी पुरतेपणीं ओळखीत नाहींत.

आतां ब्रिटिश सरकारची गोष्ट घ्या. त्याजकडून समाजसुधारणेस कांहींच मदत होत नाहीं म्हटलें तरी चालेल. ब्रिटिशांनीं हिंदुस्थानांत पाश्चात्य शिक्षण सुरू केलें, आणि त्यामुळें हिंदी लोकांची समाजविषयक विचारबुद्धि बरीचशी जागृत झाली, तशीच ती ख्रिस्ती चळवळीमुळेंहि झाली, याबद्दल संशय नाहीं. पण या पलीकडे ब्रिटिश सरकारानें प्रत्यक्ष असें समाजसुधारणाकार्य फारच थोडें केलें असेल ! हे असे ते कां वागतात, हें एका अर्थी सहज समजण्यासारखें आहे; ते परकी लोक आहेत, त्यांचें पहिलें काम स्वतःची सत्ता रक्षण करणें हें आहे; साहजिकच ते त्या सत्तेला धोका येईल म्हणून लोकांच्या सामाजिक कामांत खोल हात घालावयास भितात; ही त्यांची भीति योग्य वा अयोग्य हा प्रश्न निराळा.

परंतु असे ते सामाजिक सुधारणा घडवून आणण्याकडे फारसें लक्ष घालीत नसतां, राजकीय प्रगतीची मागणी अडवूं लागली कीं मात्र सामाजिक दुराचारांकडे बोट दाखवावयास मुद्दाम एका पायावर तयार होऊन येतात ! कित्येक हिंदी पुढाऱ्यांना आतां असें वाटूं लागलें आहे कीं, ब्रिटिश सरकारनें समाजसुधारकांच्या प्रयत्नांबद्दल बाह्यतः कितीहि थधळपथळ सहानुभूति दाखविली तरी समाजांतले अनिष्ट प्रकार निघून जावे अशी त्याची खरोखर मुळींच इच्छा नाहीं. कारण ते जर निघून गेले तर राजकीय प्रगतीची मागणी अंगावर आली असतां सदैव पुढें धरावयास उपयोगी पडणारी त्यांची ढाल नाहींशी झाल्यासारखी होईल; म्हणजे ब्रिटिश राज्य हिंदुस्थानांत पाहिजे म्हणावयाचें कारणच तेवढया प्रमाणांत कमकुवत होईल !

यावर कदाचित् कोणी म्हणेल कीं, सामाजिक सुधारणाविषयक कांहीं कांहीं बाबी खुद्द ब्रिटिश राजवटींत घडून आल्या आहेत. सती जाणें बंद करण्यांत आलें, विधवापुनर्विवाह कायद्यानें मान्य करण्यांत आला, संमतिवयाचा कायदा पास झाला, इ. इ०. परंतु हेंच काय तें गेल्या शंभराहून अधिक वर्षांच्या ब्रिटिश कारभाराचें समाजविषयक कार्य ना! शिवाय यांतली प्रत्येक बाब तडीस नेण्याकरितां हिंदी समाजसुधारकांना भयंकर चळवळ करावी लागली आहे! आणि दर खेपेस ब्रिटिश सरकार थोडेंबहुत पावरत असे, इतकेंच नव्हे तर तें त्या सुधारणेस विरोध करतें आहे कीं काय असेंहि दिसे. परंतु राजा राममोहन रॉय यांजपासून सुरू झालेली सुधारक-रत्न-मालिका पुढें अखंड चालू राहिली—बिलक्षण उत्साही, अमर्याद कार्यशक्तिमान् आणि अढळ विश्वासाचे पुरुष निर्माण झाले—ईश्वरचंद्र विद्यासागर, डॉ. भांडारकर, न्यायमूर्ति रानडे असे मोठमोठे विद्वान् समाजसुधारणेच्या कामीं पुढें झाले, आणि त्यांनीं ब्रिटिश सरकारची सतत पाठ पुरविली. हिंदुस्थानांत येऊन राहिल्यानें आतां त्यांजकडून कोणतें महत्कार्य घडून येण्यासारखें आहे याची त्यांना कल्पना दिली,—असे सतत दीर्घकाल परिश्रम आमच्या समाजसुधारक पुढाऱ्यांनीं केले—म्हणूनच काय ती थोडीशी प्रगति झाली. या कामीं त्यांना केवढा प्रयास पडला याची कल्पना नाहीं! एवढ्या खटाटोपीनें हिंदी राज्यांत किती तरी प्रगति करतां आली असती! पण हे खटाटोप जर ते न करते, तर ब्रिटिश सरकारनें स्वतः होऊन मात्र कांहींच केलें नसतें हें खास!

ब्रिटिश राजवटींत आज सामाजिक सुधारणेची काय स्थिति आहे? ब्रिटिश लोक आपणहून कांहींहि योजना पुढें आणणार नाहींत. पण समजा कीं एखाद्या लेजिस्लेटिव्ह असेम्ब्लीच्या किंवा प्रांतिक कौन्सिलच्या सभासदानें कांहीं विशिष्ट सामाजिक अनिष्ट प्रकार दूर करण्याकरितां बिलाच्या रूपानें कांहीं उपाययोजना पुढें मांडली, तर सरकारची एक पद्धतच ठरून गेली आहे कीं, प्रथम चेष्टेवारी घालवावयाचें, पण चेष्टेनें काम भागत नाहीं असें दिसूं लागलें कीं मग 'लोकमताचा आधार नाहीं' या सबबीवर तें बिल कायदेमंडळांत पास होऊं नये म्हणून त्याच्या मार्गांत शक्य त्या अडचणी आणावयाच्या! पुढें अँग्लोइंडियन वृत्तपत्रें आहेतच. तीं देशांत फार प्रबळ आहेत, आणि सरकारवरहि त्यांचें वजन आहे. तीं सरकारचें म्हणणें उचलून धरितात, आणि आपल्या सुपीक डोक्यांतून नवीन नवीन युक्तिवाद काढून, त्या बिलास प्रत्यक्ष विरोध न करितां

तें लांवणीवर टाकावें असें सुचवितात; कारण काय कीं, लोकांची अद्याप तितकी तयारी नाहीं! जणुं काय लोकांचें मन नेमकें ह्यांनाच ठाऊक! आणि हींच अँग्लोइंडियन पत्रें पुनः राजकीय प्रगतीचा प्रश्न आला कीं, 'नको! लोकांत सामाजिक सुधारणा झाली नाहीं तोंवर नको' असेंहि उलट बेशरमपणानें सांगावयास कमी करीत नाहींत!

हें जें सरकारचें आणि अँग्लोइंडियन वृत्तपत्रांचें वर्तन, त्याचें नुकतेंच दिसून आलेलें उदाहरण म्हणजे रायसाहेब हरविलास शारदा यांनीं असेंब्लीमध्यें आणलेल्या बिलासंबंधानें. या बिलाचा हेतु हिंदु मुलांमुलींचे अनुक्रमें १८ आणि १४ वर्षांच्या खालचे विवाह कायद्यानें शिक्षेस पात्र ठरवून त्यांच्या विवाहाची वयोमर्यादा वाढवावी असा आहे. देशांतल्या सर्व सुसंस्कृत लोकांचें मत त्याच्या पाठीशीं आहे. तरी देखील सरकार तें पास होऊं देण्यांत हरतऱ्हेचा विलंब लावीत आहे, आणि देशांतलीं सगळीं अँग्लोइंडियन् पत्रें, टाइम्स ऑफ इंडिया सुद्धां, सरकारला पुष्टी देत आहेत. पण एकूणएक हिंदी वर्तमानपत्रें—जहाल, राष्ट्रीय, नेमस्त आणि एरवीं नेहमीं सरकारच्या बाजू धरणारीं सुद्धां—तें बिल अगदीं लवकर पास व्हावें अशी मागणी करीत आहेत. ही जी सरकारची आणि अँग्लोइंडियन पत्रांची वागणूक, तिजवरून काय निष्कर्ष निघतो? आम्ही हें फक्त एकच आणि अगदीं अलीकडचें उदाहरण म्हणून दिलें आहे. पण अशीं किती तरी उदाहरणें दाखवितां येतील.

कायदे सर्वसाधारण जनतेच्या मतावर अवलंबून ठेवणें हें सामान्यतः अधिक सुरक्षितपणाचें असेल. परंतु सामाजिक सुधारणेमध्यें खरी किंमत सुसंस्कृत लोकमतासच आहे. शिवाय लोकांच्या प्रतिनिधिरूप असलेल्या मध्यवर्ती कायदे मंडळाचें एखाद्या गोष्टीस पाठबळ असल्यावर मग ती गोष्ट पुनः लोकांकडे अभिप्रायार्थ पाठविण्याची जरूर कुठें राहते? शिवाय अशाहि 'कांहीं बाबी आहेत कीं नाहीं, कीं ज्यांत कायदे लोकमत पाहण्यापूर्वीच केले जातात, आणि करणें जरूरहि असतें? सतीसंबंधानें जर सरकारनें समाजसुधारकांचें न ऐकतां सर्वसाधारण रयतेचें मत घेण्याचें मनांत आणलें असतें तर आज या घटकेपर्यंत तरी सतीची चाल बंद झाली असती कीं काय याची शंकाच आहे!

इंग्लंडमध्यें सुद्धां पुष्कळ गोष्टींत सुधारणा कायद्याच्या साहाय्यानें लोकमताच्या पुढें आघाडी मारून झालेली आहे; याबद्दल खात्री करून घ्यावयाची असल्यास

प्रोफेसर ए. व्ही. डायसी यांचा "कायदा आणि लोकमत" हा ग्रंथ वाचावा. डायसी सांगतात कीं, इंग्लंडमध्यें पुष्कळ सुधारणा पार्लमेंटमधून पसार करून घेण्यांत आल्या त्या वेळीं अगोदर लोकमत विचारांत घेतलें नव्हतें इतकेंच नव्हे तर कित्येकदां लोकमत विरुद्ध होतें. तें कायदा पास झाल्यानंतर अनुकूल होऊं लागलें आणि त्या कायद्यामुळें मग जनतेची सदसद्विवेकबुद्धिहि जागृत झाली.

एकंदरींत विचार करितां, हिंदुस्थानांतलें ब्रिटिश सरकार सामान्यतः समाजसुधारणाविषयक कायदे करावयाच्या विरुद्धच आहे. आणि सध्यांची राज्यव्यवस्था चालू असेपर्यंत समाजसुधारकांचें कार्य अमुक एका मर्यादेच्या पलीकडे यशस्वी होणें शक्य नाहीं, अशी बऱ्याच अनुभवांतीं हिंदी समाजसुधारकांची खात्री होऊन चुकली आहे. म्हणून ते जे आतांपर्यंत साधारणपणें राजकीय चळवळीपासून अलिप्त राहत तें सोडून आतां ते राजकारणी पुढाऱ्यांप्रमाणेंच राजकीय सत्ता मागूं लागले आहेत. कारण ती मिळाल्यानें आपणास शक्य तितक्या लवकर सामाजिक सुधारणा घडवून आणतां येईल अशी त्यांची खात्री आहे. पश्चिम हिंदुस्थानचे प्रख्यात समाजसुधारक कै. डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, राजकारणांत अगदीं जुनें आहे तें बरें म्हणणारे—पण तेसुद्धां शेवटीं या मताकडे वळले होते.

अतएव मिस् मेयो जें आम्हांला अगदीं जोरजोरानें सांगत आहे कीं, "शुद्ध हिंदी लोकांच्या हृदयांत जेव्हां नवीन तेज तळपूं लागेल, तेव्हांच त्यांचा तरणोपाय आहे एरवीं नाहीं" तें तिचें म्हणणें अगदीं बरोबर आहे. मात्र आमचें 'बरोवर' एका अर्थानें, आणि तिचें दुसऱ्या अर्थानें, एवढाच काय तो फरक आहे. ती असें चुकीचेंच गृहीत धरून चालली आहे कीं, सरकारनें हात न घालतांहि समाजसुधारणा होऊं शकेल, परंतु तिजकरितां हिंदी लोक व्यक्तिशः किंवा सामुदायिक असा मुळींच कांहीं प्रयत्न करीत नाहींत. उलट आम्ही तर असें सांगतों कीं, आमच्या समाजसुधारकांनीं हिंदु समाजसुधारणेसाठीं व्यक्तिशः आणि सामुदायिक शक्य तो प्रयत्न केलेला आहे, आणि अद्यापि ते करीत आहेत. पण त्यांचे सर्व उपाय आतां हरले आहेत. यापुढें आतां समाजसुधारणेचें पाऊल सरकारच्या साहाय्याविना जलद पडणें शक्य नाहीं असें त्यांना दिसून येत आहे. हिंदुस्थानांतली सध्यांची ब्रिटिश राज्यव्यवस्था समाजसुधारणा जलदीनें व्हावयास पोषक नाहीं, सबब लोकांना अधिक राजकीय हक्क दिले पाहिजेत, म्हणजे त्यांचा उपयोग करून ते आपल्या समाजांतल्या वाईट गोष्टी काढून टाकतील.

प्रकरण ८ वें.

# अराजकता मुळीं होतीच कुठें ?

———:०:———

" ब्रिटिश राज्य होण्यापूर्वी हिंदुस्थानांत सर्वत्र गोंधळ माजून राहिलेला होता. आणि ही अराजक स्थिति नाहींशी करून ब्रिटिश लोकांनी देशांत सर्वत्र सुव्यवस्था केली." अशी एक कल्पना आज बराच कालपर्यंत हिंदुस्थानांत आणि इंग्लंडांत चालू असून, ती जगभर पसरविण्याचा सारखा यत्न चालू आहे.

प्रत्येक जण ही कल्पना जणुं काय खरीच असें मानून चालला आहे. ती मुळीं खरी आहे कीं खोटी आहे हा प्रश्नच कोणी काढीत नाही. त्यामुळें ती दीर्घ काल अबाधित चालू राहून तिला आतां सर्वसंमत सत्य गोष्टीचें स्वरूप प्राप्त झाल्यासारखें दिसत आहे. कित्येकांना वाटलें असेल कीं, ही कल्पना खरी कीं खोटी हा आतां शुष्क पुस्तकी वाद आहे, हवा कशाला ? शिवाय, ब्रिटिश सरकार ही कल्पना एक ऐतिहासिक सत्य म्हणून हिंदुस्थानच्या हितविरोधार्थ मोठ्या युक्तिबाजपणानें जगभर पसरवील ह्याची तरी कोणास कल्पना होती !

मिस् मेयोनें, कोणाहि दुसऱ्या ब्रिटिश किंवा अन्य परदेशीय लेखकाप्रमाणें ही कल्पना सत्य आहे असें गृहीत धरून त्यावरून नाना तऱ्हेचे निष्कर्ष काढले आहेत. यावर दुसऱ्या पारड्यांत जर कोणी तोटे दाखवूं लागला, तर मोठमोठ्यानें ओरडून सांगण्यांत येत असतें कीं, ब्रिटिशांनीं हिंदुस्थान अराजकतेंत जळत असतां त्याला बाहेर सुस्थितींत आणून ठेवलें, हेंच आधीं केवढें हिंदुस्थानचें कोटकल्याण केलेलें आहे तें हिंदी लोक विसरतात. आणि तेंच पुनः मेयोनेंहि आपल्या या पुस्तकांत सांगितलें आहे, आणि तें इतक्या वेळां, अगदीं कानठाळ्या बसेपर्यंत कीं, बिचाऱ्या सामान्य माणसाला तें जणुं स्वयंसिद्ध सत्यच आहेसें वाटावें ! याकरितां, एक तर सत्याविष्करण म्हणून, आणि दुसरें, ब्रिटिश राजकारणी लोक आमची राजकीय मागणी पार्लमेंटासमोर आली कीं या कल्पनेचा फायदा घेऊन ती मागणी हाणून पाडतात म्हणून, ही कल्पनाच पार उडवून दिल्याशिवाय आतां गत्यंतर नाहीं.

*ब्रिटिश राज्य होण्यापूर्वी हिंदुस्थानांत खरोखरच अराजकता होती काय ?* आणि तिच्यांतून ब्रिटिश लोकांनीं आम्हांला सोडविलें काय ? या प्रश्नाला शाळांत चालू असलेलीं इतिहासाचीं पुस्तकें "होय" म्हणून उत्तर देतील. पण हीं पुस्तकें शाळाखात्यांतल्या ब्रिटिश अधिकाऱ्यांनींच, आणि हिंदी मुलांकरितां

म्हणून, लिहिलेली आहेत. त्यांत ब्रिटिश लोक म्हणजे केवळ धर्मावतार आणि त्यांना विरोध करणारे किंवा त्यांच्याशीं लढणारे ते जणुं काय अडाणी रानटी म्हणून दाखविलेले आहेत. अशा तऱ्हेचें इतिहास-शिक्षण हिंदुस्थानांतल्या शाळांत देण्याचा हेतु हा कीं, हिंदी लोकांनीं मनांत ब्रिटिश लोकांसंबंधानें जी समजूत ठेवून रहावें असें सरकारला वाटतें ती समजूत लहानपणींच त्यांच्या कोंवळ्या मनावर पक्की बिंबवून ठेवावी. अशानें हिंदी लोक सदैव राजनिष्ठ आणि आज्ञाधारक बनून राहतील अशी एक कल्पना आहे, आणि तिच्यांत थोडेंबहुत सत्यहि आहे.

अशा तऱ्हेनें हिंदी लोकांत ब्रिटिश राज्याबद्दल राजनिष्ठा तयार करण्याचा तो एक कारखाना आहे, हें या इतिहास-लेखनाचें स्वरुप जरी बाजूस केलें, तरी देखील आमच्या हिंदुस्थानचा इतिहास आमच्याकरितां बहुतांशीं युरोपियनांकडून लिहिला जावा हें आमचें दुर्दैवच आम्हीं समजतों. याचा अर्थ असा नव्हे कीं, त्यांनीं आमचा गतकाल आमच्यासमोर आणून ठेवण्याचा प्रयत्न केला त्याबद्दल आम्हांला कृतज्ञता वाटत नाहीं ! एल्फिन्स्टन्, ग्रॅन्ट डफ्, माल्कम, आणि अलीकडे सर व्हिन्सेन्ट स्मिथ्, यांचें हिंदी लोकांस सदैव कृतज्ञतापूर्वक स्मरण राहील; कारण त्यांच्या दृष्टीस जसें दिसलें तसें त्यांनीं शक्य तितक्या काळजीपूर्वक आमच्याकरितां लिहून ठेवलें !

परंतु ब्रिटिश इतिहासकारांनीं जेथें ब्रिटिश लोकांच्या हातून हिंदुस्थानांत घडलेल्या गोष्टींचें वर्णन करण्याचा प्रयत्न केला आहे तेथें त्यांचा मुद्दाम म्हणून आणलेला नसला तरी नकळत असा ब्रिटिशांच्या कृत्यांचें समर्थन करण्याकडे कल दिसून येतो. ब्रिटिशांचीं पुष्कळ कृत्यें त्यांनीं दोषार्ह मानिलीं आहेत हें खरें, तरी सामान्यतः त्यांचा असा युक्तिवाद असतो कीं, एकंदरीत सर्व गोष्टी विचारांत घेतां ब्रिटिश लोकांचा त्यांत कांहीं दोष नव्हता !! अशा या लेखकांच्या अनेक गोष्टींपैकीं एक गोष्ट म्हणजे १८५७ सालच्या बंडाची त्यांनीं अगदींच गैरसमज करील अशी लिहिलेली हकीगत घेऊन मि. एडवर्ड थॉम्प्सन् यांनीं आपल्या "पदकाची दुसरी बाजू" या पुस्तकांत त्यांचा चांगला समाचार घेतला आहे.

पण मौज अशी कीं, असल्या या लेखकांच्या पुस्तकांत देखील आपणास दिसतें कीं, त्याकाळीं देशाच्या अनेक भागांत चांगली राज्यव्यवस्था होती, देशांत शांतता नांदत होती, ब्रिटिश लोकच कांहीं तरी निमित्त काढून देशी

राजांबरोबर लढाईचे प्रसंग आणून देशांत अराजकता उत्पन्न करीत, आणि ब्रिटिश नसते तर सगळा देशचा देश वस्तुतः मराठ्यांच्या सत्तेखालीं येण्याचा अगदीं बळकट संभव होता.

हिंदुस्थानांत अराजकता होती असें म्हणणाऱ्यानें 'अराजकता' म्हणजे काय हें आधीं पुरतेपणीं समजून घेणें जरूर आहे. हिंदुस्थानांत एकछत्री राज्य नसून अनेक राजसत्ता नांदत होत्या, म्हणजे सर्वत्र अराजकता होती असें म्हणावयाचें नाहीं. हिंदुस्थान हा एक विस्तीर्ण भूभाग—रशिया वगळून युरोपखंडाएवढें एक खंड—आहे. युरोपांत आज अनेक राज्यें आहेत, आणि पूर्वींहि होतीं; प्रत्येक जण आपापल्या मुलखाचा कारभार चालवीत होता व आहे. अर्थात् सर्व ठिकाणीं मिळून एकच सत्ता नाहीं, याचा अर्थ अराजकता आहे असा निघूं शकत नाहीं!

दुसरा मुद्दा असा कीं, हिंदुस्थानांतले राजे नेहमीं एकमेकांशीं लढाया करीत. परंतु अशीच स्थिति युरोपांतहि होती. गेलीं तीन शतकें निरनिराळ्या देशांमध्यें सारख्या लढाया चालू असल्याचें दिसतें. १७ व्या आणि १८ व्या शतकांत असा एक पांच वर्षांचा सुद्धां काल दाखवितां येणार नाहीं कीं ज्या वेळीं युरोपांत लढाई चालू नव्हती. म्हणून तेथें अराजकता चालू होती असें कोणी म्हणेल-काय?

अराजकता तेव्हांच म्हणतां येईल कीं, ज्या वेळीं सरकारकडून लोकांचें वास्तविक तें रक्षण होत नाहीं. लढाया चालू असोत किंवा नसोत, जोंपर्यंत सरकारकडून लोकांचें योग्य तें रक्षण होत आहे तोंपर्यंत ती अराजकता म्हणणें चुकीचें होय. लहान सहान गडबडी ह्या व्हावयाच्याच, त्या हिशेबांत घ्यावयाच्या नाहींत. कारण तशा मग आजहि ब्रिटिश हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं जातीजातींत आणि धर्माधर्मांत तंटे-मारामाऱ्या होतात, म्हणजे आज अराजकता चालू आहे असें नव्हे! नॉर्थ वेस्ट फ्रंटिअर कमिटीच्या रिपोर्टास श्रीयुत रंगाचारिअर यांनीं भिन्नमतपत्रिका जोडलेली आहे, तिच्यांत त्यांनीं असें दाखविलें आहे कीं, तो प्रांत आज इतकीं वर्षें ब्रिटिशांच्या ताब्यांत असूनहि अद्याप बहुतांशीं अराजक स्थितींतच आहे! तसेंच, मुंबईत आणि कलकत्त्यांत आज ब्रिटिश सत्तेच्या डोळ्यांदेखत दरवर्षी शेंकडों सहस्र दरवडे होतात. परंतु हें कांहीं अराजकतेचें लक्षण नव्हे. खुद्द इंग्लंडा-सारखा आटपशीर देश, परंतु त्यांच्यांतहि १८ व्या शतकांत अनेक गडबडी, अनेक मारामाऱ्या, आणि 'पंधरा' व 'पंचेचाळीस' अशीं दोन बंडें झालीं. ह्यावरून तेव्हां इंग्लंडांत अराजकता होती असें कोणी म्हटलें आहे काय? अर्थात्

या व हिंदुस्थानच्या इतिहाससंबंधींच्या आपल्या इतर पुस्तकांत चांगला योग्य असा उपयोग केलेला आहे.

फक्त मुलुख मिळवावा, एवढयाच एका लोभानें लॉर्ड वेलस्ली आणि त्यांच्या मागाहून आलेल्या लोकांनीं सबंध हिंदुस्थान देश ब्रिटिश सत्तेखालीं आणला. अराजकता, गडबडगोंधळ, असलें कांहींहि नव्हतें. संभव असा होता कीं, जर युरोपियन् लोक या देशांत आले नसते, तर मराठ्यांचें साम्राज्य अखिल हिंदुस्थानभर पसरलें असतें. परंतु नियति कांहीं निराळीच होती! ब्रिटिश आणि फ्रेंच परस्परांबद्दलच्या वैरभावानें आपापसांत लढले, त्यांत त्यांनीं हिंदी राज्यांना गुंतवून टाकिलें आणि त्यांची आज आहे उद्यां नाहीं अशी संशयित स्थिति करून टाकिली; आणि शेवटीं जेव्हां फ्रेंच सत्ता मोडून पडली, तेव्हां ब्रिटिशांनीं आपल्या विजयोत्साहाच्या भरांत हिंदी राज्यांवर मात करावयाची विद्या लवकरच शिकून त्यांस जिंकून टाकलें. याप्रमाणें हा हिंदुस्थानांतील ब्रिटिश सत्तेचा उदय तेथील स्वतंत्र राज्यांचा काळ होऊन बसला.

असा हा हिंदुस्थानचा खराखुरा इतिहास असतांना, ब्रिटिशांनीं हिंदुस्थानाला अराजकतेपासून सोडविलें असें म्हणणें म्हणजे निव्वळ बाष्कळपणा नव्हे काय? हिंदी राजांबरोबर ब्रिटिश लढले, आणि त्यांच्याहून बलिष्ट असल्यामुळें त्यांना त्यांनीं जिकलें! अराजकता कसची आणि मुक्तता कसची! समजा जर्मनीनें फ्रान्सला जिंकून आपल्या सत्तेखालीं ठेवलें असतें, तर एवढयाच एका गोष्टीवरून कोणाला असें म्हणतां आलें असतें काय कीं जर्मनीनें फ्रान्सला अराजकतेंतून सोडविलें? कोणी एवढेंच म्हटलें असतें कीं, एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राला जिंकलें! आणि तोच प्रकार हिंदुस्थानांतहि घडला! इंग्लंड देश नॉर्मन् लोकांनीं जिंकला; यावरून असें नव्हे कीं, हेरल्ड राजा असतांना इंग्लंडांत अराजकता होती!

अराजकतेसंबंधाची ही बडबड व्यर्थ कांहीं तरी आहे! पेंढाऱ्यांच्या टोळ्यांनीं देशभर धुडगुस घातला असा एक बाऊ दाखविण्यांत येतो. पण तोहि खोटा कसा आहे पहा! त्यांच्या लुटीचीं वर्णनें अतिशयोक्तीनें भरलेलीं आहेत. पेंढाऱ्यांनीं पुष्कळ त्रास दिला हें खरें. पण यांत आपण दोन तीन गोष्टी लक्षांत घेतल्या पाहिजेत. प्रबळ राजांच्या मुलखांत पेंढारी गेले नाहींत, कारण आपण सहज चिरडले जाऊं हें त्यांना ठाऊक होतें. लहान सहान देश, पेंढारी आले कीं त्यांना पैसे देऊन परतवीत, किंवा त्यांनीं येऊन त्रास देऊं नये म्हणून त्यांना वार्षिक नेमणूक करून देत. परंतु कसेंहि करून त्यांजपासून आपल्या प्रजेचें रक्षण

करीत. जेथें या मार्गानें पेंढाऱ्यांपासून रक्षण होत नसे, तेथें गांवच्या पंचायतीचे लोक त्यांचे हल्ले परतवीत, किंवा कांहीं नेमणूक करून ठेवून त्यांच्या त्रासांतून मुक्त होत असत. अतएव पेंढारी हे फार त्रासदायक लोक होते तरी पैशानें त्यांचा तो त्रास बहुतांशीं चुकविला जात असे.

दुसरें लक्षांत ठेवावयाचें तें हें कीं, 'पेंढारी राज्य' हा पुढच्या पुढच्या कालांत तयार झालेला प्रकार आहे, आणि तो तयार होण्याचें कारणहि पुनः ब्रिटिशांची मुलूखगिरी किंवा निदान ब्रिटिश लढायांमुळें माजलेला गोंधळ आणि त्यामुळें स्वतंत्र राजांचें थांखडलें गेलेलें सामर्थ्य होय. शिवाय हा पेंढाऱ्यांचा त्रास ३० हून जास्त वर्षे मुळींच राहिला नाहीं. स्वतंत्र राजांचे हात मोकळे असते तर त्यांनीं केव्हांच पेंढाऱ्यांना धूळ खात बसविलें असतें !

वर आम्ही ग्रामपंचायतींचा उल्लेख केलेला आहे. ह्या ग्रामपंचायती हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेचे प्राचीन कालापासून चालत आलेले स्वयंशासित असे घटक असून, ते देशांत सुव्यवस्था राखण्याचें मुख्य साधन होते. राज्याराज्यांत लढाया होवोत, किंवा पेंढारी अगर दुसरे कोणी लुटारू लोक देश लुटून नेवोत, ह्या ग्रामपचायती आपलें स्वतःचें स्वातंत्र्य हरएक प्रकारें रक्षण करीत. हिंदुस्थानचा अराजकतेपासून बचाव करणाऱ्या खऱ्या संस्था ह्या होत.

ह्या संस्था ब्रिटिश आल्यावर त्यांनीं नाहींशा केल्या. पण तोंपर्यंत त्या कशा सतत चालत आलेल्या होत्या, आणि किती कार्यक्षम होत्या हें पाहून हिंदुस्थानांतले मोठमोठे जबाबदार ब्रिटिश अधिकारी आश्चर्यचकित झालेले आहेत. कांहीं काळ हिंदुस्थानचे गव्हर्नर-जनरल असलेले सर चार्लस मेटकाफ त्यांजबद्दल काय म्हणतात पहाः—

"ह्या ग्रामपंचायती म्हणजे लहानशीं प्रजासत्ताक राज्येंच होत; त्यांत त्यांना जरूर पडणारी प्रत्येक गोष्ट आहे; त्या दुसऱ्या कोणत्याहि परकी राष्ट्रावर अवलंबून नाहींत. जेथें दुसरें कांहीं टिकत नाहीं, तेथें ह्या तेवढया टिकतात असें म्हणतां येईल. घराणींच्या घराणीं कोसळलीं, राज्यांमागून राज्यें येऊन गेलीं, पठाण, मोंगल, मराठे, शीख, ब्रिटिश सगळे येऊन एकामागून एक मालक झाले, पण इकडे ग्रामपंचायती आहेत तशाच आहेत ! प्रत्येक ग्रामपंचायत म्हणजे *एक स्वतंत्र राज्य, आणि अशा अनेक ग्रामपंचायतींचा हा संघ,* यामुळें हिंदु लोकांचें जीवित सुखाचें होऊन त्यांना बराचसा मोकळेपणा आणि स्वातंत्र्य लाभतें."

तसेंच सर माउन्ट स्टुअर्ट एल्फिन्स्टन, मुंबईचे माजी गव्हर्नर आणि हिंदुस्थानच्या इतिहासावरील एका उत्कृष्ट ग्रंथाचे लेखक, हे आपल्या विस्तृत आणि माहितीनें भरलेल्या अशा "पेशव्यांकडून जिंकलेल्या मुलखासंबंधाच्या रिपोर्टां"त म्हणतात कीः—

"दक्षिणेंतील स्थानिक राजांच्या राज्यव्यवस्थेसंबंधानें कोणत्याहि दृष्टीनें विचार केला तरी अगदीं पहिली आणि सर्वांत महत्त्वाची जी गोष्ट दिसते ती म्हणजे गांव किंवा नगर हे विभाग होत. हे सत्ताविभाग स्वतःमध्यें स्वतंत्र राज्याची सर्व सामग्री सूक्ष्म प्रमाणांत बाळगून आहेत, आणि इतर सर्व राजसत्ता बाजूस काढल्या तरी स्वतःचें रक्षण करण्यास बहुतांशीं समर्थ असे आहेत. चांगल्या राज्यव्यवस्थेशीं ते कदाचित् जुळणारे नसतील, तरी वाईट राज्यव्यवस्थेंतील वैगुण्यांवर ते उत्कृष्ट उपचार आहेत. कारण वाईट राज्यव्यवस्थेंत उपेक्षेमुळें आणि दुर्बलतेमुळें होणारे अनिष्ट परिणाम, ते होऊं देत नाहींत, आणि तिजमधील जुलमाला आणि अपहारबुद्धीलाहि ते कांहींसे प्रतिबंधक होतात."

यापुढें मराठी राज्यांतलीं कांहीं व्यंगें दाखवून मि. एल्फिन्स्टन म्हणतातः—

"इतकीं हीं सगळीं व्यंगें असतांना देखील मराठ्यांच्या राज्याची भरभराट झाली, आणि असें दिसतें कीं त्यांची प्रजा त्यांच्याहून पूर्ण स्वरूपाच्या आजच्या आमच्या राज्यव्यवस्थेंत दिसणाऱ्या कित्येक अनिष्ट प्रकारांपासून मुक्त राहिली; यावरून त्यांच्या राज्यपद्धतींत असे कांहीं तरी गुण असले पाहिजेत कीं, जे तिजमधील ह्या उघड दिसणाऱ्या वैगुण्यांना पुरून राहिले. या बहुतेक गुणांचें मूळ मला एका गोष्टींत दिसून येतें, ती गोष्ट ही कीं, सरकारनें स्वतः जरी लोकांना न्याय मिळवून देण्याची फारशी सोय केली नाहीं, तरी जेणेंकरून तो त्यांना स्वतः मिळवून घेतां येईल असा मार्ग त्यांना मोकळा ठेवला. ह्याचा फायदा विशेषेंकरून खालच्या वर्गांतील लोकांस घेतां आला. कारण राजसत्तेपासून दूरांत दूर असलेले आणि कोणत्याहि राज्यव्यवस्थेंत उपेक्षिले जाण्याचा जास्तींत ज्यास्त संभव असलेले लोक हेच. ह्या लोकांना वर सांगितलेल्या पंचायतींच्या द्वारें आपसांत न्याय करून घेतां येई. आणि सुदैव असें कीं, ह्या पंचायतींच्या पद्धतीवर एरवीं येणारे बहुतेक आक्षेप या लोकांच्या बाबतींत लागू पडत नाहींत."

ह्यावरून उघड आहे कीं, जोंपर्यंत या ग्रामपंचायती हिंदुस्थानांत चालू होत्या आणि आपलें काम चांगल्या रीतीनें बजावीत होत्या, तोंपर्यंत देशांत अराजकतेचे अनिष्ट प्रकार पसरण्याचा मुळींच संभव नव्हता.

ह्या ग्रामपंचायती ब्रिटिश अंमलांत नाहींशा झाल्या. ब्रिटिश अधिकाऱ्यांना वाटलें की, त्यांची यापुढें कांहीं जरूर नाहीं, म्हणून त्यांनीं पहिल्यानें त्यांचे अधिकार कमी केले, आणि मागाहून त्यांनांच साफ उडवून दिलें. एवढी चूक ब्रिटिशांनीं दुसऱ्या कोणत्याहि बाबतींत हिंदुस्थानांत केली नसेल. ही चूक आतां त्यांच्या लक्षांत येऊं लागली असून कांहीं प्रांतांत पंचायती पुनः स्थापन करण्याचा त्यांचा प्रयत्न चालला आहे; परंतु तो अद्यापि अर्धवटच आहे.

एवढया या सर्व विवेचनाचें तात्पर्य म्हणून वाचकांच्या मनावर आम्हांला एवढेंच ठसवावयाचें आहे कीं, *'ब्रिटिशांनीं हिंदुस्थानाला अराजकतेंतून बचावलें'* असें जें अगदीं स्वयंसिद्ध सत्य म्हणून जगभर पुनः पुनः पुकारण्यांत येत असतें, त्याला मूळांत कोंहींहि आधार नाहीं. ब्रिटिशांनीं आपल्या फायद्यासाठीं हिंदुस्थान देश तत्कालीन अनेक राजांकडून जिंकून घेतला. अराजकता अशी मुळींच नव्हती. जो काय थोडीबहुत गडबड होती ती अराजकतेचे हल्ले ज्यांवर चालू शकणार नाहींत अशीं जीं अनादिकालापासूनचीं ग्रामपंचायतीरूप लहान लहान प्रजासत्ताक राज्यें त्यांत राहणाऱ्या प्रजेला त्रास द्यावयास असमर्थ होती. अतएव ब्रिटिशांनीं हिंदुस्थानाला अराजकतेंतून सोडविलें ही आज बरेच दिवस चालत आलेली कल्पना आतां प्रत्येकानें आपल्या मनांतून तावडतोब काढून टाकिली पाहिजे. कारण ही कल्पना अगदीं अजीबाद खोटी असून ती पुनः पुनः पसरविल्यामुळेंच खरी अशी मानली जात आहे. पण सत्याची चाड असणारांनीं तिला इतःपर यत्किंचितहि थारा देतां कामा नये.

---

## प्रकरण ९ वें.

# चालना कोणी दिली ?

मिस् मेयोच्या पुस्तकाच्या जवळ जवळ प्रत्येक पृष्ठावर कोणत्या ना कोणत्या तरी रूपानें अशी भीति व्यक्त करण्यांत आली आहे कीं, जबाबदार हिंदी लोकांच्या हातीं सत्ता दिल्यास हिंदुस्थान आणि त्याचे हितसंबंध पार नष्ट झालेच म्हणून समजावें! मिस् मेयो असें गृहीतच धरून चालली आहे कीं, हिंदुस्थानचें जर कांहीं कल्याण होणें शक्य असेल तर तें ब्रिटिश अधिकाऱ्यांच्याच हातून! हिंदुस्थानचें

हित करावें अशी कोणामध्यें इच्छा असेल तर ती त्याच्यांतच! तोच एक हिंदुस्थानची मुक्तता करणारा देवदूत, हिंदुस्थानाला वर काढण्याकरितां अहोरात्र देह झिजविणारा महात्मा तोच!

हिंदुस्थानचे ब्रिटिश अंमलापासून काय तोटे झाले आहेत हें आम्हीं मागील एका प्रकरणांत सांगितलें; परंतु त्याचबरोबर कांहीं फायदेहि झाले आहेत हें आम्हांस नाकबूल करतां येत नाहीं. फायदे असें म्हटल्यानें, आम्ही ब्रिटिशांनीं हिंदुस्थानाला अराजकतेंतून बचावलें असलें कांहीं सांगतों आहों असें नव्हे—तें तर गेल्या प्रकरणांत खोटें, अनैतिहासिक, म्हणून सिद्ध केलेंच—आम्ही फायदे म्हणतों ते, शिक्षणाची वाढ, शेतकी, सहकारिता, दळणवळणाचीं साधनें वगैरे सारख्या सरकारच्या हातून घडलेल्या इतर चांगल्या गोष्टी. त्यासंबंधांत आपण तीन गोष्टी लक्षांत घेणें जरूर आहे. पहिली ही कीं, ह्या गोष्टी म्हणजे प्रत्येक सरकारनें केल्याच पाहिजेत अशा मूलभूत गोष्टी आहेत; अर्थात् ब्रिटिश सरकारनें त्या केल्या यांत विशेष तें काय? दुसरें असें कीं, बहुधा जें जें कांहीं सरकारनें लोकांच्या प्रत्यक्ष हितासाठीं केलेलें आहे, त्याची मूळ कल्पना–त्याची योजना–सरकारकडून मुळींच न येतां, ती बाहेरून मुख्यतः सुशिक्षित हिंदी लोकांकडून आलेली आहे; आणि तिसरी गोष्ट ही कीं, सरकारनें जरी एखादी उपयुक्त कामगिरी अंगावर घेतली तरी सरकार ती मनापासून चालवीत नसल्यामुळें तिचा संपूर्ण फायदा रयतेस मिळूं शकत नाहीं. ही शेवटची गोष्ट म्हणजे सरकार परकी असल्याचा अवश्यंभावि परिणाम होय.

हें आतां आपण प्रत्यक्ष उदाहरणांनीं विशद करूं. मागें एका प्रकरणांत आम्ही सामाजिक सुधारणांसंबंधानें विचार करून असें दाखविलें कीं, सामाजिक सुधारणाविषयक कायद्याची अशी एकहि बाब नाहीं कीं, जी सरकारनें स्वतः होऊन पुढें आणिली. प्रत्येक प्रसंगीं हिंदी समाजसुधारकांना आणि सुसंस्कृत हिंदी पुढाऱ्यांना चळवळ करून सरकारवर दाब पाडावा लागलेला आहे.

आतां दुसरी शिक्षणासारखी लोककल्याणकारक बाब घ्या. पाश्चात्य शिक्षण हिंदुस्थानांत सुरु झालें याचें श्रेय ब्रिटिश सरकारलाच आहे हें खोटें नाहीं. परंतु तशी ब्रिटिश सरकारची मुळांत इच्छा होती काय? त्यांनीं तर तें देऊं नये म्हणून जंग जंग पछाडले. राजा राममोहन रॉय यांच्या प्रमुखत्वाखालीं सुसंस्कृत हिंदी लोकांनीं दीर्घकालपर्यंत जोराची खटपट केली, आणि पाश्चिमात्य शिक्षणाचा प्रसार टाळतां येणें अशक्य असून सरकारनें कितीहि विरोध केला तरी तो प्रसार

होणारच हें समजून चुकलें, तेव्हांच कुठें ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टरांनीं हिंदुस्थानांत इंग्रजी शिक्षणास प्रोत्साहन यावयाचें ठरविलें, आणि त्याकरितां लहानशी रक्कम मंजूर केली. असें ठरवितांना त्यांना मुख्यतः जो युक्तिवाद पटला तो हा कीं, पाश्चात्य शिक्षण दिल्यानें हिंदुस्थानांत ब्रिटिश मालाचा खप अतिशय मोठ्या प्रमाणांत होत जाईल।

शिक्षण हें एक सरकारचें काम म्हणून मान्य केल्यानंतरहि, सरकारी वसुलांतून तत्प्रीत्यर्थ अगदीं थोडासाच पैसा खर्च करण्यांत येई. याचा परिणाम शिक्षणाभिवृद्धि अतिशय मंदगतीनें होण्यांत व्हावयाचा, तो झालाच. हिंदुस्थानांत ब्रिटिश सत्तेची चांगली स्थिरस्थावर झाल्यानंतर आज एका शतकावर काल होऊन गेला, तरी साक्षरतेचें प्रमाण अगदीं अल्प म्हणजे शेंकडा ८·२ एवढेंच आहे. ही साक्षरता म्हणजे मातृभाषेंत पत्र लिहून उत्तर वाचण्यापुरतीच आहे. हिंदु लोकांत १२ मध्यें असला साक्षर १ मिळतो; पुरुषांत ८ त एक आणि स्त्रियांत ६३ त एक. मुसलमानांमध्यें पुरुषांत ११ त एक, आणि स्त्रियांत ११६ त एक. शिक्षणावर होणारा खर्च मध्यवर्ती आणि प्रांतिक सरकारच्या मिळून वसुलाचा शेंकडा ५, किंवा एकटीं प्रांतिक सरकारें घेतलीं तर त्यांच्या वसुलाचा शेंकडा सुमारें ९ इतका आहे. इतर देशांशीं तुलना करतां, हिंदुस्थानांत दर माणशीं ( सर्व बाजूंनीं मिळणाऱ्या ) शिक्षणाप्रीत्यर्थ खर्च फारच कमी आहे, हें पुढें दिलेल्या कोष्टकावरून उघड होईल:—

| साल | दर माणशीं खर्च रुपये |
|---|---|
| ब्रिटिश हिंदुस्थान १९२२–२३ | ०·७७ |
| युनायटेड् किंग्डम् १९१८–१९ | १७·३ ( १५ रु. पौंड प्रमाणें ). |
| युनायटेड् स्टेट्स् ( अमेरिका ) १९१९–२० | ३७·० ( ३ रु. डॉलर प्रमाणें ). |

शिक्षणप्रसारासाठीं एखादा कार्यक्रम आंखावा अशी बुद्धि सरकारास मूळपासूनच कधीं झाली नाहीं. उलट कै. गोपाळ कृष्ण गोखले यांनीं मात्र शिक्षणप्रसार होऊन देशांत साक्षरतेचें प्रमाण वाढावें म्हणून कांहीं ठिकाणीं अल्प प्रमाणांत सक्ती केली जावी, असें एक प्राथमिक शिक्षणाचें बिल १९११ सालीं वरिष्ठ काउन्सिलांत आणलें होतें, आणि त्याला पाठिंबा मिळविण्याकरितां प्रत्यक्ष चळवळहि केली होती. परंतु सरकारनें त्या बिलास विरोध केला, आणि काउन्सिलांत त्या वेळीं लोकप्रतिनिधित्वाचा अंश फारच कमी असल्यामुळें तें बिल पास होऊं शकलें नाहीं.

मॉंट्फर्ड सुधारणा अमलांत येऊन शिक्षणखातें हिंदी प्रधानांकडे सोंपविल्यानंतरच काय तें सक्तीच्या दिशेनें खरें पाऊल पुढें पडत चाललें आहे. कांहीं प्रांतांत, आणि विशेष लक्षांत येण्यासारख्या म्हणजे मुंबई प्रांतांत, सक्तीच्या शिक्षणाचे कायदे पास झाले आहेत. तरी देखील, सोंपीव खात्यांत पैशाची उपासमार होत असल्यामुळें, शिक्षणाला जरूर तो पैसा मिळत नाहीं.

तात्पर्य एवढेंच कीं, शिक्षणाच्या बाबींत सुद्धां—कीं जिच्याबद्दल सरकारला मोठें श्रेय दिलें जातें—मूळ कल्पना, पुढची योजना, आणि संचालनशक्ति, हीं सर्व सुसंस्कृत हिंदी गृहस्थांकडून आलेली आहेत, नुसतेंच जर ब्रिटिश सरकारावर सोंपविलें असतें तर त्याच्या हातून कांहींच होतें ना, आणि अशी ही सरकारची प्रवृत्ति आहे म्हणूनच शिक्षणाभिवृद्धि इतकी निराशाजनक मंदगतीनें चाललेली आहे

आतां शेतकी घ्या. शेतकीकडे कांहीं लक्ष देणें जरूर आहे या गोष्टीची सरकारास मुळांत वार्ताच नव्हती ! सरकारास फक्त एवढेंच ठाऊक होतें कीं, जमिनीवर वसूल आकारावा, तो शक्य तितका वाढवावा, आणि गरीब बिचारी रयत त्या ओझ्याखालीं मेली तरी तिजपासून तो वाटेल तें करून उकळावा ! हिंदुस्थानच्या लोकांत केवढें भयंकर दारिद्र्य पसरलें आहे इकडे हिंदुस्थान सरकारचें आणि इंग्रज लोकांचें लक्ष वळवून शेतकी आणि उद्योगधंदे यांची अभिवृद्धि करावयास सुचविणारे पहिले गृहस्थ दादाभाई नौरोजी होत. डॉ. धुइलियम् हंटर यांनीहि एक व्याख्यानमाला देऊन शेतकीखातें निर्माण करावयाची सूचना केली होती. आणि त्यानंतर मग सुप्रसिद्ध शेतकी-शास्त्रज्ञ डॉ. व्हॉलकर् यांना हिंदुस्थानच्या शेतीची परिस्थिति तपासावयास हिंदुस्थानांत बोलविण्यांत आलें. इतक्या सर्व गोष्टी झाल्या तेव्हां कुठें नंतर लवकरच शेतकीखातें निर्माण करण्यांत आलें.

आतां सहकारितेचा प्रश्न घ्या. सहकारितेची चळवळ हिंदुस्थानांत सुरू करणें जरूर आहे, ही गोष्ट कै. न्यायमूर्ति रानडे आणि प. वा. सर विल्यम् वेडरबर्न यांनीं प्रथम सरकारच्या नजरेस जोरानें आणिली. परंतु सरकार वीस वर्षे स्तब्ध बसून राहिलें. मग कुठें १९०४ सालीं कै. गोखले वगैरे हिंदी गृहस्थांच्या सतत खटपटीनें सहकारिसंस्थांचा कायदा पास झाला. त्यांतहि पुनः सरकारचा एक हेतु असा होताच कीं, या कायद्यानें सहकारी संस्थांकडून कर्ज घेऊन रयतेला सरकार देणें द्यावयास मदत होईल ! कारण सरकारला असें आढळून आलें होतें कीं, हिंदुस्थानांत पुनः पुनः पडणाऱ्या दुष्काळांमुळें शेतकऱ्यांकडून सारा वसूल करणें

आपणास कठीण पडत जाऊन, शिलकी सान्यामुळें आपणास पैशाची ओढगस्त सोसावी लागते; पण सहकारी पतपेढ्या काढल्यानें, शेतकऱ्यास सरकारी सारा वेळेवर देतां येतो; मग त्याला जमिनींत पीक मिळालेलें असो नसो. कसेंहि का पैसे मिळेनात ते हाताशीं तयार मिळतांच शेतकरी ते कर्जाऊ घेतो! ही जी सरकारची सोय, तीच सहकारी पेढ्यांचा कायदा करावयास इतर कोणत्याहि गोष्टींहून विशेष आणि प्रत्यक्ष असी कारण झालेली आहे.

पाणपुरवठ्याचीहि तीच गत. हिंदुस्थानांतील नद्यांचें विपुल पाणी मोठमोठ्या विस्तीर्ण शेतांत नेऊन पुरविण्याकरितां पाट बंधारे, कालवे, इत्यादि बांधण्याची किती जरूरी आहे हें अनेक वेळां सरकारच्या कानावर घालण्यांत आलें होतें; पण सरकार कानावर घेईना. जेव्हां एकामागून एक असे तीन उध्वस्त करून टाकणारे दुष्काळ पडले तेव्हां कुठें सरकार कुंभकर्णी निद्रेंतून जागृत झालें. ह्या दुष्काळांनी कोट्यावधि लोक प्राणास मुकले. पण इतकें होईपर्यंत सरकारला कांहीं कधीं असल्या *प्रसंगांकरितां पूर्व तजवीज करून ठेवणें आपलें काम आहे असें वाटलें नाहीं.* इकडे रेलवे बांधण्याकरितां मात्र लाखों रुपयांचा धुराडा चालला होता, कारण त्यामुळें ब्रिटिश माल हिंदुस्थानांत खपावयास मदत होणार होती; पण पाणपुरवठ्याच्या व्यवस्थेची दादहि नव्हती! अगदीं अलीकडे १९०७ सालीं कै. गोखले यांनीं वरिष्ठ कायदेमंडळांत तक्रार केली होती कीं, पाणपुरवठ्याच्या सोयीनें लोकांचें प्रत्यक्ष कल्याण होणारें असतां तीं न करितां सरकार आपलें रेलवे बांधीत सुटलें आहे! अशाच रीतीनें आणखी सतत लोकमताचा दाब बसत चालल्यामुळें मग सरकारनें पाणपुरवठ्याचीं मोठमोठीं कामें उचललीं.

आतां दळणवळणाचा प्रश्न घ्या. रेलवे बांधण्याचे मुख्य हेतु लहानापासून थोरापर्यंत सर्वांना ठाऊक आहेत. पहिला हेतु लढाई डावपेंचांचा, आणि दुसरा व्यापारी. व्यापारी हेतु म्हणजे ब्रिटिश माल देशांतील कानाकोपऱ्यांतल्या लोकांपुढें नेऊन ठेवण्याचा. या रेलवेनीं हिंदुस्थानच्या उन्नतिविषयक अशा कांहीं चांगल्या गोष्टी केल्या आहेत खऱ्या, पण सरकारचा मूळ हेतु कांहीं तो नव्हता!

औषधपाण्याची सोय आणि सार्वजनिक आरोग्य, यासंबंधांतहि मुख्य नेट हिंदी लोकांचाच. असल्या, राजकारणाचा गंधहि नसलेल्या, बाबतींत देखील ब्रिटिश सरकारची प्रगति मुंगीच्या पावलानें चालली होती. खेड्यापाड्यांतून एकसारखी मागणी कीं, औषध उपायाची सोय करा, सार्वजनिक आरोग्याप्रीत्यर्थ आणखी पैसे काढा, पण सरकार आणि (मिस् मेयोचा देवदूत) ब्रिटिश अधि-

कारी लक्ष देतात कशाला ! या बाबतींवर हिंदुस्थानांत खर्च होणाऱ्या पैशाची चिमूट इतर सुधारलेल्या देशांच्या पैशासमोर दिसून सुद्धां येत नाहीं ! ही गोष्ट अजीबाद डोळ्यांआड करून मिस् मेयो उलट त्या खेड्यांत राहणाऱ्या लोकांसच शिव्या देत सुटली आहे ! ते विचारे काय बोलणार ? तुमच्याकडून अवश्य मिळावयाची ती मदत तुम्ही त्यांना देत नाहीं, म्हणून तर ते अडाणी राहातात; आणि असे ते तुमच्याच उपेक्षेमुळें अडाणी राहिले असतां, उलट तुम्हीच त्यांना अडाणी म्हणून हिणवितां !! असो. यासंबंधानें पुढें एका प्रकरणांत आम्ही विशेष विचार करणार आहों.

नुसते आंकडे जमा करून व्यवस्थित मांडण्यांत देखील सरकारी काम इतकें मंद गतीनें चाले कीं, तें चालू घटकेपर्यंत येऊं शकतच नसे. त्यांत कोणत्या दिशेनें सुधारणा करणें जरूर आहे, हें डॉ. दादाभाई नौरोजी यांनीं दाखवून दिलें, आणि त्यासंबंधानें सतत सर दिनशा वाच्छा—हे सुदैवानें आज हयात आहेत—या नामांकित हिंदी अर्थशास्त्रज्ञांनीं टीका चालू ठेविली, त्यानंतर मग सरकारनें या आंकडेमांडीसंबंधांत सुधारणा करून तिचें क्षेत्र वाढविलें.

इतक्या या सर्व गोष्टी शेवटीं आपणास काय सांगतात ? अगदीं निःपक्षपात-पणें प्रत्येकानें आपलें मत ठरवावें; कारण प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टी इतक्या स्पष्ट असतां, आमचाच निष्कर्ष घ्या असा आग्रह करण्याची जरूरच राहत नाहीं.

ब्रिटिश अंमलामुळें हिंदुस्थानचे कितीहि तोटे झालेले असोत, परंतु कित्येक फायदेहि झाले आहेत यांत संशय नाहीं. यांतील कांहीं, सरकारनें मुद्दाम लोकहित डोळ्यांपुढें ठेवून घडवून आणले आहेत असें नसून, सरकारनें स्वतःच्या फायद्या-साठीं जो मार्ग पतकरिला होता त्या मार्गांत आगंतुकपणें उपस्थित झालेले आहेत. शिक्षण, सामाजिक सुधारणा, इत्यादि प्रत्यक्ष लोकहितासाठींच म्हणून ज्या गोष्टी सरकारनें केल्या, त्यांतहि मूळ कल्पना आणि संचालनशक्ति हिंदी लोकांचीच, आणि त्यांनीं पुढें सतत चळवळ चालू ठेविली म्हणूनच शेवटीं यश आलें.

यावरून स्पष्ट आहे कीं, आजच्या स्वरूपांतल्या हिंदुस्थानच्या राज्यकारभा-ऱ्यांना त्यांचें त्यांनाच काय तें करूं दे म्हणून मोकळें सोडून दिलें तर त्यांच्या डोक्यांत हिंदी जनतेच्या कल्याणाची कोणतीहि योजना येणें स्वभावतःच अशक्य आहे. बरें, हिंदी लोकांनीं त्यांना आपल्या बाजूस वळवून घेऊन आपणास इष्ट त्या दिशेनें काम करावयास लावावें म्हटलें तर तो फार त्रासाची आणि मोठी

अवजड गोष्ट असून तिनें लाभहि अत्यल्प, आणि तेवढाही तो मिळावयास पुनः दीर्घ विलंब लागावयाचा. अर्थात् त्वरित सुधारणा व्हावयास खुद्द हिंदी लोकांच्याच हातीं स्वतःची भवितव्यता आंखावयाची ज्यास्त सत्ता दिली पाहिजे, दुसरा उपाय नाहीं.

---

### प्रकरण १० वें.

## मेयो 'मिस्' राहिल्याचा हा परिणाम !!

येथवर मिस मेयोच्या पुस्तकाचा राजकीय भाग विचारांत घेतल्यावर आतां आपण सामाजिक भागाकडे वळूं. राजकीय बाजूकडे पुस्तकाच्या शेवटीं शेवटीं पुनः एकदां आम्ही वळणार आहों. पण ह्या व पुढील प्रकरणांत मुख्यतः सामाजिक प्रश्नच घेतले आहेत.

आपल्या समाजाहून सर्वस्वी निराळा असा जो समाज असतो, त्याच्या चालीरीति योग्य त्या प्रमाणबद्धतेनें बरोबर लक्षांत येणें सोपी गोष्ट नव्हे. एखादा हिंदी गृहस्थ इंग्लंडांत किंवा अमेरिकेंत कांहीं महिने जाऊन राहिला, आणि तो कितीहि चौकस असला, तरी तेवढयानें त्यास तेथील लोकांच्या चालीरीतींची खरीखुरी कल्पना आली असें होईल काय ? त्याला नवीन असणाऱ्या गोष्टींकडे त्याचें लक्ष जाईल हें खास. राजरोस चालणाऱ्या प्रणयक्रीडा आणि चुंबनविधि त्याच्या चोहोंकडे नजरेस पडतील. या केवळ वरवरच्या गोष्टींवरून जर त्यानें इंग्रजांना किंवा अमेरिकन लोकांना नीतिदृष्टया फारसा भूषणावह नसलेला असा निष्कर्ष काढला, म्हणजे उदाहरणार्थ, जर त्यानें म्हटलें कीं तिकडील मुली सगळ्या छिचोर असतात, किंवा त्या सरसकट सगळ्या पुरुषांशीं संबंध ठेवितात, तर तो निष्कर्ष बरोबर म्हणावयाचा काय ? वास्तविक तेथल्या समाजाचें जर खरेंखुरें स्वरूप त्याला समजावयास पाहिजे असेल, तेथील स्त्रीपुरुष, मुलगे व मुली, कुमारी आणि विधवा, यांच्या बाह्य वर्तनाच्या मागें कोणता प्रवर्तक हेतु असतो हें ओळखावयाचें असेल, एकंदर समाज कोणत्या तत्वावर उभारला आहे हें जाणून घ्यावयाचें असेल, तर त्यानें त्या समाजांत कमींत कमी तीन वर्षे बारकी नजर देऊन राहिलें पाहिजे, आणि नुसतें राहूनच नव्हे तर त्यास तेथील कुटुंबांतील जिव्हाळ्याच्या मंडळींचें परस्परांशीं चालत असलेलें वर्तन अगदीं निकट संबंध येईल अशा तऱ्हेनें पहावयाची जवळ जवळ दररोज संधि मिळाली पाहिजे.

राजकीय परिस्थिति बाहेरून ओळखतां येते, आणि तिजबद्दल बाहेरून साधारणपणें योग्य असें मत बनवितां येतें. परंतु सामाजिक परिस्थिति, सामाजिक हेतु, सामाजिक चालीरीति, ह्या समजण्याकरितां समाजाचा जो मूळ घटक म्हणजे कुटुंब त्याच्यांत अगदीं खोल जाऊन माहिती घेतली पाहिजे, आणि असें कैक वर्षें सतत पाहतां पाहतां मग कुठें साधारणसें मत बनवितां येतें. नाहीं तर परीक्षा चुकीची ठरल्याशिवाय राहणार नाहीं, आणि त्यांतहि पुनः जर मन पूर्वग्रहांनीं दूषित झालेलें असेल तर नजरेंतहि ते पूर्वग्रह उतरल्याशिवाय राहणार नाहींत.

मिस मेयोचा ह्याच प्रकार झाला आहे. ती आली तो हिंदुस्थानास खालीं पाडावयाचा निश्चय करून आली. तिनें प्रत्येक गोष्ट पूर्वग्रहदूषित दृष्टीनें पाहिली, आणि आपला सिद्धान्त मांडला; तो वास्तविक सर्वथैव चुकीचा; पण तिनें तो हिंदुस्थानचें हुबेहूब दर्शन म्हणून जगापुढें ठेवला ! विचारीला एवढें मात्र स्मरण राहिलें नाहीं कीं, एखादा हिंदी किंवा जपानी किंवा चिनी इसम तिच्या अमेरिकन लोकांसंबंधानें तोच पराक्रम गाजवून त्यांचें जगांत सहज हंसें करूं शकेल ! असो. आतां वर सांगितल्याप्रमाणें सामाजिक प्रश्नांचा विचार करावयास लागूं.

मिस मेयोचें मन सारखें स्त्रीपुरुषभेदाच्या प्रश्नासभोंवतीं फिरत्या चालीत राहिलेलें दिसतें. ती ४९ वर्षांची वृद्ध कुमारिका असून तिचें मन या स्त्रीपुरुषभेदाचें गूढ उकलण्याच्या खटपटींत अगदीं रंगलेलें दिसतें. तिचें लग्न झालें असतें म्हणजे हें गूढ उकलणें तिला फार सोपें पडलें असतें. पण ती स्वतः पडली कुमारिका—तेव्हां आतां तें गुह्य तिला कायमचेंच ! उलट त्याजबद्दल विचार करीत बसल्यानें तिचें मन या स्त्रीपुरुषकल्पनेनें इतकें भारून गेलें आहे कीं, तिला आतां दुसरें कांहीं सुचतच नाहीं ! कांहींहि तिच्या नजरेस पडो, हा स्त्रीपुरुषभेद तिच्या मनांत आलाच ! थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे तिला 'लिंगावर्त' झाला आहे, तिला ' लिंग–वेड ' लागलेलें आहे !

हें लिंग-गूढ तो अविवाहित राहीपर्यंत तिला गूढच राहणार. लग्न झालें कीं लगेच तिचे विचार बदलून जातील. ती मुलगी म्हणून सुधारेल आणि स्त्री म्हणूनहि सुधारेल. तिच्या विचारांना नवचैतन्य प्राप्त होईल. तिच्या मनाला हलकें वाटेल. तिच्या स्त्रीपुरुषविषयक विचारांना आणि कल्पनांना योग्य दिशेनें वाव मिळेल. आज त्या तिच्या कल्पना मनांतल्या मनांत वाढत कुजत राहिल्या आहेत, क्षणो-

क्षणीं तिला पीडित आहेत, तिचें लेखन चिताडीत आहेत, आणि तिचे निष्कर्ष दूषवीत आहेत. असें हें नसतें संन्यासमत घेऊन ती आपल्या जीवाचा असा कां तळतळाट करून घेत आहे कोण जाणे !

मधाची गोडी नुसतें वर्णन वाचून कशी कळणार? भाराभर वर्णनपर पुस्तकें वाचून जें कार्य होणार नाहीं, तें मधाचा एक बिंदु प्रत्यक्ष चाखल्यानें होतें. त्याचप्रमाणें बाहेर बसून नुसतीं पुस्तकें वाचून कल्पना-तरंग चालवीत राहिल्यानें मिस मेयोला स्त्रीपुरुषसंबंधरहस्य काय कळणार ? नुसता डोक्याला आणि मनाला शीण ! पण ती प्रत्यक्ष अनुभवांत पडूं दे कीं ती तावडतोड शुद्धीवर आलेल्या माणसासारखी बोलूं लागेल ! प्रसिद्ध आद्य शंकराचार्य ह्यांच्या तोडीचा हिंदुस्थानांत किंवा सबंध जगांत दुसरा तत्वज्ञानी झाला नाहीं. पण त्यांना देखील या प्रत्यक्ष अनुभवाची जरूर भासली, आणि तीहि याच विषयांत, अशी एक गोष्ट आहे. आचार्यांनीं अखिल भरतखंडावर दिग्विजय करून स्वमताची प्रतिष्ठापना केली, परंतु आचार्य बालब्रह्मचारी असल्यामुळें त्यांना एकानें स्त्रीपुरुषसंबंधविषयक प्रश्न टाकला, त्याचें कांहीं उत्तर देतां येईना ! तावडतोब ते शिष्यांसहवर्तमान एका गुहेंत गेले, आणि तेथें त्यांनीं देह सोडला. देह सोडण्यापूर्वी मात्र त्यांनीं शिष्यांना सांगून ठेवलें होतें कीं, देहाचें नीट रक्षण करा. आचार्यांचा देह सोडून निघालेला तो आत्मा एका नुकत्याच मृत्यु पावलेल्या राजपुत्राच्या शरीरांत शिरला आणि राजपुत्र जिवंत होऊन पुनः पूर्ववत् संसारांत भार्येसह सुखोपभोग भोगूं लागला. असा हा प्रत्यक्ष अनुभव आचार्यांच्या आत्म्याला मिळाल्यानंतर त्यानें वेळ भरतांच राजपुत्राचें शरीर सोडून देऊन पुनः गुहेंत येऊन आपल्या देहांत प्रवेश केला, आणि त्यानंतर आचार्य स्त्रीपुरुषविषयक सुद्धां सर्व प्रकारच्या प्रश्नांवर कोणाहि प्रतिस्पर्ध्यास चीत करावयास सिद्ध झाले.

असा हा प्रत्यक्ष अनुभव मिस् मेयोला पाहिजे आहे; मग ती आतांच्यासारखें उगाच कांहीं तरी वेडेंवाकडें बोलत राहणार नाहीं. देवळांतल्या भिंतीवर आणि देवाच्या रथावर काढलेल्या चित्रांत आणि खोदकामांत तिला येथून तेथून एकजात स्त्रीपुरुषसंबंध दिसतो; देवताविषयक चिन्हांत तिला लिंगापलीकडे अर्थ दिसत नाहीं; इमारतीचें शिल्पकाम तिला लिंगाकृतीबरहुकूम बनविलेलें वाटतें; बागबगीचे, विहिरी, कालवे, नद्यांचीं वळणें, हीं सर्व लिंगभेदाच्या कल्पनेवर आंखलेली दिसतात; म्हणजे अशी एकहि वस्तु शिल्लक रहात नाहीं कीं, जी पाहून तिच्या मनांत लिंगविषय उभा राहात नाहीं. हिंदुस्थानचा आकारहि ईश्वरानें लिंगाकार बनविलेला

आहे एवढेंच मिस् मेयो सांगावयास कसें विसरली कोण जाणे !! त्यांतहि पुनः तिचें नशीब पहा केवढें बलवत्तर ! जो जो तिला भेटतो—किंवा ज्याला ज्याला म्हणून ती भेटते—तो तो इसम, ही परकी आहे—बाई आहे—वगैरे कांहीं न पाहतां अगदीं बेलाशक तिजपुढें मन मोकळें करून या स्त्रीपुरुषविषयावर अगदीं स्वतःचा अनुभव सांगून बोलत बसतो ! मिस् मेयो दिसली रे दिसली कीं, या विषयावर माणसाचें मन विरघळलेंच ! काय करणार विचारा ! विशाद काय आतां एखादा डॉक्टर सांगेल कीं आपले रोगी ह्या विषयावर खरें उघड कांहीं सांगत नाहींत म्हणून ! मिस् मेयोला आपलें गुपित कोणीं कोणी सांगितलें म्हणाल तर बॅरिस्टर, डॉक्टर, असल्या बऱ्या बऱ्या लोकांनीं ! तिनें नुसतें सुचवावयाची खोटी, कीं त्यांनीं तें इत्थंभूत सगळें खरें म्हणून लगेच कबुली दिलीच ! "मुंबईच्या एका अतिनिष्णात ब्राह्मण डॉक्टरांनीं तिजजवळ कबूल केलें कीं, आपला हिंदु मानव-वंश निर्विवाद खालावत चाललेला असून त्याला कारण हेंच कीं, या एका विषयांत त्याची सर्व जीवनशक्ति खलास होऊन जाते." मुंबईचे हे डॉक्टर 'अतिनिष्णात' असल्यामुळें, ते सहज मुंबईत सांपडावयाचे ! पण अशा वीस एक हिंदी डॉक्टरांना 'मिस् मेयोजवळ असें तुम्ही बोललां होतां काय' म्हणून विचारतां एकालाहि त्याबद्दल गंधवार्तादेखील नाहीं ! मिस् मेयोनें त्या डॉक्टराचें नांव दिलेलें नाहीं; तेव्हां कोणी सांगावें हें खरें आहे कीं बनावट आहे म्हणून ! आम्हांला तर वाटतें हें निव्वळ बनावट आहे ! कारण असलें बनावट रचण्यांत तिचा कोणीहि हात धरूं शकणार नाहीं हें तिच्या सगळ्या पुस्तकभर दिसून येतें.

याच्या पुढचा भाग तर त्याहूनहि विलक्षण आहे. हिंदु साधुसंत, ऋषि, महात्मे, ज्यांचें जीवित अष्टौप्रहर ईश्वरी चिंतनांत, आणि ज्यांचें बोलणें चालणें सर्व कांहीं ईश्वरप्राप्तीसाठीं, ते सुद्धां मिस् मेयोबरोबर स्त्रीपुरुषभेदासंबंधानें चर्चा करूं लागले; चर्चाच नव्हे तर त्यांनीं स्वतःचा प्रत्यक्ष वैषयिक अनुभवहि तिला अगदीं आपलेपणानें सांगितला ! एका हजारों शिष्यसंप्रदाय असलेल्या 'योगिराजांनीं' तर तिला सांगितलें कीं, "यांत कांहीं पापपुण्याचा प्रश्न नाहीं: ही सर्व निव्वळ माया आहे. झालें काय न झालें काय दोन्ही बरोबरच !" अशा स्थितींत आतां कोण मिस् मेयोला म्हणेल कीं तिजपाशीं दुसऱ्याकडून स्वतःचें इद्गत स्वतःच्या मुखानें वदविण्याची हातोटी नाहीं ?—त्यांतल्या त्यांत पुनः स्वतःच गोष्टी रचून त्या दुसऱ्यानें स्वमुखानें खऱ्या म्हणून सांगितल्याचें भासविण्याची तिजजवळ अजब शैली असतांना !

पण एका गोष्टींत तर तिचे आम्ही महदुपकार समजतों. परलोक विद्या जाणणारे लोक करतात त्याप्रमाणें तिनें, हिंदुस्थानच्या तोंडास काळिमा आणणारें मिळेल तें घशांत घालवयास आ पसरून बसलेल्या पाश्चात्य लोकांपुढें वास्तविक स्वर्गस्थ हिंदी पुढाऱ्यांना आणून उभें करून त्यांजकडून हिंदी सामाजिक प्रश्नांवरील मतें वदवून असें कबूल करून घेतलें नाहीं कीं, आपण जिवंत असतांना आपल्या खासगी आणि सार्वजनिक आयुष्यांत, नव्हे राष्ट्राच्या जीवितांतहि, प्रगतीला जर कांहीं भयंकर अडथळा म्हणून आपणास झाला असेल तर तो एकच—कामोपभोग आणि तज्जन्य क्षीणता !

मिस् मेयोचा दुसरा उपकार म्हणजे तिनें आपण लिहिलेल्या गोष्टी आपणास प्रत्यक्ष ईश्वरानें येऊन सांगितल्या असें म्हटलें नाहीं हा ! पण कदाचित् तिला असें वाटलें असावें कीं, पाश्चिमात्य लोकांना भुरळ पाडून हिंदुस्थानच्या तोंडास काळिमा लावण्याचा पराक्रम पृथ्वीवरच राहून सहज करतां येण्याजोगा असतां उगाच बिचाऱ्या ईश्वराला आणखी कशाला ओढून आणा ! अथवा ईश्वर न येतां सैतानानें तिच्या मनांत नसेल ना प्रवेश केला आणि तिला हें अत्यंत पाजीपणाचें 'मदर इंडिया' पुस्तक लिहावयास लाविलें !!

## प्रकरण ११ वें.

# सत्याला रामराम ठोकून !!



राजकारणी पुरुष सार्वजनिक अगर खासगी हेतूसिद्ध्यर्थ चळवळ करीत असतांना सत्याला कशी रजा देत असतात, हें राष्ट्राचे इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. बाल्डविन यांनी एकदां १९२५ सालीं नोव्हेंबरांत एडिंबरो विश्वविद्यालयाच्या विद्यार्थ्यांपुढें 'सत्यवादित्व आणि राजकारण' या विषयावर बोलत असतांना सांगितलें. बाल्डविनसाहेबांचें हें बोलणें वाटेल निराशादर्शक स्वरूपाचें होतें खरें; तरी पण अर्धवट खोट्या रंगाच्या आणि भयंकर खोट्याच्या प्रकाराचा त्यांनी स्पष्ट निषेध केला.

राजकारणी लोकांत एकानें दुसऱ्याला विरोध करण्याकरितां सत्याला रामराम ठोकला तर एक वेळ कबूल. पण मिस् मेयो तर यापुढें होऊनहि निघाली आहे कीं,

आपण कोणी "चळवळी बाई नव्हे, केवळ सत्यशोधनार्थ आपण हें काम हातीं घेतलें आहे, आणि आपण हिंदुस्थानाबद्दल लिहिलें तें आज तेथें घडत असलेलें तेवढेंच लिहिलें आहे. अर्थात् असल्या या निःस्वार्थीपणाच्या पांघरुणाखालीं जेव्हां ती, येथवर विस्तरशः दाखविल्याप्रमाणें, सत्याला लांबलचक रजा देण्यांत दुष्टपणानें आनंद मानते, तेव्हां हा तिचा गुन्हा अक्षम्य नव्हे काय ?

पण एवढयावरच तिचें पाप थांबलें असें नव्हे, तर त्या पापावर आणखी काळाकुट्ट लेप चढला आहे. कारण तिनें त्याहून आणखी नीचपणा करून प्रत्येक हिंदी गोष्टीला केवळ ती हिंदी एवढयाचसाठीं शिव्या हांसडल्या आहेत. हिंदुस्थानांतील कोणतीहि गोष्ट तिला नजरेसमोर सुद्धां धरावीशी वाटत नाहीं—अर्थातच ब्रिटिश अधिकारी एवढाच एक अपवाद सोडून ! ज्याप्रमाणें एका बालकाचें मरण खात्रीपूर्वक घडून यावें म्हणून सगळ्याच " निरपराध बालकांची कत्तल " करण्याची योजना करावी, त्याप्रमाणें हिंदुस्थानाला कायमची अधोगति दाखविण्याच्या एका हृदयस्थ हेतूसाठीं ती सगळ्याच गोष्टींचा नाश करून त्यांना भलतें वेडेंविद्रें स्वरूप द्यावयास उद्युक्त झाली आहे. " सत्याला रजा " देण्याचा दुष्ट निश्चयच करून, ती आपल्या गटार मेंदूच्या कारखान्यांतून जाणून बुजून नासकलबाड्या तयार करावयास निघाली आहे, आणि त्या कोणाबद्दल ?—तर जगाच्या सुधारणेंत निःसंशय भर घालणारा म्हणून ज्याच्याबद्दल मिस मेयोला खचित आदर वाटावा, त्या एका आपल्यासारख्याच मानववंशाबद्दल ! या खंडोगणती तयार झालेल्या कांहीं लबाड्यांच्या गठ्ठ्यांचें प्रस्तुत प्रकरणांत वर्णन देण्याचें आम्हीं योजिलें आहे. पहिला गठ्ठा आपण लहान मुलांना सृष्टिक्रमविरोधी आचार शिकविण्याबद्दलचा घेऊं. ती म्हणतेः—

" वास्तविक बरें वाईट पाहण्याची आमची दृष्टि आणि त्यांची दृष्टि यांच्यांत इतका फरक आहे कीं, तिकडील आया मग त्या वरच्या किंवा खालच्या कोणत्याहि जातीच्या असोत, आपल्या बाळांवर—मुली असेल तर तिला चांगली झोंप यावी म्हणून, आणि मुलगा असेल तर त्याच्यांत विशेष पौरुष यावें म्हणून—विपरीत प्रयोग करीत असतात, तो प्रयोग निदान मुलाला तरी जन्मभर चालू ठेवावासा वाटतो."

या विधानाला तिनें कसलाहि—म्हणजे बनावटसुद्धां—आधार दिलेला नसतां, उलट आम्हांलाच ती तें विधान खोडावयास आव्हान टाकीत आहे ! ती म्हणते कीं, "तुम्हांला फार तर तें नुसतें नाकबूल करतां येईल, पण यत्किंचितहि हालवूं

म्हणाल तर तें मात्र शक्य नाहीं." 'अशा तऱ्हेनें ती हें हिंदी माता आणि मुलें यांजबद्दलचें निव्वळ खोटें, नालस्तीचें, अति नीचपणाचें विधान स्वतःच्या सैतानी मेंदूंतून काढून खरें म्हणून दडपून देऊन पुढें चालली आहे ! आणि पुस्तकालाहि पुनः तिनें "हिंद माता" असें नांव दिलें आहे !

या भयंकर पाजीपणाच्या विधानाबद्दल के. लॉर्ड सिंह यांनीं विलायतेहून मुंबईस ते उतरले त्या दिवशीं म्हणजे ३० डिसेंबर १९२७ रोजीं काढलेले उद्गार मागें प्रस्तावनेंत दिलेच आहेत, त्यांतील कांहीं भाग पुनः येथें देतों:—"या विधानाइतकें बेशरमपणाचें निखालस खोटें असें दुसरें कोणतें विधान असेलशी कल्पनाच होत नाहीं ! त्याबद्दल मी पंचवीस पंचवीस वर्षें हिंदी मेडिकल सर्व्हिसमध्यें काम केलेल्या पांच सहा डॉक्टरांना विचारलें कीं ही गोष्ट तुम्हांला खरी वाटते काय ? त्यावर त्यांनीं मला खात्री देऊन सांगितलें कीं, "तुमच्या कानावर जशी ती गोष्ट आजवर आलेली नाहीं तशी आमच्याहि नाहीं. आमची तर खात्रीच आहे कीं ती गोष्ट साफ खोटी म्हणून."

हिंदु कुटुंबांत इतकी शिस्त असते कीं, लहान मुलानें स्त्रीपुरुषभेदविषयक गोष्टींसंबंधानें एक चुकून जरी शब्द काढला तरी त्याजवर वडीलधारीं माणसें विशेषतः आई रागावते, आणि चांगली दरडावणी देऊन कधीं कधीं तर त्याला मारहि देते. यरच्यासारखे प्रकार कोणत्याहि अगदीं नैतिक अधोगतीस पोंचलेल्या देखील समाजांत असतील अशी हिंदु इसमास कल्पनाहि करवत नाहीं; उलट, या विषयांत तज्ज्ञ अशा कित्येक प्रसिद्ध ब्रिटिश डॉक्टरांनीं असल्या विषयावर तिकडे लिहिलेल्या पुस्तकांवरून दिसतें कीं, निदान इंग्लंडमध्यें तरी दाया आपल्या हातीं दिलेल्या मुलांमध्यें या विषयासंबंधानें जिज्ञासा उत्पन्न करण्याची खटपट करितात. या दाया खुद्द स्वतःवरहि प्रयोग करूं द्यावयास मागें पुढें पाहत नाहीत, असें कामविकाराची वाढ बाल्यापासून तारुण्यापर्यंत कसकशी होत जाते याबद्दल शोध करण्यात संबंध आयुष्य घालवून त्या विषयांत अधिकारी बनलेल्या एका ब्रिटिश गृहस्थानें खुद्द स्वतः तीन वर्षांचा असतांना अनुभवलेला प्रकार नमूद करून सांगितलें आहे.

हींच पुस्तकें मिस् मेयोनें वाचलीं, आणि आपल्या समाजांतलें तें पाप उगाच निव्वळ कल्पनाशक्ति चालवून हिंदु समाजावर ढकलून देण्याचा ती प्रयत्न करीत आहे ! हिंदु समाजाबद्दल ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं आणि इतरांनीं पाहिजे तितकें अगदीं वाईटांत वाईट लिहून ठेवलें आहे, पण त्यांच्या त्या लिहिण्यांत—इतकेंच

काय तर अबे 'डुबॅाय्च्या अतिशयोक्तिपूर्ण, अत्यंत पूर्वग्रहदूषित, आणि मुद्दाम वाईट स्वरूप देऊन लिहिलेल्या लेखनांत देखील—एकाहि ठिकाणीं अप्रत्यक्षपणें देखील असल्या या प्रकारांचा उल्लेख नाहीं ! हा मिस् मेयोला सबंध आयुष्यांत दुसरा लागणार नाहीं असला अजब शोध एकट्या तिच्यासाठीं ठेवला होता, तो तिनें जगभर पसरून जगाला ज्ञानी करून सोडावें म्हणून !

मिस मेयोनें असला हा प्रकाश हिंदु चालीरीतींवर पाडण्यापेक्षां, पाश्चात्य देशांतल्या आणि विशेषतः अमेरिकेंतल्या पोक्त कुमारी जे कांहीं ढंग चालवीत असल्याचें ऐकूं येतें त्यांवर विशेष प्रकाश पाडावयाचा होता ! या पोक्त कुमारी माकडें पाळून सुखोपभोग घेतात, असें ऐकण्यांत येतें. हा भोग-प्रकार अमेरिकेंत कितीशा प्रमाणांत चालू आहे हें आम्हांला ठाऊक नाहीं, पण मिस मेयोसारखी समाजसंशोधनाच्या शिक्षणाची आणि अनुभवाची जाहिरात फडकाविलेली आणि दुसऱ्या देशाहून स्वतःच्या देशाबद्दल उघडच अधिक अधिकारयुक्त वाणीनें बोलावयास पात्र असलेली बाई, या खुद्द तिच्या देशांत चाललेल्या प्रकाराबद्दल कांहीं तरी आम्हांला ज्ञानदान करील खास !

नालस्तीचा दुसरा गठ्ठा पहा. मिस मेयो म्हणते:—" देशाच्या उत्तर दक्षिण अनेक भागांत, एखादा लहान मुलगा दिसण्यांत सुंदर असल्यास, त्याच्या मनाची तशी पूर्व तयारी करून, मोठे वाढलेल्या पुरुषांकडे, त्यांची कामवासना तृप्त करण्याकरितां त्याची योजना केली जाते, किंवा तशा कामासाठीं त्याला देवळाकडे लावून दिलें जातें. आणि यांत कांहीं वाईट आहे असें आईला किंवा बापाला कोणालाच कांहीं वाटत नसून उलट लोकांस आपला मुलगा इतका चित्ताकर्षक वाटतो यांतच तीं अभिमान मानतात."

वास्तविक हा प्रकार कुठेंहि हिंदुस्थानांत ऐकिवांत नाहीं; जो प्रकार कांहीं ठिकाणीं आढळतो तो हलक्या जातींमध्यें, आणि मुलींसंबंधानें; मुलींना देवदासी म्हणून देवळांत घालतात. पण ही पद्धतसुद्धां ब्रिटिश सरकार अनुकूल असतें तर कधींच बद करतां आली असती. म्हैसूर संस्थानांत ती केव्हांच बंद करून टाकण्यांत आली आहे. परंतु " सुधारलेल्या " ब्रिटिश सरकारला अजून तिचें कांहीं वाटत नाहीं. तथापि विशेषतः हिंदी समाजसुधारकांच्या खटपटीनें अलीकडे ही पद्धत बरीच कमी झाली आहे. पण सांगावयाचा मुद्दा हा कीं, ही पद्धत मुलींबद्दल आहे मुलांबद्दल नव्हे.

दुसरें आणखी मिस् मेयोच्या म्हणण्याप्रमाणें असें कीं, "विषयोपभोगाचीं साधनें असलेला हिंदू तीस वर्षें झालीं कीं म्हातारा होतो; आणि असे पंचवीस ते तीस वर्षांचे दहा पुरुष घेतले तर त्यांतले सात आठ पार नपुंसक बनलेले असतात." काय कल्पना आहे पण !! हा नपुंसकत्वाचा अनुभव मिस मेयोला मिळाला तरी कुठें ! तिच्यापुढें असलें गुपित फोडणारे हे कोण ? त्यांची लायकी काय ? ते पुरुष आहेत का बायका ? पुस्तकांत एका ठिकाणीं मिस् मेयोनें, पोक्त वयाचे पुरुष त्या वयांत सुद्धां कामी असतात आणि बायको मेल्यावर नवीन लग्न तरुण मुलींशीं करूं इच्छितात अशी अगदीं विखट भाषेंत टीका केली आहे. पन्नास साठ वर्षें वयाच्या पुरुषांमध्यें जर असली कामेच्छा, तर ते नपुंसक असतात हें कसें काय ? यावरून मिस् मेयो पहिल्यानें एक विधान करून जाते, आणि त्याच्याशीं अजीबाद विसंगत असें पुढें लगेच दुसरें विधान करते असें होत नाहीं काय ? वस्तुतः हिंदू हे नेहमींचेच आणि आजही विशेष प्रजोत्पादक—कित्येक पाश्चात्य लोकांहूनहि अधिक प्रजोत्पादक—असे लोक आहेत. अर्थात् तिशीच्या आंत शेंकडा ७५ पुरुष नपुंसक बनतात, या धडधडीत खोट्या विधानाला आतां कसली उपमा द्यावी ?

हर्बर्ट स्पेन्सर आपल्या "शिक्षण" या निबंधांत सांगतात कीं, इतर प्राण्यांप्रमाणें माणसांतहि अवश्यमेव दोन प्रकारच्या उपजतबुद्धि स्वभावघटक म्हणून वावरत असतात. एक स्व-संरक्षणबुद्धि, आणि दुसरी वंश-संरक्षणबुद्धि. मानवजातीचे जे निरनिराळे वंश आहेत त्यांत हिंदु लोक स्वसंरक्षणांत कमी असतील, पण वंश कायम राखण्यासंबंधांत त्यांच्या धर्मशास्त्रानेंच धर्मकल्पना अंतर्भूत करून ठेविल्या असल्यामुळें, स्वातंत्र्य नष्ट झालें किंवा पुढच्या पुढच्या काळांत त्यांना स्वसंरक्षण करतां न आलें तरीदेखील, गेल्या तीन हजारांहून ज्यास्त वर्षेंपर्यंत हिंदु लोक जसे टिकून राहिले आहेत तसे पृथ्वीच्या पाठीवरील दुसरे कोणतेहि लोक टिकून राहिलेले नाहींत.

मिस मेयोच्या म्हणण्याप्रमाणें, सर्व साधनें अनुकूल असलेला मनुष्य नपुंसक होण्याचा जास्त संभव असतो. हें जर खरें, तर तारुण्य उलटून गेलेले आमचे राजे महाराजे, संस्थानिक, आणि इतर श्रीमंत मनुष्य, ऊठवसल्या इंग्लंडांत जाऊन जे महिनेच्या महिने इंग्रज लावण्यलतिकांबरोबर मजा मारीत राहतात ते कसे ?

यापुढील मिस मेयोचा मुद्दा देवदेवतांचीं प्रतीकें आणि धार्मिक चिन्हें यांचा आहे. हीं प्रतीकें आणि चिन्हें मूळांत कशीं तयार झालीं हें अद्याप मोठें

गूढच आहे. त्यासंबंधानें कांहीं तरी एकवाक्यता करण्याचा मोठमोठ्या विद्वानांनीं आजवर बराच प्रयत्न केला, पण व्यर्थ; त्यासंबंधानें निरनिराळ्या अनेक उपपत्ति, कांहीं विलक्षण काल्पनिक, कांहीं संभवनीय दिसतील अशा, सुचविण्यापलीकडे कोणीहि अद्यापि कांहीं निश्चित म्हणण्यासारखें सांगितलेलें नाहीं. पण मिस मेयो ही त्या सगळ्या मोठमोठ्या पंडितांहून पंडित आणि तत्वज्ञांहून तत्वज्ञ असल्यामुळें, त्यांना जें इतक्या वर्षांत विचाराअंतीं खात्रीपूर्वक सांगतां आलें नाहीं तें तिनें एका क्षणांत निश्चित करून टाकलें; म्हणजे हें कीं, हीं प्रतीकें आणि चिन्हें स्त्रीपुरुषेंद्रियदर्शक होत ! ' देवदूतहि जेथें पाऊल टाकावयास कचरतात, तेथें गाढव खुशाल घुसतो ' असें एक वचन आहे, त्याचें मिस मेयोसारखें नामी उदाहरण दुसरें दुर्मिळ ! अथवा हें दुसऱ्याहि एका वचनाचें उदाहरण होऊं शकेल ! " मनुष्यें स्वतःच्या प्रतिमेनुसार ईश्वराचें पूजन करितात. " मिस् मेयोचें मन निव्वळ लिंगभेदमय झालेलें आहे, अर्थात् आपल्या त्या लिंगभेदविषयक कल्पना तिनें जर ईश्वराच्या प्रतिमेंतहि पाहिल्या तर आश्चर्य कसचें !

असल्या या पवित्र गोष्टींची उपपत्ती शेवटीं लिंगभेदावर आणून बसवावयाची, असलें हें खूळ आजकाल एका विशिष्ट प्रकारच्या लेखकवर्गानें कां डोक्यांत घेतलें आहे समजत नाहीं ! श्रीयुत के. नटराज यांनीं 'मदर इंडिया' बद्दल आपल्या "इंडियन् सोशल रिफॉर्मर"मध्यें लिहिलेल्या लेखमालेंत एका ठिकाणीं असें दाखविलें आहे कीं, फ्रॅन्सिस् स्विनी नांवाच्या एका लेखकानें आपल्या ' वलय आणि क्रूस यांचें गूढ ' या पुस्तकांत ख्रिस्ती धर्मांतील क्रूसाचें मूळ पुरुषेंद्रियावर आणून सोडलें आहे. मिस् मेयोला जर ख्रिस्ताबद्दल खराखुरा आदर असेल तर तिनें प्रथम हा स्विनीचा युक्तिवाद खोडावा, आणि मग हिंदु देवांच्या मूर्तींवर डोकें फोडावयास यावें ! पण स्विनीची कल्पना जर तिला मान्य असेल, तर मग तिला हिंदूंच्या मूर्तींबद्दल तक्रार करावयास तोंडच रहात नाहीं !

पण विचार असा केला पाहिजे कीं, प्रतीकाचें मूळ कांहींहि असलें तरी त्याचा पूजकांच्या मनावर दुरून तरी कांहीं परिणाम होतो काय ? सरावानें त्यांना " अक्षरशः अर्थ कळतो, आणि सूचक शक्ति येते " हें म्हणणें साफ खोटें आहे. हिंदु इसम वरच्या खालच्या कोणत्याहि वर्गांतील असो, त्याच्या कधीं स्वप्नांतहि येत नसेल कीं त्या मूर्तीचें मूळ लिंगविषयक असूं शकेल म्हणून ! खुद्द प्रस्तुत लेखकाला असली कल्पना देखील नव्हती. ती पहिल्यानें त्याला कॉलेजमध्यें असतांना एका ख्रिस्ती मिशनऱ्याच्या चोपड्यावरून आली. ह्या प्रतीकांचा कांहींहि अर्थ लाविला

जावो, परंतु त्यांच्या गूढ स्वरूपाचें आकलन मात्र लोकांस होत नाहीं. वरच्यासारख्या कल्पना लोकांच्या मनांत शिरविण्याचा प्रयत्न केला तर लोक त्या ऐकून देखील घ्यावयास तयार नसतात, मग त्या खऱ्या मानावयाचें तर दूरच ! ही गोष्ट तर सर्वांना ठाऊक असेल कीं, दक्षिण हिंदुस्थानांत एकदां कांहीं ख्रिस्ती मिशनरींनीं आपल्या संस्कृतीचा आणि ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याच्या उत्साहभरांत लोकांच्या मनांत असल्या कल्पना भरविण्याचा प्रयत्न केला, तेव्हां त्या लोकांत इतकी गडबड उडाली कीं, शेवटीं त्या मिशनरींना सरकारचा आश्रय घ्यावा लागला. यावरून निर्विवाद सिद्ध आहे कीं, *शंकराची पूजा करतांना त्याच्या लिंगाचें मूळ काय असली कल्पनासुद्धां हिंदूंच्या डोक्यांत येत नसून,* केवळ भक्तिभावानेंच ते त्याची पूजा करीत असतात. इतिहासकार मि. एच्. एच्. विल्सन हे ख्रिस्तधर्मी होते आणि शिवलिंगाच्या पुल्लिंगी कल्पनेकडे झुकणारे होते, तरीदेखील ते काय म्हणतात पहा:— " शिवपूजेचा हेतु उघड असला तरी, एवढें मात्र सांगणें न्यायतः प्राप्त आहे कीं, उत्तर हिंदुस्थानांत या पूजेमध्यें अश्लील किंवा असभ्य विधिसंस्कार नसतात. या पूजावस्तूंमध्यें, आणि त्या वस्तु ज्या खऱ्या पदार्थांच्या निदर्शक म्हणून कल्पना आहे त्या पदार्थांमध्यें, साम्य हुडकून काढावयास कल्पनाशक्तीची जरा विशेषच भरारी मारावी लागेल !"

असो. असले हे मिस् मेयोनें 'सत्याला रजा' देऊन दुष्ट हेतूनें क्रूरपणानें केलेल्या लीलांचे कांहीं मासले आहेत ! ईश्वर तिला क्षमा करो ! तिच्या आत्म्यास शांति देवो !

---

## प्रकरण १२ वें.

## निरपराध्यांची कत्तल.



अलीकडे हिंदी लोकांना जें "सर्वत्र खुनी साम्राज्य पसरलें आहे" असें वाटतें त्याबद्दल आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. खुनी म्हणजे माणसाचे खुनी आम्ही म्हणत नाहीं, तर सत्याचे खुनी ! *या खुनी लोकांपैकीं मिस् मेयो ही एक झाली, पण असे दुसरे शेंकडों आहेत. ते सदा सर्वकाळ, अष्टौप्रहर, सार्वजनिक रीत्या* आणि खासगी रीत्या, जाहीर वर्तमानपत्रांत लेख लिहून आणि मित्रमंडळींबरोबर *खासगी संभाषणांत, हिंदुस्थान आणि हिंदी लोक यांची एकसारखी नालस्ती चाल-*

वून वेलाशक न कचरतां आणि मनाला यत्किंचितहि टोंचणी न लागतां, सत्याचा खून करीत असतात. या लोकांच्या या भयंकर गुन्ह्याची हिंदुस्थान त्यांना क्षमा करीत आहे. कारण हिंदुस्थान हें जात्या धर्मसहिष्णु आहे. धर्मसहिष्णुता हें त्याचें लक्षण आहे. नुसती क्षमाच नव्हे, तर सत्याची हत्या करून स्वतःच्या आत्म्याचीच हत्या करून बसलेल्या या लोकांचें 'ईश्वरा, परलोकीं होणाऱ्या यातनांपासून रक्षण कर' अशी हिंदुस्थान ईश्वराची प्रार्थना करीत आहे.

मिस् मेयोच्या जहरी लेखणींतून हिंदुस्थानचा एकहि इसम सुटलेला नाहीं. बालवृद्ध, स्त्रीपुरुष, गरीब श्रीमंत, लहानथोर, साधुसंत आणि पापी, सगळेच एकजात तिच्या खाक्या करीत सुटलेल्या आवेशाला बळी पडले आहेत. तिनें जी ही निरपराध्यांची कत्तल करावयाची मोहीम काढली, तिचीं आम्ही पुढें कांहीं उदाहरणें देत आहों, त्यांजवरून तिनें तैमूरलंगालाही लाजविणाऱ्या क्रौर्यानें आणि विवेकशून्यतेनें हिंदी छावणींत कसा हलकल्लोळ उडवून दिला आहे हें लक्षांत येईल!

प्रथम आपण महात्मा गांधींच्याबद्दल तिनें केलेला विपर्यास पाहूं. या तिच्या विषारी वाग्बाणानें त्या विचाऱ्या सात्विक साधुश्रेष्ठ जीवाला देखील वेदना झाल्या! गांधीजी म्हणतातः—

"हरएक हिंदी गोष्टीकडे विकृत दृष्टीनें पाहण्याची घाई झाल्यामुळें, तिनें माझ्या लेखनाचा विपर्यास केला आहे; इतकेंच नव्हे तर तिनें स्वतः किंवा दुसऱ्या कोणी, माझे म्हणून म्हटलेले विचार खरोखरच माझे आहेत कीं काय, हें मला विचारून खरें खोटें करून घेण्याचीहि तिला जरूर वाटली नाहीं. तिनें आम्हीं हिंदुस्थानांत म्हणतों तीं न्यायदानाचीं आणि अंमलबजावणीचीं अशीं दोन्हीं कामें स्वतः एकटीनेंच केलीं आहेत. फिर्यादी तीच, आणि न्यायाधीशहि तीच!"

अशी एखादी गोष्ट येथें दिल्यास ठीक पडेल. ती गोष्ट प्रथम मिस् मेयोनें जशी सत्य पार गुंडाळून ठेवून आणि आपला हेतु साध्य करून घेण्यासाठीं मुद्दाम विपर्यास करून दिली आहे, तशी देतों; आणि मग खरोखर जशी घडली तशी देतों. मिस् मेयोनें दिली आहे ती अशीः—

"परंतु एकदां असें झालें कीं, मि. गांधी—ज्यांनीं सर्वत्र अगदीं प्रसिद्धपणें आपलें मत म्हणून सांगितलें होतें कीं, हॉस्पिटलें म्हणजे पापाचा प्रसार करणाऱ्या संस्था होत, 'युरोपियन् डॉक्टर तर वाईटांत वाईट,' आणि 'ह्या मोठ्या दयाशीलतेचा आव आणणाऱ्या डॉक्टरांहून आमचे वैद्य बरे'—ते गांधीच एकाएकीं कुशींत दुखूं लागून आजारी पडले.

"त्यावेळीं ते तुरुंगांत असल्यामुळें, एक इंडियन् मेडिकल सर्व्हिसमधला ब्रिटिश सर्जन् तावडतोब त्यांना तपासावयास आला. (त्यासंबंधाची हकीकत प्रसिद्ध झाली आहे तिजवरून) सर्जन म्हणाले, 'मि. गांधी, सांगावयाला मला वाईट वाटतें कीं, आपणास ॲपेंडिसायटीस् झाला आहे. आपण जर माझ्या हातांतले रोगी असतां, तर मी तावडतोब शस्त्रक्रिया केली असती. पण आपणास कदाचित् आपला आयुर्वेदिक वैद्यच बोलाविणें बरें वाटत असेल.'

" पण गांधींच्या मनांत निराळेंच दिसलें.

"सर्जन पुढें म्हणाले, 'मला ऑपरेशन् न करणेंच बरें वाटतें. कारण परिणाम जर वाईट झाला तर तुमचे स्नेही आमच्यावर आरोप करतील कीं चांगली काळजी घेण्याचें ह्यांचें काम असतांना यांनीं गांधींबद्दल द्वेषबुद्धि मनांत धरून हें काम केलें.'

'तुम्ही नुसतें ऑपरेशन् करावयाचें तेवढें कबूल करा,' गांधी काकुळतीस येऊन म्हणाले, 'कीं आतां मी माझ्या स्नेह्यांना बोलावून आणून त्यांना हें तुम्ही माझ्या विनंतीवरून करीत आहां असें सांगून टाकतों.'

"अर्थात् गांधीजी जाणूनबुजून 'पापप्रसारक संस्थेंत' गेले, इंडियन् मेडिकल सर्व्हिसमधील 'वाईटांत वाईट' म्हणजे 'युरोपियन् डॉक्टराकडून' त्यांनीं ऑपरेशन् करून घेतलें, आणि बरे होतांना त्यांनीं एका इंग्रज भगिनीकडून शुश्रूषा करून घेतली, आणि असेंहि समजतें कीं, एकंदरीत असली माणूस कांहीं फारशी निरुपयोगी नव्हे असें त्यांस वाटलें."

अशी ही मिस् मेयोनें दिलेली हकीगत आहे. यांत असें समजावयाचें नाहीं कीं, ते ते शब्द, ती ती वाक्ययोजना, आणि ते ते विचार, त्या त्या इसमांनीं खरोखरच उच्चारिले! ते फक्त मिस् मेयोनें आपल्या हेतूला जुळतील अशा तऱ्हेनें त्यांच्या तोंडीं घातलेले आहेत! वरील संभाषण म्हणजे मिस् मेयोला जसें पाहिजे होतें तसें बनविलेलें आहे. त्यांतली मुख्य मूर्ति म्हणजे गांधी, त्यांनींच स्वतः त्यासंबंधानें काय शेरा मारला आहे तो आतां त्याच्या शेजारीं ठेवूं म्हणजे झालें! गांधी म्हणतातः—

"सत्याचा हा भयंकर विपर्यास होय. त्यांतल्या नालस्तीच्या भागापुरतीच मी दुरुस्ती करतों; इतर चुका राहूं द्यात. प्रस्तुत प्रसंगीं वास्तविक आयुर्वेदिक वैद्य बोलाविण्याचा प्रश्नच नव्हता. ऑपरेशन् ज्यांनीं केलें त्या कर्नल मॅडॉकनां, पाहिजे

असतें तर मला न विचारतां, किंवा माझी संमति नसतां देखील, ऑपरेशन् करण्याचा हक्क होता. पण त्यांच्या व सर्जन-जनरल हूटन यांच्या मनांत, मला काय वाटेल हा विचार येऊन, त्यांनीं मला तुम्ही स्वतःच्या डॉक्टरांची—हे डॉक्टर त्यांना ठाऊक होते आणि शिवाय ते पाश्चिमात्य वैद्यक आणि शस्त्रक्रिया शिकलेले होते—वाट पाहणार काय म्हणून विचारलें. मीहि उलट त्यांच्याशीं तसेंच सौजन्य दाखवावयास मागें पुढें न पाहतां त्यांना म्हटलें कीं तुम्ही माझ्या डॉक्टरांना तार केली आहे खरी, पण ते येण्यापूर्वी तुम्ही ऑपरेशन् केलें तरी माझी कांहीं हरकत नाहीं, आणि ऑपरेशन्चा कदाचित् अनिष्ट शेवट झाला तर तुमचा बचाव व्हावा म्हणून मी पाहिजे तर तसें तुम्हांला लिहून देतों. म्हणजे माझा त्यांना एवढंच दर्शविण्याचा प्रयत्न होता कीं, त्यांची लायकी किंवा त्यांचें शुद्ध मन यांबद्दल माझ्या मनांत काडीमात्र शंका नाहीं. माझी वैयक्तिक सद्भावना दाखविण्याची ती मला अत्युत्कृष्ट संधि मिळालेली होती."

गांधी सांगताहेत तें खरें—म्हणजे याच गोष्टीत नव्हे तर दुसऱ्या कोणत्याहि गोष्टींत—याबद्दल सबंध जगांत कोणी संशय घेईल असें वाटत नाहीं. उलट मिस् मेयोच्या विधानांच्या संशयित स्वरूपामुळें, आणि तिनें दिलेली माहिती प्रत्यक्ष नसून कोणाच्या तरी मार्फत मिळवलेली असल्यामुळें, वरील प्रसंगाची तिनें दिलेली हकीकत सर्वथैव अविश्वसनीय ठरत आहे. शिवाय वरील संभाषणाच्या वेळीं आणि ऑपरेशन्च्या वेळीं हजर असलेल्या सर्जन वगैरे मुख्य मुख्य व्यक्तींनींहि गांधींनीं दिलेल्या हकीकतीला पुष्टि दिली आहे.

आतां आणखी पुढें पाहूं. मिस् मेयोनें आपल्या "निरपराध्यांच्या कत्तलींत" समाविष्ट केलेली दुसरी निरपराध व्यक्ति म्हणजें कविवर्य रवींद्रनाथ ठाकूर हे होत. रवींद्रनाथांसारखे अगदीं अर्वाचीन युगांतले सुसंस्कृत पुरुषसुद्धां बालविवाहाचें समर्थन करून वर आणखी वाखाणणी करतात असें दिसावें, म्हणून त्यांचें आणि त्यांच्या मतांचें स्वरूप तिनें पुढील शब्दांत वर्णिलें आहेः—

"रवींद्रनाथ टागोर यांनीं अलीकडे, 'विवाहाचें हिंदी ध्येय' या निबंधांत, बालविवाह म्हणजे शुद्ध सात्विकतेचा विकास, सुप्रजाजननाच्या दृष्टीनें मानववंशाची उन्नति करण्याकरितां उच्चतम बुद्धिमत्तेनें कामवासनेवर आणि विषयोपभोगेच्छेवर मिळविलेला विजय, असें त्याच्या स्वरूपाचें स्पष्टीकरण केलें आहे. परंतु हा त्यांचा निष्कर्ष न्यायतःच असा दृढ विश्वास सुचवितो कीं, हिंदी स्त्रिया जर ताब्यांत राहिल्या पाहिजेत, तर त्यांना प्रौढ स्त्रीत्व येण्यापूर्वीच गच्च बांधून

हवाली केल्या पाहिजेत,.........किंवा दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, स्त्रीचा विवाह तिला आपण स्त्री आहों याची जाणीव होण्यापूर्वीच करून टाकला पाहिजे."

हें सगळें मिस् मेयोच्या शब्दांत दिलेलें मत, म्हणजे काउन्ट हर्मन् केसरलिंग्च्या 'विवाहाच्या पुस्तकांत' समाविष्ट करण्याकरितां, रवींद्रनाथांना विनंति केल्यावरून त्यांनीं लिहिलेल्या निबंधांतील एका उताऱ्यावरून काढलेला निष्कर्ष होय. मिस् मेयोनें हा उतारा पुढीलप्रमाणें दिलेला आहेः—

"हिंदुस्थाननें ज्या वासनेबरोबर युद्ध पुकारून विवाहाचें कोडें सोडविलें, ती वासना निसर्गाच्या अत्यंत प्रबळ योद्ध्यांपैकीं एक आहे; अर्थात् तिजवर विजय मिळविणें हा प्रश्न कांहीं सोपा नव्हता.........स्त्रीपुरुषांमधल्या ह्या आकर्षणाची पराकाष्ठा एका विशिष्ट वयोमर्यादेला होत असते; अर्थात् जर विवाह (वैयक्तिक आवडीनिवडीच्या आधीन न ठेवितां) सामाजिक इच्छेच्या आधीन ठेवावयाचा, तर तो सदरहू वयोमर्यादेच्या आंतच आटोपून टाकला पाहिजे. यावरून ही हिंदुस्थानांतली बालविवाहाची पद्धत निघाली."

हा उतारा देतांना मिस् मेयोनें मूळांतून वर तुटक रेषांनीं दाखविलेल्या जागीं असलेले अत्यंत महत्वाचे दोन शब्द गाळले आहेत, ते शब्द तेथें ठेवले कीं, टागोरचें मत मिस् मेयोनें दाखविलें आहे त्याहून निराळेंच वळण घेतें. हे दोन शब्द "हिंदुस्थान म्हणाले" असे असून ते गाळल्याचें पहिल्यानें हुडकून काढणारे गृहस्थ 'इंडियन सोशल रिफॉर्मर'चे संपादक श्रीयुत के. नटराजन हे होत. डॉ. टागोरना असें दाखवावयाचें होतें कीं, हिंदुस्थानची समाजव्यवस्था वर दिलेल्या ह्या विशिष्ट कल्पनेवर आणि तर्कशास्त्रावर बसविलेली होती. परंतु मिस् मेयोला वरील अत्यंत महत्वाचे शब्द जाणूनबुजून गाळून डॉ. टागोर यांचें स्वरूप असें दाखवावयाचें होतें कीं, ते स्वतःच बालविवाहाचे पुरस्कार करणारे आहेत! डॉ. टागोर हे केवळ हिंदुस्थानच्या समाजस्थितीच्या मूळाशीं कोणतें तर्कशास्त्र होतें तेवढयाचेंच काय तें विशदीकरण करताहेत, हें त्यांच्या निबंधांतील या उताऱ्याच्या पुढच्याच भागावरून स्पष्ट आहे. त्या भागांत तेंच विशदीकरण त्यांनीं पुढें चालू ठेवलें आहेः—

आमच्या देशांत, शारीरिक प्रेमासंबंधानें, हाच युक्तिवाद लोकांनीं चालू ठेविला असला पाहिजे. विवाहकार्यासाठीं, स्वयंस्फूर्तीनें उद्भूत झालेल्या

प्रेमावर विसंबून राहणें इष्ट नाहीं; त्याची लागवड उत्कृष्ट फलप्राप्ति होईल अशा प्रकारानें केली पाहिजे............असा ह्या त्यांचा सिद्धांत होता, अर्थात ही लागवड लग्नापूर्वी सुरू केली पाहिजे, आणि म्हणूनच अगदीं लहानपणापासून 'पति' ही कल्पना आमच्या मुलींसमोर काव्यांतून, गोष्टींतून, संस्कारकर्मांतून, आणि पूजाविधींतून, पुढें ठेविली जावे."

यांत आम्ही मोठ्या टाइपांत दिलेल्या शब्दांवरून अगदीं बिनचूक सिद्ध होतें कीं रवींद्रनाथ फक्त त्या विशिष्ट चालीच्या मुळाशीं काय कारण असलें पाहिजे तें सांगत आहेत. त्यावरून ते स्वतः त्या चालीचा किंवा त्या तर्कशास्त्राचा पुरस्कार करीत आहेत असें मुळींच होत नाहीं! असें असतां मिस मेयोनें आपल्या पुस्तकांत दुसऱ्या एका ठिकाणीं हाहि भाग विच्छिन्न करून उद्धृत केला आहे, आणि आम्ही जे वर मोठ्या टाईपांत शब्द दिले आहेत तेवढेच नेमके फार काळजीपूर्वक गाळून टाकले आहेत. उघडच अशा उद्देशानें कीं, रवींद्रनाथांचें स्वतःचें व्यक्तिशः जें मत नाहीं, तें त्यांचें आहे असें दिसून येऊन, वाचकांच्या मनांतून ते पार उतरून जावेत.

याप्रमाणें एकदांच नव्हे तर दोन वेळां मिस् मेयोनें रवींद्रनाथांसंबंधानें खोटें सांगून लबाडी केली आहे, आणि त्याहूनहि आश्चर्य तें हें कीं, हा विच्छिन्न उतारा देतांना पुनः अत्यंत निर्लज्जपणें तिनें पुढें दिलेल्या शेऱ्याची प्रस्तावना जोडली आहे:—

" हिंदु लेखक आणि वक्ते जें सांगतात तें आम्हांला दिसतें तसें खरोखरच बहुमोल आहे कीं काय हें पाहण्याची आपण सावधगिरी बाळगल्यास चांगलें होईल, अशी सूचना आम्हांला ह्या आधुनिक कालांत राहणाऱ्या रवींद्रनाथांच्या प्रस्तुत मुद्यावरील विवेचनावरून पुनः एकदां मिळत आहे."

यांत ती असें सुचविते आहे कीं, पाश्चिमात्य लोकांनीं रवींद्रनाथांचीं वचनें स्वीकारतांना सावधगिरी बाळगिली पाहिजे. बिचाऱ्या रवींद्रनाथांचे विचार मिस् मेयोनें त्यांजवर लादले आहेत. तसे मुळीं नाहींतच! अशा तऱ्हेचा खरोखरच जर कोणाला उपदेश करावयाचा असेल तर तो मिस मेयोच्या वाचकांना! त्यांनीं मिस् मेयोचीं वचनें आणि तिनें घेतलेले उतारे, दिसतात तसे खरोखर आहेत कीं नाहींत हें पाहण्याची पहिल्यानें अगोदर जरूर खबरदारी घ्यावी! खरोखर! मिस मेयोची ह्या संबंधांत सगळी वागणूक इतकी विलक्षण बेशरमपणाची झाली

आहे कीं, सभ्य लोकांच्या समाजांत तिला जवळ उभी करण्याची देखील तिची लायकी नाहीं! पाश्चिमात्य सभ्य स्त्रीपुरुषमंडळींत तिला प्रवेश मिळावा, हेंच त्यांच्या नैतिक अधःपाताचें लक्षण होय.

याच तिच्या निर्लज्जपणाच्या कृत्यानें रवींद्रनाथांची नेहमींची समतोल वृत्ति भंग पावून त्यांचा संताप भडकून त्यांनीं पुढें दिलेले सार्थ उद्गार काढले आहेतः—

" पाश्चिमात्य देशांत राष्ट्र-राष्ट्रांबद्दल कसकशा खोट्यानाट्या कंड्या पिकविल्या जातात तें पाहून वाईट वाटत असलें तरी त्याची आतां आम्हांला संवय होऊन गेली आहे; परंतु व्यक्तींच्या देशबांधवांच्या राजकीय आकांक्षांनीं चिडून जाऊन त्या व्यक्तींविरुद्धहि तशाच प्रकारची मोहीम त्यांनीं चालवलेली पाहून मी तर आश्चर्यचकित होऊन गेलों आहें !"

हिंदुस्थानांतल्या प्रत्येक इसमास ठाऊक आहे कीं, रवींद्रनाथ हे एक मोठ्यापैकीं समाजसुधारक आहेत. ते सर्वस्वी बालविवाहाच्या विरुद्ध असून, त्यांच्या स्वतःच्या कुटुंबांतल्या मुलींचीं लग्नें त्या चांगल्या मोठ्या झाल्यानंतरच होतात. त्यांनीं त्या 'विवाहाच्या पुस्तकांत'ल्या आपल्या त्याच निबंधांत स्वतःचे विचार अगदीं स्पष्टपणें मांडलेले आहेत. ते वाचून कोणाचीहि अगदीं निर्विवाद खात्री होईल कीं, त्यांनीं बालविवाहाच्या पद्धतीचा निषेध करावयाचें कांहीं बाकी म्हणून ठेवलेलें नसून, हिंदु समाजांतील अनेक अनिष्ट प्रकारांचें मूळहि त्यांनीं याच बालविवाहपद्धतींत आणून सोडलें आहे.

अशा तऱ्हेच्या आणखी अनेक गोष्टी या निरपराध्यांच्या कत्तलींतल्या सांगतां येतील, पण आम्ही आणखी फक्त एकच गोष्ट देऊन हें प्रकरण संपवितों. त्या गोष्टींतली लबाडी लाला लजपतराय यांनीं उघडकीस आणून चव्हाट्यावर टांगली आहे. "हिंदुस्थानचे राजेरजवाडे" या प्रकरणांत मिस् मेयोनें पुढील गोष्ट दिलेली आहेः—

"या ठिकाणीं एका मेजवानीच्या प्रसंगाची मला आठवण होत आहे. ही मेजवानी दिल्लींत एका हिंदी स्नेह्यानें मला होमरूलवाल्या राजकारणी लोकांचीं मतें खासगी रीतीनें ऐकावयास मिळावीं म्हणून दिलेली होती. बहुतेक पाहुणे मंडळी आमच्या स्नेह्याप्रमाणेंच बंगाली हिंदु असून पाश्चात्य विद्याविभूषित बुद्धिप्रधान धंदे करणाऱ्या वर्गाची होती. ब्रिटिश लोकांना लवकरच हांकून देऊन आपण हिंदुस्थानावर राज्य करणार आहों, यासंबंधानें त्यांचें बरेंच बोलणें झालें; नंतर मी

त्यांना विचारलें कीं, 'मग तुम्ही हिंदी संस्थानिकांचें काय करणार आहां ?' 'आम्ही त्यांना साफ उडवून देणार आहों,' एकानें मतनिश्चयपूर्वक जोरानें म्हटलें, आणि त्यास बाकीच्यांनीं माना हालवून संमति दर्शविली."

ह्या गोष्टींत कितपत सत्य आहे, हें शोधून काढण्याकरितां लाला लजपतराय यांनीं जे जे म्हणून अशी पार्टी देण्यासारखे होते, किंवा जे जे तिला हजर राहूं शकले असते, अशा एकूणएक इसमापाशीं चौकशी केली, आणि त्यांना कळलें कीं, असोसिएटेड् प्रेसच्या श्रीयुत के. सी. रॉयनीं असा एक उपाहारसमारंभ करून कित्येक हिंदी गृहस्थांस आमंत्रण दिलें होतें. श्रीयुत के. सी. रॉय यांनीं लजपतरायना खात्री देऊन सांगितलें कीं, त्या प्रसंगीं ज्या कांहीं गोष्टी बाहेर आल्याचें मिस् मेयोनें लिहिलें आहे, तें अजीबाद खोटें आहे. शिवाय के. सी. रॉय यांच्या पत्नीनें लजपतराय यांना पुढील पत्र पाठविलें आहे, तेंहि बरेंचसें वस्तुस्थितिनिदर्शक आहे:—

"प्रिय लालाजी यांस—

आपण माहिती विचारली तिजबद्दल फार आभारी आहें. मिस् मेयो दिल्लींत कांहीं दिवस रहावयास आली असतां तिला आम्ही मेडन्स हॉटेलमध्यें उपाहारार्थ बोलाविलें होतें. ती उत्कृष्ट ओळखी घेऊन आली होती. उपाहाराच्या वेळीं फक्त दोघेच बंगाली गृहस्थ होते; एक आमचे यजमान आणि दुसरे मि. सेन. बाकीचे सगळे बंगालच्या बाहेरचे होते. पाहुणे मंडळींत प्रमुख असे मि. एम्. ए. जिना, 'इंडिपेंडण्ट पार्टीचे लीडर्, आणि मि. एस. चेट्टी हे होते. मला आठवतें तें सांगतें कीं, संभाषणाचे विषयः हिंदुस्थानची राज्यघटनाविषयक प्रगति, हिंदुस्थानचें परशत्रूंपासून संरक्षण, जातीजातींत सलोखा, बाल-संरक्षण, आणि दिल्लींतलें कलाकौशल्य आणि संस्कृति, हे होते. हिंदी राजेरजवाड्यांच्या स्थितीबद्दल बोलणें निघालें होतें कीं काय मला आठवत नाहीं. पण मला इतकें खास स्मरतें कीं, त्यांना 'साफ उडवून देण्या'बद्दल कांहीं कोणी तिथें शब्दहि काढला नाहीं.

सिमला,
तारीख ७ माहे सप्टेंबर १९२७.

आपली परम स्नेहांकित
डोरोथी रॉय."

लजपतरायांनीं जिना आणि चेट्टी यांनाहि विचारलें, आणि त्यांनींहि सांगितलें कीं, संस्थानिकांचा प्रश्न आलाच नव्हता म्हणून !

मिस मेयोचे हे असले पराक्रम आहेत! इतक्या भयंकर क्रूरपणानें आणि सदसद्विवेकबुद्धि पार पायांखालीं तुडवून, तिनें ही निरपराध्यांची कत्तल चालविलेली आहे!

एक हिंदी गृहस्थ युनायटेड स्टेट्सूमध्यें गेले असतां त्यांना तेथें निरनिराळ्या ठिकाणांहून व्याख्यानें देण्याबद्दल आमंत्रण करण्यांत आलें होतें. अशा एका व्याख्यानाच्या प्रसंगीं श्रोत्यांपैकीं एक, अर्थातच अडाणी, इसम उभा राहिला आणि म्हणाला कीं, 'हिंदुस्थानांतल्या भाषांमध्यें सदसद्विवेक बुद्धि या अर्थाचा शब्द नाहीं, खरें ना?' 'होय! खरें!' व्याख्यात्यांनीं ताबडतोब उत्तर दिलें, तो शब्द तुमच्यापाशीं आहे, आमच्याजवळ त्याचा अर्थ आहे!'

## प्रकरण १३ वें.

# लग्न आणि बाळंतपण.

---:०:---

बालविवाहाची पद्धत हें एक हिंदुस्थानांतलें मोठेंच सामाजिक अरिष्ट आहे, हें सर्व लोकांना कबूल आहे. ही पद्धत पहिल्यानें कधी सुरू झाली, हें अद्याप गूढच आहे. कित्येक म्हणतात, आणि तसें म्हणावयास कारणेंहि आहेत, कीं ही पद्धत मुसलमानी राज्यामुळें आली. खरें काय असेल तें असो; एवढें निर्विवाद आहे कीं, ही पद्धत प्राचीन काळीं हिंदुस्थानांत नव्हती. मुसलमान येण्यापूर्वीच्या प्राचीन कालांतल्या वाङ्मयांत आपणास असें दिसून येतें कीं, त्या काळीं वीर पुरुष आणि वीर कुमारी मोठ्या वाढत आणि त्यांच्यांत प्रत्यक्ष लग्नापूर्वीं परस्परांशीं प्रणय चाले. तथापि कोणत्या ना कोणत्या तरी कारणानें आज बालविवाह हा हिंदु समाजपद्धतीचें एक लक्षण होऊन बसलेला असून, हिंदु लोकांच्या प्रगतीस तो प्रतिबंधक होत आहे यांत वाद नाहीं.

अर्थात् मिस् मेयो ही बालविवाहाचा निषेध करते आहे, म्हणजे ती कांहीं नवीन करते आहे असें नसून, जें आज अनेक वर्षें खुद्द हिंदी समाजसुधारक करीत आले आहेत तेंच ती आतां करते आहे. परंतु तिनें असें भयंकर विद्रूप चित्र काढून ठेविलें आहे कीं, जणुं काय हिंदु लोक हे उकिरड्यावरचे किडे असून त्यांचें काम म्हणजे एकसारखी प्रजोत्पत्ति करीत सुटणें एवढेंच आहे! म्हणून

तिचें हें चित्र पाहाणारांना असें वाटतें कीं, हिंदु समाजाला एक भयंकर कीड लागलेली असून, तिच्यांतून तो कधींहि जगणें शक्य नाहीं, पार मेलाच पाहिजे!

अशी ही करून दिलेली कल्पना वास्तविक सर्वथैव विपर्यासात्मक आहे. ह्या प्रकरणांत आम्ही हिंदु लोकांमधल्या बालविवाहाच्या पद्धतींतील कांहीं विचार करण्यालायक मुद्यांचें विवेचन करून असें निर्विवाद सिद्ध करण्याचें योजिलें आहे कीं, (१) एकंदर प्रकार दाखविला जातो तितका वाईट नसून (२) त्वरित सुधारणा होण्याचीं आशाजनक चिन्हें दिसत आहेत. समाजाच्या सांप्रतच्या स्थितींत त्यांत कांहीं फायदेशीर भागहि असल्याचें आम्हांस दाखवितां येईल. परंतु त्यांवर विशेष जोर देण्याची आमची इच्छा नाहीं; नाहींतर हिंदूमधले सामाजिक सुधारणेच्या बाबींत परागतिक असलेले लोक तेच आमचे क्षमस्व अर्थांचे भाग घेऊन आपल्या तर्फेचे मुद्दे म्हणून लोकांसमोर मांडून सामाजिक सुधारणेस अडथळा आणावयाचे! आणि इकडे स्वतः आम्हीं तर सामाजिक सुधारणेस वाहिलेले इसम आहों!

यासाठीं आम्हांला विवेचन करतांना अगदीं पायरी पायरीनें आणि मोठ्या सावधगिरीनें पुढें पाऊल टाकलें पाहिजे. प्रथम आपण एक गोष्ट लक्षांत घेणें जरूर आहे कीं, बालविवाहाची पद्धत माणसाला अगदीं कमजोर करून टाकते यांत काडीमात्र शंका नसली, तरी त्या पद्धतींत एकहि चांगला अंश नाहीं असें मात्र म्हणतां येणार नाहीं! सुप्रसिद्ध इतिहासकार मि. लेकी आपल्या 'युरोपांतल्या नीतितत्त्वांचा इतिहास' या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणांत आयर्लंडांतील बालविवाह पद्धतीचा विचार करतांना म्हणतात:— 'आयरिश गरीब शेतकरी वर्गांत अनेक दोष आहेत आणि कांहीं दुर्गुणहि आहेत; परंतु त्याचबरोबर त्यांच्यांत उच्च कोटीचें पातिव्रत्य, आणि त्या पातिव्रत्यासंबंधाची अतिशय तीव्र आणि नाजूक भावना, हेहि गुण आहेत; या गुणांत त्यांची बरोबरी करणारें असें एकहि राष्ट्र अखिल युरोपखंडांत आज शेंकडों वर्षांत दिसत नाहीं; आणि त्या आयरिश लोकांत हे गुण यावयास कारण—शेतकरी वर्गांत जवळ जवळ सार्वत्रिक चालत असलेली लहान वयांत लग्न करण्याची पद्धत हेंच होय!' मि. लेकी आणखीहि पुढें सांगतात कीं, 'युरोपांतल्या प्रत्येक देशांत, ब्रह्मचर्यव्रतांत काय धोका आहे हें सिद्ध करणारे जे कधीं कधीं अनीतिकारक प्रकार घडून येतात, ते आयरिश उपाध्यायवर्गांत दिसत नाहींत; याचेंहि विशेष कारण जर कोणतें असेल तर तें लहान वयांत लग्न करण्याची पद्धत हेंच होय.' यावरून

आम्हास साक्षीपूर्वक दिसून येतें कीं, लहान वयांत लग्न, ही समाजांत पातिव्रत्य रक्षण करणारी एक प्रबळ शक्ति आहे; अर्थात् पाश्चिमात्य देशांशीं तुलना करतां हिंदु लोकांचें पातिव्रत्य इतकें उच्च दर्जाचें कां हें आतां सहज समजून येईल.

यावर असा प्रश्न येतो कीं, 'कोणतें ध्येय पसंत करावयाचें? पातिव्रत्य, कीं शरीरपुष्टि?'' उत्तर देणें कठीण आहे, कारण पातिव्रत्य आणि शरीरपुष्टि दोन्ही समाजस्वास्थ्याला आवश्यकच आहेत! तथापि हिंदी समाजसुधारकांनीं एकीकडे समाजदृष्ट्या अत्यंत शुद्ध असें वैयक्तिक वर्तन घालून देऊन, दुसरीकडे बालविवाहाच्या आपण सर्वथैव विरुद्ध आहों असें जाहीर करून, ती पद्धत मोडण्याचा सतत प्रयत्न चालविलेला आहे.

ही पद्धत पश्चिमेकडील एखाद्या पूर्वग्रहविरहित आणि सहानुभूतिपूर्ण अशा टीकाकाराच्या दृष्टीस कशी दिसते, आणि पाश्चिमात्य देशांतील उशिरां लग्न करण्याच्या पद्धतीच्या आजच्या स्वरूपाशीं तुलना करतां ती कुठें बसते, हें समजून घेणेंहि कांहीं वाईट नाहीं. इंग्लंडमधल्या उशिरां होणाऱ्या लग्नांसंबंधानें रेव्ह. जे. टिसल् डेव्हिस् पुढील उद्गार काढतातः—

'अगदीं अलीकडेपर्यंत जरी इंग्लंडमध्यें विवाहाची कायदेशीर वयोमर्यादा मुलीला १२ आणि मुलाला १४ अशी होती, तरी शिक्षणामुळें, शरीर कमावण्याच्या आवडीमुळें, आणि हळुहळु लोकमत बदलत चालल्यामुळें, ती वयोमर्यादा इतकी वाढत आलेली आहे कीं, आतां शास्त्रज्ञ मंडळी, मुलीचें वय २५।३० वरून आणि राहणीचें मान अधिक भोंवत असल्यामुळें पुरुषाचें वय ३०।४० वरून, मागें त्याहून अधिक टवटवीत अशा मर्यादेवर आणलें पाहिजे असा युक्तिवाद काढीत आहेत. उशिरां लग्न करण्याची आवड ज्या देशांत आहे अशा कांहीं देशांमध्यें तारुण्य लांबवीत नेलें जात आहे, म्हणजे २५।३० च्या वयांत देखील त्यांच्यांत पोरपणा आणि उल्हसितवृत्ति दिसून येऊन, ज्या या वयांत इतर देशांतले लोक कौटुंबिक जबाबदारी अंगावर घेत असतात त्या वयांत त्या देशांतले हे लोक बालबालिकाच राहतात.'

यापुढें हिंदूंच्या बालविवाहपद्धतीसंबंधानें आणि तिच्या मूळाशीं असलेल्या कारणासंबंधानें मि. डेविस् म्हणतातः—

" हिंदुस्थानांतली बालविवाहाची पद्धत, केवळ मुसलमानांच्या स्वाऱ्या घडून आल्या, आणि मुसलमान राजांनीं अगोदरच वाग्दत्त असलेल्या वधूंचें आपण

रक्षण करूं म्हणून वचन दिलें, म्हणून उत्पन्न झाली असें म्हणतां येत नाहीं. वरील पद्धतीच्या मूळाशीं याहून खोल कारण आहे. यांत ध्येयांची भिन्नता आहे. हिंदुलोकांत कुटुंब हें सामाजिक रचनेचें मुख्य अंग असल्यामुळें, त्यांच्यांत लग्न म्हणजे, युरोपियन लोकांत युद्धाचा रंग दिसूं लागतांच जशी सक्तीची सैन्य-भरती, तसाच बहुतांशीं सक्तीचा प्रकार आहे. गृहस्थपणाचीं कर्तव्यें करणें म्हणजे हिंदु लोकांत एक विशेष प्रकारचें शिस्तीचें शिक्षण मानलें जातें, ( याच्या उलट पाश्चात्यांची कल्पना मालमत्तेची, म्हणजे मालकाला ज्यासंबंधानें आपला हक्क हवा तसा गाजवितां येईल अशा प्रकारची, असते )."

पाश्चात्य देशांत आज अनिष्ट प्रकार चाललेले आहेत, त्यांना तोंड देण्यासाठीं उलट दिशेनें पुढील कालांत तेथली सामाजिक परिस्थिति कसकशी बनत जाणार आहे हा प्रश्नच आहे ! त्यासंबंधानें मि. डेव्हिस् म्हणतातः—

" हिंदू लोकांनीं, आपल्या विवाह-विषयक कल्पनेचा विकास चालू असतां, आज पाश्चात्य लोकांस आवडत असलेल्या परस्पराकर्षणावर बसविलेल्या विवाह-प्रकाराचीहि परीक्षा घेऊन पाहिली होती, परंतु तो निरुपयोगी ठरल्यामुळें त्यांनीं टाकून दिला. आम्हीहि तसाच तो पुढें मागें टाकून देणार नाहीं कशावरून ! "

म्हणजे पाश्चात्य समाज प्रौढविवाह टाकून बालविवाह स्वीकारील, असा मि. डेव्हिससारख्या पाश्चात्य पद्धतींत वाढलेल्या लोकांसहि संभव दिसतो आहे एकूण ! यापुढें मि. डेव्हिस् यांनीं हिंदु विवाहपद्धतीची वैयक्तिक बाजू सोडून सामाजिक बाजू विचारांत घेतली आहे. ते म्हणतातः—

" जेणेंकरून समाज एकजीव आणि समतोल स्थितींत राहील, अशी विवाह-पद्धति कोणती?—ती शोधून काढण्याचा हिंदुधर्मानें प्रयत्न केला. ज्याप्रमाणें युरोपांतली राजघराणीं राजकारणाकरितां लग्नें जुळवून आणीत, ज्याप्रमाणें सुप्रजा-जननशास्त्र हें मानव्याच्या प्रगतीसाठीं वैयक्तिक भावना बाजूस ठेवावयास सांगतें, त्याचप्रमाणें हिंदुसमाज समाजहितासाठीं जीवतत्वाच्या मायावी चेष्टा आवरून धरावयास सांगतो—अशी ही मूळची कल्पना आहे. मनुष्यजातीच्या उन्नतीसाठीं स्वयंस्फूर्तीनें कष्ट सोसून नैसर्गिक इच्छा मनाच्या आणि आत्म्याच्या पूर्णपणें काबूंत ठेवण्याविषयीं मातेला प्रोत्साहन दिलें जातें. स्त्रीजातीवर निसर्ग करीत असलेला जुलुम चालवून घेण्यांत कित्येक स्त्रियांना जी मानसिक अधोगति वाटते, ती, मातृपद क्षुगारून देऊन न टाळतां, स्वार्थनिरपेक्ष ध्येय साधण्याच्या कामीं लावून टाळली जाते. "

यासंबंधांत दुसरा एक महत्वाचा मुद्दा मिस् मेयोनें लपवून ठेविला आहे, तो हा कीं, हिंदु लोकांमध्यें विवाह म्हणजे केवळ वाग्दान होय. खरी 'विवाहाची पूर्णता, त्यानंतर बराच काल गेल्याशिवाय—निदान मुली वयांत आल्याशिवाय होत नसते. विवाहित—म्हणजे वाग्दत्त—वधूला आपल्या नवऱ्याच्या घरीं रहावें लागतें, तेथें ती सासूच्या देखरेखीखालीं आपल्या त्या नवीन परिस्थितीला जुळेल असें वागावयास शिकते, तसेंच पुढें खरोखरी त्या घराची मालकीण होण्यापूर्वी त्या घरावर आपलेपणानें प्रेम करावयास शिकते. वयांत येण्यापूर्वी तिचा नवऱ्याशीं संबंधच आणूं दिला जात नाहीं. अतएव तितक्यापुरते तरी त्या बालविवाहाचे अनिष्ट परिणाम कमी होतात.

मि. ऑटो रॉथ्फिल्ड् आय्. सी. एस्. हे आपल्या 'हिंदुस्थानच्या स्त्रिया' या पुस्तकांत म्हणतातः "खराखुरा बालविवाह—वयांत न आलेल्या मुलांमुलींचा विवाह—म्हणजे केवळ एक परत न घेतां येणारें वाग्दान आहे, यापलीकडे त्यांत कांहीं नाहीं."

हिंदु स्त्रीच्या दृष्टीनें, विवाहसंबंध म्हणजे जन्माची गांठ आहे, आज पाश्चात्य देशांत अधोगतीस पोंचून बनलेला केवळ वैषयिक सुखाचा करार नव्हे. हिंदु स्त्रीला लहान बालिका असल्यापासूनच आपल्याशीं विवाहबद्ध झालेल्या तरुणावर प्रेम करावयास शिकविलें जातें. तसेंच तो तरुण देखील ती आपली जन्माची सहचारिणी म्हणून तिजवर प्रेम करावयास शिकतो. अशा रीतीनें तें दोघांतहि एकसमयावच्छेदेंकरून शुद्ध परिस्थितींत उद्भूत होणारें प्रेम, त्याचीं पाळेंमुळें धार्मिक, सामाजिक, आणि वैयक्तिक, अशा त्रिविध कर्तव्यांत खोल शिरून जात असल्यामुळें, इतःपर, भरकटलेल्या भावनेच्या स्वरूपांत न राहतां स्थायिकपणा मिळवून बसतें. वर सांगितलेले ऑटो रॉथफील्ड म्हणतातः—"शिवाय प्रत्यक्ष व्यवहारांत बालविवाहाचे कांहीं उघड उघड फायदे दिसतात. कारण बालविवाहामुळें त्या विवाहित जोडप्याला आईबापांच्या घरीं केवळ मुलें म्हणून एकत्र राहतां येतें, कालक्रमानें त्यांना परस्परांच्या संगतीची आणि प्रेमाची संवय लागून जाते, आणि असें होतां होतां मग ती ज्यांत आपलें पुढें आयुष्य जावयाचें आहे त्या आपल्या कुटुंबांत स्वतःचें स्थान आणि कार्य कोणतें हें ओळखूं लागतात. खरा विवाह—म्हणजे तरुण आणि तरुणी या दशेप्रत पोंचल्यानंतरचा—पुढें बऱ्याच काळानें येतो, कदाचित अनेक वर्षे मध्यंतरीं जातात, आणि त्यानंतर मग आईबाप त्या मोठ्या झालेल्या विद्यार्थ्यांला व गृहकृत्यांत एकसारखा हातभार लावणाऱ्या त्या धडधाकट जोमदार मुलीला आपली संमति देतात."

बालविवाहांत अनिष्ट काय आहे आणि कोठें आहे तें अचूक दाखविण्याकरितां मि. रॅाथफील्ड् लिहितातः—" दोष आहे तो फारसा नुसत्या बालविवाहांत नसून तो त्याच्या पुढच्या खऱ्या विवाहामध्यें आहे, कारण तो पुढचा विवाह कांहीं कांहीं वेळां ऋतु प्राप्त झाल्याबरोबर मध्यें मुळींच काळ जाऊं न देतां करूं दिला जातो.. कारण हिंदुस्थानांत मोठ्या दुर्दैवानें अशी अज्ञानमूलक समजूत पसरून गेली आहे—आणि तशी ती युरोपखंडांतहि रेनेसन्स (विद्यापुनरोद्धारा)च्या काळीं पसरलेली होती— कीं, ऋतुप्राप्ति म्हणजेच पूर्ण यौवनदशा होय ! !"

येथवर आम्ही बालविवाह आणि प्रौढविवाह यांच्या गुणावगुणांचा विचार केला, आणि आम्ही स्वतः अगदीं मनापासून सर्वस्वीं बालविवाहाविरुद्ध आहों अशी आमची वैयक्तिक बाजूहि स्पष्ट केली; आतां प्रस्तुत प्रश्नावर मिस् मेयोनें कोणतीं कसकशीं बेधडक विधानें ठोकून दिलेलीं आहेत त्याचा विचार करूं. मिस् मेयो म्हणते, "सर्वसाधारण पद्धत अशी आहे कीं, हिंदी मुलगी ऋतुप्राप्तीनंतर ९ महिन्यांनीं म्हणजे ८ आणि १४ याच्यामध्यें कोणत्या तरी वयाला मातृपदीं पोंचते. ८ हें वय म्हणजे पराकाष्ठा, आणि कांहीं जातींत अपवादादाखलच आढळेल; १४ हें सामान्यतः बऱ्याच प्रमाणांत आहे." म्हणजे मिस् मेयोच्या विधानावरून पाहतां, हिंदी मुलींची अधिक ती संख्या, १४ आणि ८ याच्या मधल्या वयांत मातृपद पटकावून बसते; अर्थात् त्या मुलींचीं लग्नें ७ वर्षें ३ महिने, आणि १३ वर्षें ३ महिने, यांच्यामध्यें कधींतरी होतात. हा तिचा आरोप खरा आहे काय ?

यासंबंधांत खानेसुमारीच्या रिपोर्टांत अवश्य कांहीं तरी माहिती मिळणारच. त्यांत आपणास ८ आणि १४ याच्यामधल्या वयांत किती माणसांचीं लग्नें झालीं याचा अचूक आंकडा मिळाला नाहीं, तरी ० ते ५, ५ ते १०, १० ते १५, इ. अशा वयांत विवाहित किती आणि अविवाहित किती याची माहिती मिळते. प्रस्तुत आपण १० ते १५ हीं वर्षें घेऊं. हा काल तुलना करावयास फार सोयीचा आहे, कारण तो मिस् मेयोनें हिंदी मुलींच्या मातृपदाचा म्हणून जो काल दिलेला आहे त्याच्याशीं जवळ जवळ जुळतो; कसर राहते तीहि मिस् मेयोला अनुकूल अशीच आहे. असो. १९२१ सालचा खानेसुमारी रिपोर्ट व्हॉ. १, पृ. १६४, तक्ता १, पाहिल्यास दिसतें कीं, १० ते १५ वयाच्या हजार स्त्रियांत ३९९ विवाहित किंवा विधवा, आणि ६०१ अविवाहित आहेत. आणि स्त्री अविवाहित ठेवण्याची हिंदुस्थानांत चाल नसल्यामुळें, वरील आंकड्यांवरून असें म्हणतां येईल

की, हिंदी लोकांमध्यें बहुतेक विवाह, निदान शेंकडा ६०, पंधरा वर्षांच्या नंतर होतात. ही एकच गोष्ट मिस् मेयोचें विधान खोडून टाकावयास पुरेशी आहे. अशा तऱ्हेनें बहुतेक स्त्रियांचीं लग्नें १५ वर्षांनंतर होतात हें सिद्ध होत असतां, त्या सामान्यतः ८ आणि १५ या वयांच्यामध्यें माता होतात असें म्हणणें उघडच मूर्खपणाचें नव्हे काय ? अशा तऱ्हेनें हें मिस् मेयोचें विधान खोटें पडतें; कारण एक तर त्याला पुष्टि देणारा असा कसलाच पुरावा नाहीं, आणि दुसरें, त्याच्या-विरुद्ध असा पुरावा मात्र १९२१ च्या खानेसुमारी रिपोर्टांत सांपडतो.

आतां याहून प्रत्यक्ष असा पुरावा देऊन, मिस् मेयोनें काढलेल्या या चित्राचा अवास्तव विचित्रपणा दाखवूं. हा पुरावा डॉ. मिस् मार्गरेट् बाल्फर या बाईनीं दिलेला आहे. ह्या डाक्टरीण बाई मुंबईच्या हाफ्‌किन् इन्स्टिट्यूटमध्यें मातृदशा आणि बालसंगोपन त्या विषयांत संशोधन करीत आहेत. टाइम्स ऑफ् इंडिया-कडे पाठविलेल्या एका पत्रांत त्या म्हणतातः—

"मी मुंबईतल्या इस्पितळांत पहिल्याच मुलाच्या वेळीं बाळंत झालेल्या अशा ३०४ हिंदु स्त्रियांबद्दल टांचण करून ठेवलेलें आहे. त्यांचें सरासरी वयोमान १८·७ होतें; शेंकडा ८५·६ बाळंतिणी १७ किंवा अधिक वयाच्या होत्या; शेंकडा १४·४ सतराहून कमी वयाच्या होत्या; सर्वांत कमी वय १४ होतें, आणि त्या वयाच्या तीनच स्त्रिया होत्या."

ही मुंबईतली हकीगत झाली. परंतु बाल्फरबाईनीं मद्रासचे सुद्धां आंकडे दिलेले आहेत. त्या पुढें म्हणतातः—"हे आंकडे मी १९२२–२४ सालच्या मद्रास मॅटर्निटी हॉस्पिटलच्या रिपोर्टांशीं ताडून पाहिले. तेथील सरासरी वयोमान १९·४ होतें; शेंकडा ८६·२ बाळंतिणी एकोणीस किंवा वरच्या वयाच्या, १३·८ सतराहून कमी वयाच्या, आणि कमींत कमी वय १३ होतें. ७ जणी १३ वयाच्या, आणि २२ जणी १४ वयाच्या होत्या. मद्रासचे आंकडे फक्त हिंदु स्त्रियांचेच नसून त्यांत अन्य जातीय स्त्रियादि होत्या."

शेवटीं हिंदुस्थानच्या इतर भागांसंबंधानें मिस् बाल्फर म्हणतातः—" उत्तर हिंदुस्थान धरून हिंदुस्थानच्या इतर भागांतील ३९६४ बाळंतिणींची माझ्याजवळ माहिती आहे. यांतून फक्त १० च पंधराच्या खालच्या होत्या; आणि सर्वांत कमी वय १३ वर्षे होतें. "

ह्या आंकड्यांवरून मिस् बाल्फर यांनीं असा योग्य निष्कर्ष काढिला आहे कीं, " मिस् मेयोनें दिलेलीं उदाहरणें हिंदुस्थानांतल्या सर्वसाधारण वहिवाटींची मुळींच निदर्शक नाहींत."

असें असलें तरी देखील, आमचे समाजसुधारक प्रत्यक्ष काय स्थिति आहे याची पूर्ण जाणीव ठेवून आहेत. या संबंधाचें आपलें कर्तव्य त्यांनीं कधींहि न टाळतां, सुधारणेच्या दिशेनें ते सतत प्रयत्न करीत राहिलेले आहेत. व्यक्तिशः उदाहरण घालून आणि समाजांत चळवळ करूनच न रहातां त्यांनीं सरकारचीसुद्धां विवाहवयोमर्यादा वाढवणारे कायदे करण्याकरितां पाठ पुरविलेली आहे. अगदीं ताजें उदाहरण म्हणजे राय साहेब हरविलास शारदा यांनीं असेंब्लीमध्यें आणलेलें बिल होय. आणि तें बिल जर पास होईल तर बालविवाहाला चांगलाच खो दिल्यासारखें होणार आहे.

येथें हेंहि सांगणें अस्थानीं होणार नाहीं कीं, सरकारनें, सर हरिसिंग गौर यांनीं संमति वय १४ पर्यंत वाढवावें असें जें बिल असेंब्लीच्या दिल्ली बैठकींत (१९२८) आणलें, त्यास पुष्टी देऊन तें मान्य करण्याऐवजीं, कांहीं तरी सबबीवर बाल विवाहासंबंधाची एक कमिटी नेमून, ही आवश्यक आणि निकटीची सुधारणा विनाकारण लांबणीवर टाकली आहे.

प्रत्येक समाजसुधारक अद्याप बराच मार्ग आक्रमावयाचा आहे हें पूर्णपणें जाणून असला तरी मागील प्रगतीवरून पुढील प्रगतीची आशा करावयास सबळ कारणें आहेत हेंहि तो ओळखून आहे. खानेसुमारीचे आंकडे उत्तेजनपर आहेत. गेल्या (१९२१ च्या) रिपोर्टांत पुढें दिल्याप्रमाणें वस्तुस्थिति दाखविलेली आहे:—

" अल्पवयी वर्गांत मोडणाऱ्या अविवाहितांची संख्या वाढली असल्याचें ह्या आंकड्यांवरून दिसतें. मग हा फरक व्हावयास काय कारणें असतील तीं असोत. ही प्रगती हिंदुजातींत विशेष ठळकपणानें दिसून येत असली तरी इतर धर्मीयांमध्येंहि ती चाललेली दिसते, परंतु हा फरक बौद्ध आणि ख्रिश्चन लोकांत, त्यांच्यांत अल्पवयांत लग्न करण्याची पद्धत नसल्यामुळें, तितका दिसून येत नाहीं. हा फरक विशेष दिसून येतो तो स्त्रियांमध्यें १० ते १५ वयाच्या वर्गांत, आणि पुरुषांमध्यें १० ते २० वयाच्या वर्गांत. "

हें खानेसुमारी कमिशनरांचें मत आहे, आणि तें त्यांनीं हातीं आलेल्या विपुल व खात्रीच्या पुराव्यावर बसविलेलें आहे. प्रत्यक्ष आंकडे द्यावयाचे तर ते असे

आहेत. १८८१ च्या खानेसुमारींत १५ ते २० वयाच्या दर हजार पुरुषांत ६१७ अविवाहित होते; १९०१ त ते ६५० झाले, आणि १९२१ त ६८७ झाले. तसेंच स्त्रियांमध्यें, १८८१ त १० ते १५ वयाच्या अविवाहित स्त्रिया दर हजारीं ४८१ होत्या, १९०१ त त्या ५५९ झाल्या, आणि १९२१ त ६०१ झाल्या. कदाचित्, ही प्रगति फार त्वरित असें म्हणतां येणार नाहीं. परंतु हिंदी जनतेच्या जुनें तें सोनें मानणाऱ्या मनोवृत्तीचा आणि जाड्याचा विचार करतां ती चांगली आशाजनक आहे यांत संशय नाहीं.

खानेसुमारीच्या अधिकाऱ्यांनीं दाखवून दिलें आहे कीं, विवाहवयोमर्यादेची वाढ बंगाल, व बिहार आणि ओरिसा, या प्रांतांत विशेष प्रामुख्यानें नजरेस येत आहे. या गोष्टीला विशेष महत्त्व आहे तें अशामुळें कीं, या बाबतींत मिस् मेयोचा दांत बंगाली लोकांवर सर्वांत अधिक आहे. पण बंगाल, बिहार आणि ओरिसा या प्रांतांसंबंधानें १९२१ सालचा खानेसुमारी रिपोर्ट काय म्हणतो पहाः—

" १० ते १५ वयांच्या अविवाहित पुरुषांची संख्या १८९१ त ८२६ होती, ती १९२१ त ८६८ झाली, आणि १५ ते २० वयांचा आंकडा ५५४ चा ६६५ झाला. मुलींच्या बाबतींत तर याहूनहि नजरेंत भरेल अशी स्थिति आहे. त्यांचा १० ते १५ वयांचा आंकडा ३०२ चा ४५४ झाला, आणि पुरुष व स्त्रिया दोन्ही विचारांत घेतां, गेल्या दहा वर्षांत ही विलक्षण मोठी वाढ झालेली दिसते."

बंगाल, बिहार आणि ओरिसा, या प्रांतांचे सेन्सस् सुपरिंटेंडेंट मि. थॉम्सन् यांनीं आपल्या रिपोर्टांत पुढीलप्रमाणें विशेष शेरा लिहिलेला आहेः—

" या आंकड्यांवरून स्पष्ट आहे कीं, बंगालमध्यें तसेंच त्या दुसऱ्या दोन्ही प्रांतांत मिळून, सरासरी विवाहवयोमर्यादा सारखी वाढत चाललेली आहे. ही मर्यादा, पुरुष आणि स्त्री या दोघांचीहि, बिहार आणि ओरिसा प्रांतांत, बंगालपेक्षां पुष्कळच ज्यास्त आहे; परंतु दोहोंतहि ती वाढती आहे आणि ती गेल्या दहा वर्षांत तत्पूर्वीपेक्षां विशेष त्वरेनें वाढली आहे."

ह्या विवाहवयोमर्यादेच्या वाढीचीं कारणें पाहतांना सदरहू सेन्सस् कमिशनर म्हणतातः—" हिंदी लोकांत विवाहाची वयोमर्यादा वाढविणारी अनेक कारणें आहेत. पहिलें कारण म्हणजे शिक्षणप्रसार आणि पाश्चात्य ध्येयांचा वाढता संसर्ग, यामुळें वरच्या वर्गांतील लोकांत बालविवाहाच्या अनिष्टतेची जाणीव

निःसंशय वाढत चालली आहे हें होय. दुसरें कारण आर्थिक आहे, आणि त्याचें कार्यकर्तृत्व पहिल्याइतकें स्थिर नसलें तरी त्याचें सामर्थ्य जास्त आहे, आणि बहुधा दुसऱ्या कोणत्याहि कारणापेक्षां याच कारणामुळें प्रस्तुत खानेसुमारींतल्या आंकड्यांवरून दिसून येणारा हा विवाहवयोमर्यादेंतला बदल घडून आलेला असावा. मुलांच्या बाबतींत आणि कधीं कधीं मुलींच्याहि बाबतींत, शाळेंतल्या शिक्षणाच्या प्रसाराचा या विवाहपद्धतीवरहि प्रत्यक्ष परिणाम झालेला आहे. कारण मुलांमुलींचें शिक्षण पूर्ण होण्यापूर्वी त्यांना लग्नाकरितां शाळेंतून काढावयास पुष्कळ आईबापांचें मन घेत नाहीं."

सरकार आज मध्यवर्ती आणि प्रांतिक भाग मिळून होणाऱ्या वसुलाचा शेंकडा ५ टक्के शिक्षणासाठीं खर्चीत आहे, तोच जर तें १० टक्के करील तर सामाजिक सुधारणेस केवढी मदत होईल बरें!

---

## प्रकरण १४ वें.

# स्त्रियांचा दर्जा—१

—*:०:*—

मिस् मेयो आपल्या पुस्तकांत पुनः पुनः बजाविते आहे कीं, आपण जें हें लिहिलें आहे, तें हिंदुस्थानांतल्या स्त्रियांच्या तर्फेनें, त्यांच्यासाठीं भांडणारी या नात्यानें, लिहिलें आहे; आणि हिंदुस्थानांतल्या स्त्रियांची स्थिति उगाच कांहीं तरी अतिशयोक्तीनें रंगवून, ती असें सुचवूं पाहत आहे कीं, त्यांच्याइतकें वाईट रीतीनें जगांत दुसऱ्या कोणत्याहि प्राण्याला वागवीत नसतील! एखाद्या इंग्रज किंवा अमेरिकन् वाचकाला वाटावयाचें कीं, हें सर्व वर्णन करीत असतांना, तिचें तें कोमल हृदय हिंदी स्त्रियांची सेवा करण्याच्या उत्कट इच्छेनें अगदीं भरून येऊन दयेनें थबथबून राहिलें असेल!

कदाचित् मिस् मेयोला वाटलें असेल कीं, स्त्री विरुद्ध पुरुष, असा हा डाव झुलवून आपण हिंदी स्त्रियांना आपल्या बाजूस ओढूं. परंतु त्या संबंधांत आतां तिच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला असेलच! हिंदी स्त्रियांनीं हिंदुस्थानच्या प्रत्येक भागांत सभा भरवून, तिनें जें त्यांच्या दुःखांचें कांहीं वर्णन म्हणून पुढें केलें आहे त्याचा एकजात सर्वांनीं निषेध केला आहे. आज या कालांत हिंदु-

स्थानांत स्त्रियांची कशीहि स्थिति असो, परंतु त्या स्थितीचें मिस् मेयोनें जें वर्णन दिलें आहे, तें सर्वथैव विपर्यासात्मक आणि अविश्वसनीय असून कित्येक ठिकाणीं तर धडधडीत लबाड्यांनीं चितारलेलें आहे.

प्रस्तुत प्रकरणांत आम्ही हिंदुस्थानांतल्या स्त्रियांची स्थिति गत कालांत कशी होती, आणि आज कशी आहे, याचें विवेचन करावयाचें योजिलें आहे. हिंदी स्त्रियांचें आज सर्व कांहीं यथास्थित चाललेलें आहे, असला वाद घालण्याचा आमचा मुळींच इरादा नाहीं. त्यांच्या स्थितीमध्यें जो कांहीं आज हलकेपणाचा भाग आहे, त्यांतला बराचसा बालविवाहाच्या पद्धतीचा परिणाम आहे; परंतु ती पद्धत गेल्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें हळुहळु कमी होत चालली आहे. दुसरा शिक्षणाभावाचाहि थोडाबहुत परिणाम झालेला आहे; हा स्त्रीशिक्षणाचा प्रश्न आम्ही पुढील प्रकरणांत घेऊं.

हिंदी स्त्रियांची गत कालांत काय स्थिति होती, त्यासंबंधानें इतकें सांगितलें म्हणजे पुरें आहे कीं, स्त्रिया पुरुषांच्या निदान बरोबरीच्या तरी मानल्या जात असेंच एकूण एक पुरावा दाखवीत आहे. प. वा. डॉ. भांडारकर यांनीं ' हिंदुस्थानचा सामाजिक इतिहास ' या आपल्या सुप्रसिद्ध निबंधांत गत कालांत हिंदी स्त्रियांचा समाजांत केवढा उच्च दर्जा असे हें भरपूर आधार देऊन दाखविलें आहे. प्रोफेसर एच्. एच्. विल्सन्, प्रसिद्ध इतिहासकार आणि मिल्चच्या " हिंदुस्थानच्या इतिहासाचे " संपादक, यांनीं अगदीं निश्चयपूर्वक असें विधान केलें आहे कीं, ' हिंदु लोकांइतका स्त्रियांचा मान प्राचीन काळच्या दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रांत ठेवीत नसत. '

स्त्रियांचें जीवित एकलकोंडें नसे. त्यांना अंतःपुरांत कोंडून ठेवीत नसत. त्या काळीं पडद्याची पद्धत अस्तित्वांत नव्हती. स्त्रिया नवऱ्यांबरोबर लढाईवर जाऊन समरांगणांत दोन हात करीत, अशीं उदाहरणें मिळतात. पुराणें सांगतात कीं, पांडवभार्या द्रौपदी राज्यकारभारांत बरेंच मन घाली; राजप्रासाद आणि त्यांतमधील कोशागार यांजवर देखरेख करी; देशाच्या धार्मिक संस्थांवर लक्ष ठेवी; आणि प्रजेला स्त्रियांच्या कर्तव्यांचें आणि हक्कांचें शिक्षण देई.

हिंदु लोकांचें महाकाव्य जें महाभारत, त्यांत स्त्रीचें वर्णन पुढील शब्दांत केलें आहे:—" भार्या ही पुरुषाचें अर्धांग आहे; भार्येसारखा मित्र नाहीं; भार्या हें धर्म, अर्थ, काम, या त्रिविध पुरुषार्थांचें मूळ आहे; भार्या हें मोक्षाचें कारण आहे. "

धर्मशास्त्रप्रणीत कायद्यानें पत्नीचा दर्जा काय आहे, त्यासंबंधानें प्राचीन हिंदुस्थानचे थोर स्मृतिकार मनु म्हणतातः—

( १ ) स्त्री मरण पावली असतां, नवऱ्यानें दुसरी करावी. भर्ता मरण पावला असतां, स्त्रीनें दुसरा करावा.

( २ ) स्त्री मद्यपानरत होऊन आणि व्यभिचाररत होऊन दूषित झाल्यास, पतीनें दुसरी करावी. पती दूषित झाल्यास स्त्रीनें दुसरा पति करावा.

( ३ ) स्त्री वंध्या असल्यास, पुरुषानें दुसरी स्त्री करावी. पुरुष नपुंसक असल्यास, स्त्रीनें अन्य पति वरावा.

( ४ ) विशिष्ट परिस्थितीमध्यें, स्त्रीनें भर्त्याशीं संभोग वर्ज करावा.

( ५ ) पतीनें स्त्रीला टाकल्यास, तिनें दुसरा विवाह करावा.

ह्यावरून प्राचीन कालीं हिंदुस्थानांत स्त्रियांना केवढे हक्क असत हें निर्विवाद सिद्ध होतें.

मालमत्तेसंबंधाचा हक्क तर याहूनहि विशेष नजरेंत येण्याजोगा आहे. प्रोफेसर विल्सन् सांगतात कीं, ' मालमत्तेवर स्त्रियांचा हक्क पूर्णपणें मान्य करून तो चांगला सुरक्षितहि करून ठेविलेला आहे.' ते आणखी असेंहि सांगतात कीं, " औरस पुरुष संतति नसल्यास, विधवांना स्थावर इस्टेटीचा यावज्जीव उपभोग, आणि जंगम इस्टेटीची संपूर्ण मालकी, मिळते. मुलींकडे गेलेल्या मालमत्तेवर मुलींचें पूर्ण स्वामित्व असतें. मुलगे असल्यास, आई आणि मुली यांना वांटे मिळण्याचा हक्क असतो, आणि बायकोला स्मृतींत सांगितलेल्या मार्गांशिवाय इतर अनेक मार्गांनीं मालमत्ता मिळते, तें तिचें स्वतःचें स्त्रीधन असून त्यावर ती ह्यात असतां नवऱ्याचा कांहीं हक्क नसतो, आणि तिच्या मागून तें तिच्या स्वतःच्या वारसांकडे जातें, आणि या वारसांत कधीं कधीं स्त्रियांचा पहिला हक्क असतो. अर्थात् हिंदुलोकांमध्यें स्त्रीला इस्टेटीचा मुळींच हक्क नाहीं हें म्हणणें सत्याला अगदीं पार सोडून आहे. "

असा हा स्त्रियांचा हिंदुस्थानांत प्राचीन कालीं दर्जा असे. आतां तो आज काय आहे हें पाहूं. मध्यंतरीं शेंकडों वर्षांच्या कालांत अनेक कारणें उपस्थित झाल्यामुळें, तो दर्जा आज राहिला नाहीं हें निर्विवाद होय. परंतु पुढें दिलेल्या विवेचनावरून असें दिसून येईल कीं, हिंदी स्त्रियांची आजची स्थिति एखाद्या पाश्चात्य माणसाच्या नजरेस, त्याला पडद्याआड काय चाललें आहे हें प्रत्यक्ष

समजून घेण्याचें साधन नसल्यामुळें, जितकी वाईट दिसते तितकी मुळींच नाहीं. मालमत्तेच्या हक्कासंबंधानें बोलावयाचें तर तो त्यांचा हक्क आज शेंकडों शतकांच्या कालांत निर्विघ्न राहून, त्यासंबंधानें आजच्या स्त्रियांची स्थिति मनूच्या कालीं जी होती तीच कायम आहे. झाली असेल तर थोडी बहुत सुधारणाच ! करितां, ह्या हक्कासंबंधानें कांहीं तक्रारीस मुळींच जागा नाही.

आज कोणी पाहिजे तो आपलें असें म्हणत सुटतो कीं, आज काल हिंदुस्थानांत स्त्रियांसंबंधानें आदरभाव ठेवीत नाहींत, त्यांना कःपदार्थ मानतात, त्यांना कितीहि वाईट रीतीनें वागविलें तरी क्षम्यच मानलें जातें. असलीं हीं विधानें मिस मेयोसारखींच केवळ वरवर पाहून केलेलीं असतात. मिस मेयोच्या लिहिण्यावरून एखाद्या परकी इसमास वाटेल कीं, हिंदुस्थानांत स्त्रियांना चांगलें बंधनांत अगदीं कडक देखरेखीखाली ठेवण्यांत येत असतें. पण हें अगदी सपशेल खोटें आहे.

हिंदुस्थानांत राहिलेले फ्रेंच कॅथोलिक मिशनरी फादर डुबॉय—ज्यांची मागे एका प्रकरणांत आम्ही अवतरणें घेतलेली आहेत, आणि ज्यांच्या 'हिंदु लोकांच्या चालीरीति' या पुस्तकाचा मिस् मेयोनें हिंदी लोकांना फाडेंकुट पाडण्याकरितां यथास्थित उपयोग केलेला आहे, ते स्वतःच स्त्रियांना हिंदुस्थानांत केवढा मान दिला जातो याची साक्ष देताहेत ! ते १८२१ आक्टोबर १ च्या एका पत्रांत ( ख्रिस्ती धर्मासंबंधानें पत्रें ) लिहितातः 'खरें सांगावयाचें म्हणजे, हिंदु स्त्रियांना अगदीं तुच्छतेनें आणि कःपदार्थ म्हणून लेखण्यांत येतें असें जें म्हणतात तें तर खोटेंच, पण उलट दुसऱ्या कोणत्याहि आशिया खंडांतल्या देशांतील स्त्रियांहून हिंदी स्त्रियांवर कितीतरी कमी ताबा असतो, त्यांना खरेंखुरें स्वातंत्र्य अधिक मिळतें, आणि कोणासहि हवेतसे वाटतील असे हक्क अधिक असतात.'

नवऱ्याचें बायकोशीं वर्तन बाह्यतः कठोर आणि उग्र दिसतें, त्यावरून परकी माणसाचा गैरसमज होतो, तो दूर करण्याकरितां फादर डुबॉय् त्याच पत्रांत पुढें म्हणतातः—'बाहेर लोकांत जी नवऱ्याची बायकोशी कठोर आणि उग्र अशी वागणूक दिसते, ती केवळ औपचारिक असून, पतिपत्नी एकांतांत येतांच ती अजीबात नाहींशी होते ! आणि त्यावेळीं मग बायको आपल्या स्त्रीजातीकडून जगांतल्या सर्व सुधारलेल्या देशांत पुरुषजातीवर चालविली जाणारी अबाधित चक्रवर्ती सत्ता धारण करते ! आणि युक्तीनें नवऱ्यास मुठींत आणून कधी कधीं

तर आपल्या मनास येईल तसें त्यास फिरविते ! सारांश, बाहेर लोकांसमोर जरी बाह्यतः तिजवर नवऱ्याची कठोर आणि विरसट मुद्रा फिरलेली दिसली, तरी घरांत ती घराची सर्वथैव मालकीण असते, रेंसभरहि कमी नाहीं !'

दुसरे एक अलीकडचे लेखक मि. ऑटो रॉथ्फील्ड्, आय्. सी. एस्. यांनीं हिंदुस्थानांत ३० वर्षे घालवून सांप्रतच्या हिंदी सामाजिक चालीरीतींची अगदीं बारकाईनें माहिती मिळविलेली आहे, आणि चारएक वर्षांपूर्वी त्यांनीं 'हिंदुस्थानच्या स्त्रिया' या नांवाचें एक उत्कृष्ट पुस्तकहि प्रसिद्ध केलें आहे. त्या पुस्तकांत त्यांनीं हिंदी स्त्रियांच्या स्थितीसंबधानें अगदीं सुरेख विचार प्रगट केले आहेत. ते म्हणतातः—

"त्यांचें दूर दूर राहणें, घरांत लांब आंत एका बाजूस असणें, यांतच त्यांची अर्धी अधिक माधुरी आहे, आणि ती त्या जाणून आहेत. तुमची ती अमेरिकन शाळांतली—मुलांमुलींनीं वर्गांत आणि बाहेर मैदानांत एकत्र बसून खेळून स्त्रीपुरुषांमधली सगळी आकर्षक भावना घांसून पार पुसून टाकून, त्यांना जवळ जवळ बहीण भावंडांच्या भावनेवर समसमान आणून बसविण्याची—पद्धत त्यांना नको आहे ! **हिंदुस्थानांतल्या स्त्रियांना इतका मिळणारा आदर आणि त्यांच्या सामर्थ्यांतलें अर्धें सामर्थ्य, त्यांचें दर्शन केवळ प्रसंगोपात्त होतें आणि त्या कधींमधींच भेटतात, या गोष्टीवर अवलंबून आहे."**

येणेंप्रमाणें मिस् मेयोचा जो निष्कर्ष कीं, स्त्रिया पुरुषांबरोबर अगदीं मोकळेपणानें मिसळून हिंडत फिरत नाहींत म्हणून त्या अगदीं हलक्या स्थितींत असल्या पाहिजेत, किंवा त्यांजबद्दल कोणास कांहींच आदरभाव वाटत नसला पाहिजे, तो अगदीं सर्वथैव चुकीचा आहे.

मि. ऑर्थर् मेह्यू आपल्या 'हिंदुस्थानचें शिक्षण' या पुस्तकाच्या ९८ व्या पृष्ठावर अगदीं बरोबर सांगतात कीं:—'इंग्रज माणसास, हिंदी कुटुंबांतील अंतर्गत राहणी फारशी कधींच पहावयास न मिळाल्यामुळें, त्यांत स्त्रियांचें केवढें वजन आणि महत्व असतें, हें बरोबरसें मुळींच कळून आलेलें नाहीं. त्याबद्दल हिंदूंचें म्हणणें काय आहे तें आपण ऐकूं, मग त्यांतल्या बऱ्याचशा भागाला मुसलमानांचीहि पुष्टि मिळते, हें कळून येईल. कारण मुसलमानांची पडदा पाळण्याची योजना, 'स्त्री जात कमी दर्जाची' ह्या गेल्या शतकांतील इंग्लंडांतल्या कल्पनेपेक्षां, स्त्रियांबद्दलच्या पूज्यभावाची आणि एकट्या घरांतच त्यांच्या सर्व वजनाचा उपयोग व्हावा या इच्छेची अधिक निदर्शक आहे.'

हिंदू लोकांची स्त्रीजातीबद्दल मुळांत काय कल्पना आहे, त्याचें मि. मेह्यू पुढील शब्दांत वर्णन देतात:—स्त्री म्हणजे हिंदु लोकांच्या कल्पनाशक्तीला घराची याजिका अशी वाटते. पवित्र तुळशी वृंदावनाला पाणी घालणें, होमाग्नि जळत ठेवणें, स्नान आणि ईश्वर-ध्यान यांहीं अन्नाची संस्कारशुद्धि रक्षण करणें, हीं या याजिकेचीं पवित्र कर्तव्यें होत. तिचें कौटुंबिक कार्य केवळ भक्तिरूप आहे. ती घराच्या बाहेर फक्त यात्रा करावयाची तेव्हांच पाऊल टाकते. पण घराच्या आंत तिच्याशिवाय काडीमात्र इकडे तिकडे होणार नाहीं. आबालवृद्ध कोणाहि पुरुष व्यक्तीशीं तिला यत्किंचितहि प्रतिबंध नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यांचें घरांतील बोलणेंचालणें, आचार-विचार, सर्व कांहीं, ती फिरवीत असते."

पाश्चात्यांची अशी एक कल्पना आहे कीं, हिंदु स्त्रिया कसल्याहि उच्च गोष्टींना नालायक समजल्या जातात; तिला मि. मेह्यू यांचें उत्तर असें:—

"साहित्य, संगीत, कला, यांना स्त्रिया नालायक आहेत असें कोणी कधींहि मानलेलें नाहीं. संस्कृत वाङ्मयांत अशा अनेक विदुषींचीं उदाहरणें सांपडतात, आणि कवयित्रींचीं सुद्धां! तरुणींना तर एका संस्कृत शिक्षा-विचारी विद्वानानें ६४ कला घालून दिलेल्या आहेत! एवढे मोठे शंकराचार्य, पण त्यांच्याशीं सुद्धां वाद करणारी एक पंडिता होती! सीता आणि द्रौपदी, दमयंती आणि सावित्री, आपल्या पतीचें प्रेम पोशाखाच्या नखऱ्यांनीं राखून नव्हत्या! तर त्या आपापल्या पतींच्या खऱ्याखुऱ्या सहचारिणी होत्या, आणि तशाच आज या घटकेसहि हिंदु स्त्रिया आहेत."

स्त्रियांना हिंदुस्थानांत केवढा आदर दिला जातो याची एक दुसरी कसोटी म्हणजे स्त्रीदेहाबद्दलच्या पवित्र भावनेची अनुल्लंघनीयता होय. फादर डुबॉय म्हणतात, "हिंदू लोकांत स्त्रीदेह पवित्र मानतात. बाहेर लोकांत तिला पुरुषाचें नखाग्रसुद्धां स्पर्श करूं शकत नाहीं. ती कितीही हलक्या स्थितींत असो, तिला कोणीहि—अगदीं घर्‍यांतला बडा माणूससुद्धां—'आई' याहून अन्य उपपदानें संबोधणार नाहीं. एखाद्या घरांत नुसत्या स्त्रियाच असतील, मग तें एखाद्या अनाथ विधवेचीं झोंपडी कां असेना, तर तें एक पवित्र अनुल्लंघनीय असें स्थान मानलें जाऊन, कोणी निगरगट्ट चंगीभंगीदेखील आंत पाऊल टाकूं धजणार नाहीं, आणि यदाकदाचित् धजलाच तर त्याला योग्य प्रायश्चित्त मिळाल्याशिवाय

कधींहि राहणार नाहीं ! केवढयाहि मोठ्या गर्दीत स्त्री जावो, तिच्या केंसासहि धक्का लागणें शक्य नाहीं. एखादी स्त्री रस्त्यानें चालली असतां, तिजकडे युरोपांतले भटके लोक नुसते पहात राहातात; तसें हिंदुस्थानांत जर कोणी पाहिलें, तर तें सर्वजण उद्धटपणाचें आणि अशिक्षितपणाचें वर्तन समजतात. "

मि. ऑटो रॉथफील्ड आपल्या " हिंदुस्थानच्या स्त्रिया " या पुस्तकांत हेंच सांगतात. ते म्हणतातः—'हिंदु लोकांची वागण्याची अशी एक रीत आहे कीं, स्नेह्यांच्या सुद्धां घरांतल्या स्त्रिया आल्या गेल्या तरी कोणी तिकडे लक्ष द्यावयाचें नाहीं कीं बोलावयाचें नाहीं ! आणि अगदीं पाजींतला पाजी इसम असल्याशिवाय कोणीहि कांहीं हस्तविक्षेप किंवा गैरशिस्त असा ओळखीचा प्रकार दाखवून कोणा स्त्रीचा विनयभंग करणार नाहीं. युरोपांत अगदीं गलिच्छ गल्लीकुच्यांतून जशा नर्स जातात आणि त्यांना कोणीहि कसला त्रास देत नाहीं, तसेंच हिंदी स्त्रिया वाटेल तितक्या गर्दीतून जावोत त्यांना कोणीहि दुखविणार नाहीं किंवा त्यांचा कोणी कसलाहि अपमान करणार नाहीं. कारण हिंदुस्थानांतल्या स्त्रियांनीं जगानें सारखें पाहत रहावें असें स्वार्थनिरपेक्षतेचें एक उत्तुंग ध्येय उभारलेलें आहे; आणि त्याचें शिखर त्यांनीं स्वतः जवळ जवळ गांठल्यासारखें आहे."

हिंदी समाजांतील खालच्या वर्गांतील लोक स्त्रियांना कसें वागवितात, आणि त्याच वर्गाचे पाश्चिमात्य लोक आपल्या स्त्रियांस कसें वागवितात, ह्याची तुलना करून मि. रॉथफील्ड म्हणतात कीः—

" दारू पिऊन धुंद झालेला नवरा आपल्या बायकोला कधीं कधीं मार देईल, नाहींतर उलट खालीं मान घालून मुकाट्यानें तिच्या शिव्याशापांची ओरड ऐकून घेईल. परंतु इतर देशांतल्या त्याच वर्गाची स्थिति पाहतां, यांची ही स्थिति फार बरी; आणि अगदीं वाईट जरी प्रसंग घेतले तरी, युरोपांतल्या गलिच्छ भागांतले ते भयंकर प्रकार, मजुरांच्या वस्तींतल्या आळींतून लपत छपत हिंडणारे ते कुंटण दलाल, आणि बायकांना लाथांखालीं तुडविणारे ते पशु, यांचा विचार करतां, हिंदुस्थानांतली स्थिति तुलनेसाठीं सुद्धां त्यांजबरोबर खालीं आणून बसविणें लज्जास्पद ठरेल ! "

दाट वस्तीच्या शहरांतील विशेषतः मजूरवर्गासंबंधानें मि. रॉथफील्ड लिहितातः—

" सामान्यतः बोलावयाचें तर, या वर्गातला देखील कोणी हिंदु इसम युरोपांतील शहरांतल्या खालच्या वस्तींत दिसून येत असलेला बीभत्स आणि क्रूरपणाचा प्रकार करण्याइतक्या अधोगतीस पोंचलेला बहुधा दिसत नाहीं. आणि त्याची बायको तर उच्च कोटीचा स्त्रियांचा सदाचार आणि पतिव्रताधर्मपालन करीत असते. त्यांच्या पतिपत्नीसंबंधांत सहिष्णुभाव अधिक दिसून येतो, आणि हिंदी माणसाचा वाईटांत वाईट स्वभाव घेतला तरी सामान्यतः त्यांत पाशवी वर्तनाचे अति नीच प्रकार दिसून येत नाहींत."

हिंदु लोकांच्या वैवाहिक जीवनासंबंधाचे आपले विचार सारांशरूपानें सांगतांना मि. रॉथफील्ड शेवटीं म्हणतातः—

" सामान्यतः असें म्हणतां येईल कीं, हिंदु लोकांची विवाहाची पद्धत आजकालच्या युरोपांत झपाट्यानें बदलत जात चाललेल्या विवाहपद्धतींइतकीच पतिपत्नींना सुखावह—म्हणजे सुख शब्दाच्या सामान्य अर्थानें सुखावह—होते; शिवाय त्यांचें सुख युरोपियनांच्या सुखाहून कमी स्वार्थनिष्ठ आणि जास्त परार्थनिष्ठ असतें."

पुनः एकदां मि. रॉथफील्ड आपल्या पुस्तकाच्या शेवटच्या प्रकरणांत म्हणतातः—

" राष्ट्रांतील स्त्रीत्वाची खरी किंमत काय आहे हें अजमावयाचें उत्कृष्ट साधन म्हणजे प्रेमाची स्फूर्ति आणि उत्कटता किती पूर्णत्वानें प्रत्यक्ष आचरणांत दिसते हें होय. या कसोटीनें पाहतां हिंदुस्थानांतील वरच्या वर्गांच्या स्त्रीत्वाशीं कोणत्याहि दुसऱ्या देशाचें स्त्रीत्व बरोबरी करूं शकणार नाहीं."

मिस् मेयोनें, हिंदी समाजांत स्त्रियांना किती कःपदार्थ मानलें जातें याचें उदाहरण म्हणून आपल्या समजुतीप्रमाणें नेहमींच चाललेल्या अशा बालस्त्रीहत्येचा उल्लेख केला आहे. एवढी गोष्ट खरी कीं, हिंदुस्थानांत आईबापांना मुलाचें अपत्य अधिक आवडतें. पण त्याचें कारण असें कीं, मुलगा नसेल तर कुटुंब पुढें चालूं शकत नाहीं; कारण मुलगी असली तरी ती लग्न होऊन दुसऱ्याच्या घरीं जाणार. असें असलें तरी मुलगी आईबापांना आवडत नाहीं असें समजणें सर्वस्वी चुकीचें आहे. स्त्रीअपत्याची हत्या करण्याची चाल आहे, या विधानासंबंधानें सांगावयाचें तें असें कीं, जे ही चाल आहे असा विशेष ओरड करितात त्यांना तिच्या अस्तित्वाबद्दल यत्किंचितहि पुरावा दाखवितां आलेला नाहीं. ही पद्धत असलीच तर ती

रजपुतांत सर्वांत जास्त प्रमाणांत असावी. या प्रश्नावर सर जॉर्ज कॅम्पबेल्, के. सी. एस्. आय. यांच्या म्हणण्याला विशेष किंमत दिली पाहिजे. त्यांची हिंदुस्थानांत १८४२ पासून १८७५ पर्यंत नोकरी होऊन, ते बंगालच्या गव्हर्नरच्या हुद्यावर चढलेले होते, व त्यांना रजपूत लोकांची अगदीं बारीक सारीक माहिती होती. ते आपल्या 'अर्वाचीन हिंदुस्थान' या पुस्तकांत म्हणतातः—

"स्त्री-अपत्य मारून टाकण्याची चाल, एका काळीं कांहीं भागांत आणि कांहीं जातींत चालू असलेली, सर्व देशभर आज चालू आहे असें कधीं कधीं दर्शविलें जातें. **परंतु त्या गोष्टीवर माझा विश्वास नाहीं हें मला सांगितलेंच पाहिजे.** आजच्या सुबत्तेच्या परिस्थितींत, आणि जाती बऱ्याच विस्तारल्यानें एका रक्ताच्या नातलगांमध्यें परस्परविवाह होऊं नये हा नियम राखून जातींमध्यें विवाहसंबंध व्हावयास वाटेल तितकें क्षेत्र असल्यामुळें, ती चाल आज चालू असण्याचा संभव आहे असें मला वाटत नाहीं. वस्तुतः, अगदीं अलग आणि कांहीं एक विशेष प्रकारचा दर्जा सांगणारीं कांहीं कुटुंबें सोडून दिल्यास, इतर सर्व कुटुंबांत मुलींना रत्नसमान मानतात, म्हणून पुष्कळशीं उदाहरणें दाखविल्याशिवाय ही बालहत्या चालू होती असें म्हणतां येत नाहीं.

"अशीं दहा उदाहरणें जर मॅजिस्ट्रेटला खात्रीपूर्वक आढळलीं, तर दुसरीं नव्वद लपविलीं आहेत असें मानावयास आमची हरकत नाहीं. पण मुळींच जर असें उदाहरण मिळालें नाहीं, तर नऊ किंवा नव्वद या दोन्हीवर मी विश्वास ठेवणार नाहीं. रजपूत लोकांशीं माझा बराच संबंध आलेला आहे, परंतु मला असला हा प्रकार कधींच आढळून आलेला नाहीं. **याकरितां, हे जे कल्पनेच्या भराऱ्या मारणारे लोक कागद पेन्सिल घेऊन खेड्यापाड्यांत जातात, आणि आपणास मुलींपेक्षां मुलगे अधिक दिसतात अशी स्वतःची कल्पना करून घेऊन रजपूत शेतकऱ्यांमध्यें अगदीं बरोबर निमे मुली दर वर्षी मारल्या जातात असा हिशेब लोकांसमोर मांडतात—या असल्या लोकांवर विश्वास ठेवण्याची माझी तयारी नाहीं.**"

हें १८५२ सालीं, म्हणजे पाऊणशें वर्षांपूर्वी, लिहिलेलें आहे; आणि ज्या रजपुतांबद्दल या चालीसंबंधानें विशेष संशय, त्यांच्यांत जर सर जॉर्ज कॅम्बेलनीं हें लिहिलें त्या काळीं ती चाल नव्हती, तर ती आज यत्किंचित् तरी आहे असें म्हणणें निव्वळ धाडस नव्हे काय? आतां ती चाल मध्यंतरींच्या काळांत

ब्रिटिश सरकारनें किंवा हिंदी संस्थानिकांनीं मुद्दाम पुनरुज्जीवित करून वाढविण्या-करितां कांहीं विशेष खटपट केली असेल तर गोष्ट निराळी ! पण अशी कल्पनाच करणें चुकीचें आहे !

---

## प्रकरण १५ वें.

## हिंदी स्त्रियांचा दर्जा—२.



हिंदु कुटुंबांतील नित्य व्यवहाराच्या गोष्टींत, आणि कुटुंबाबाहेरील गोष्टींतहि, स्त्रिया जें कार्य करीत असतात, तेंहि कांहीं यःकश्चित् नव्हे ! त्यांच्यांत पाश्चात्य स्त्रियांचा पुरुषी-भाव नसेल, पाश्चात्य स्त्रियांप्रमाणें त्या पुरुषांबरोबर खांद्याशीं खांदा भिडवून प्रत्येक जीवन-क्षेत्रांत स्पर्धेनें, चढाओढीनें, आणि कधीं कधीं तर वैरभावानें, झगडत नसतील ! परंतु त्यांची मनोवृत्ति सहकारितेची आणि साहाय्याची आहे; आणि त्या आपल्यापरी उत्कृष्ट रीतीनें कुटुंबाची व्यवस्था व काळजी यांची जबाबदारी व ओझें अंगावर घेऊन, तें हलकें करीत असतात.

मागें सांगितलेले फ्रेंच मिशनरी अॅबे डुबॉय् हे आपल्या ' हिंदुस्थानांतील ख्रिस्ती धर्मासंबंधाच्या पत्रां'त सांगतात कीं, " घरांतली सगळी व्यवस्था, मुलांची शुश्रूषा, नोकरांचाकरांवर देखरेख, भिक्षा घालणें आणि दानधर्म करणें, हें हिंदु कुटुंबांत स्त्रियांचें काम असतें. पैसा आणि रत्नादि मोलवान् वस्तु, बहुधा त्यांजपाशींच ठेवावयास दिलेल्या असतात. संसारास लागणारे जिन्नस आणणें आणि खर्चाच्या इतर बाबींची व्यवस्था करणें हीं कामें त्यांचींच असतात. सुना आणि जांवई मिळविण्याचें अत्यंत महत्वाचें काम, फारसें नवऱ्यांवर सुद्धां न सोंपवितां, त्यांजवरच सोंपविलें जातें. आणि तें पार पाडण्यांत त्या इतकी बारीक चिकित्सा, अवधान, आणि दूरदर्शीपणा दाखवितात कीं, तसे गुण दुसऱ्या कोणत्याहि देशांत खास कधीं सांपडणार नाहींत ! गृहकृत्यांत त्यांची सामान्यतः **इतकी धूर्तता, काटकसर, आणि बुद्धिमत्ता दिसून येते कीं, ती युरोपांतल्या कोणाहि उत्कृष्ट गृहिणीला शोभेल."**

कायाकष्ट करून उदरनिर्वाह करणाऱ्या लोकांसंबंधानें अॅबे डुबॉय् यांनीं याहूनहि स्पष्ट शब्दांत वर्णन केलें आहे. " गृहव्यवस्था आणि कुटुंबांतील माण-

सांची काळजी ह्या ज्या वर सांगितल्याप्रमाणें खुद्द त्यांच्याच हातांत दिलेल्या; बाबी, त्यांशिवाय शेतकऱ्यांच्या मुली आणि बायका आपल्या पित्यांबरोबर आणि नवऱ्यांबरोबर शेतांत काम करावयास जाऊन त्यांना मदत करीत असतात....... पुष्कळ स्त्रिया स्वतःच्या दुकानावर स्वतः बसतात; आणि **मुळाक्षरें किंवा दशांशपद्धति यांचें ज्ञान नसतां देखील अन्य साधानांनीं त्या आपला हिशोब अगदीं चोख ठेवितात;** आणि व्यापारी देवघेवींत स्वतः पुरुषांहूनहि त्या हुषार अशा मानल्या जातात.......सारांश, सुधारलेल्या समाजांतलें असें, एकहि काम नाहीं, एकही धंदा नाहीं कीं, ज्यांत हिंदु स्त्रिया प्रत्यक्ष गुंतलेल्या दिसून शिवाय ठळकपणें नजरेस येत नाहींत।"

अशी ही हिंदुस्थानांतल्या स्त्रियांची आणि त्या करीत असलेल्या निरनिराळ्या कार्यांची खरी स्थिति आहे. त्या आपल्या पतींच्या खऱ्या सहचारिणी असून त्यांना त्यांच्या शिरावरील ओझें आणि जबाबदारी हलकी करण्यांत बरेंच सहाय्य करितात; कुटुंबांत त्यांना समान दर्जानें वागविण्यांत येतें, इतकेंच नव्हे तर कधीं कधीं त्यांस वरिष्ठ दर्जाहि देण्यांत येत असतो. अॅबे डुबॉय पुनः एकदां म्हणतातः—"घरांत विवाहित स्त्रियांच्या अधिकाराचा उपयोग मुख्यतः सुव्यवस्था व कुटुंबांतील माणसांत परस्परांशी सलोखा राखण्यांत केला जातो. आणि हें महत्वाचें काम पुष्कळ स्त्रिया इतक्या दूरदर्शित्वानें आणि शहाणपणानें पार पाडतात कीं युरोपांत तसलें उदाहरण मिळणें कठीण. मला अशीं कांहीं कुटुंबें ठाऊक आहेत कीं, त्यांत तीस चाळीस किंवा त्याहूनहि अधिक माणसें—मोठ्या मुली आणि मुलगे, सर्वांचीं लग्नें होऊन मुलें झालेली, अशीं सगळीं एकत्र एका वृद्ध स्त्रीच्या—आईच्या किंवा सासूच्या—हाताखालीं राहत. ही वृद्ध बाई चांगली व्यवस्था राखून, सुनांच्या स्वभावाशीं कधीं खंबीरपणा दाखवून तर कधीं कानाडोळा करून मिळतें घेऊन, इतक्या त्या सगळ्या परस्परविरोधी हिताच्या आणि त्याहूनहि परस्परविरोधी स्वभावाच्या बायकांमध्यें कैक वर्षेपर्यंत शांति आणि सलोखा नांदवूं शके. **मी तुम्हांला असें विचारितों कीं, आमच्या देशांत जेथें दोन बायकादेखील एका घरांत सलोख्यानें राखणें अशक्य होतें, तेथें ही वरील परिस्थिति असेल तर घरच्यासारखाच सलोखा राखणें कधीं तरी शक्य होईल काय ?"**

अशा या गोष्टी आहेत, आणि सर अतुल चतर्जी—हिंदुस्थानचे इंग्लंडांतले हाय कमिशनर—यांना त्याचा प्रत्यक्ष अनुभव आहे, म्हणूनच त्यांनीं इंग्लंडांत

गेल्या ज्यान्युआरींत हेड मास्तरणींच्या कॉन्फरन्समध्यें बोलतांना अगदीं बेधडकपणें सांगितलें कीं, "जगांतल्या ज्या ज्या देशांची मला माहिती आहे, त्यांतल्या कोणत्याहि देशांतल्या स्त्रियांहून हिंदुस्थानच्या स्त्रियांचें घरांत अधिक वजन चालतें.......घराबाहेर त्यांचें वजन इतकें दिसून न आलें तरी तें पुष्कळच असतें. जो राजकारणी पुरुष, राज्यकारभारी, आणि बौद्धिक धंद्याचा मनुष्य, हिंदी स्त्रियांचें घरांत आणि घराबाहेर असलेलें वजन विचारांत घेत नाहीं, तो आपल्या कामांत सर्वथैव अयशस्वी झालाच पाहिजे."

आतां आपण विधवांच्या प्रश्नाकडे वळूं. मिस् मेयोनें हिंदुस्थानांतल्या विधवांच्या दुःखांचें एक भडक रंगाचें अनेक ठिकाणीं विपर्यस्त स्वरूप देऊन चित्र काढलें आहे. वास्तविक ज्या कोणास या प्रश्नाचा निर्विकार मनानें विचार कर्तव्य आहे, त्यानें प्रथम आपल्या मनांतून हिंदुस्थानांत विधवाविवाहाला सार्वत्रिक प्रतिबंध आहे, ही कल्पना अजीबाद काढून टाकणें जरूर आहे. ही कल्पना खरी नव्हे, कारण वरच्या जाती सोडून—आणि त्या सगळ्या मिळून सर्व लोकसंख्येच्या एक अष्टमांशच भरतील—इतर सर्व जातींत विधवाविवाहाला मोकळीक आहे.

मि. ऑटो रॉथ्फील्ड् आपल्या "हिंदुस्थानच्या स्त्रिया" या पुस्तकांत म्हणतातः—"विधवाविवाहाला प्रतिबंध सार्वत्रिक नाहीं. ज्या जातींनीं अद्याप उच्च धार्मिक संस्कारांनीं येणारी शुद्धी आपणास पाहिजे असें म्हटलेलें नाहीं, त्या जाती धार्मिक पावित्र्याविरहित असलेलें असें दुसरें लग्न करून मानवी इच्छेशीं तडजोड करावयास मोकळ्या असतात. वरच्या जातींतच काय ती स्त्रियांना जात्यभिमानाची भरपाई स्वतःच्या तपस्येनें करावी लागते. परंतु इकडे हिंदुस्थानांत विधवांना विवाहप्रतिबंधामुळें क्लेश आहे, तर तिकडे युरोपांत या प्रतिबंधाभावीं गुह्यवर्तनी कुमारिकांच्या जीविताची भयंकर नासाडी चालली आहे."

वरच्या जातींत सुद्धां विधवापुनर्विवाहाची चळवळ हळुहळू वाढत चालली आहे. केशवपनाची जुनी चाल बहुतेक नाहींशीच झाली आहे. हिंदी समाजसुधारकांनीं केवळ विधवांसाठीं म्हणून स्वतंत्र अशा, मुख्यतः सार्वजनिक पैशावर चालणाऱ्या, शाळा काढल्या आहेत. त्यांत विधवांना उपयुक्त शिक्षण मिळून, त्यांना शिक्षकिणी, सुइणी, डॉक्टरणी वगैरे धंद्यांत पडतां येतें, आणि अशांची

संख्या दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणावर आहे. अशा तऱ्हेनें सुरू झालेल्या या चळवळीला जोर मिळतां मिळतां कांहीं वर्षांनीं समाजाचें स्वरूपच अजीबाद पालटल्याशिवाय राहणार नाहीं.

गेल्या चाळीस वर्षांत झालेली विधवाविवाहाची प्रगति श्रीयुत के. नटराजन् यांनीं मद्रासच्या गेल्या नॅशनल सोशल कॉन्फरन्समध्यें अध्यक्ष म्हणून केलेल्या भाषणांत थोडक्यांत सुरेख वर्णिलेली आहे. "पुनर्विवाह करणाऱ्या विधवा थोड्याच असतात खऱ्या, परंतु मुद्दा हा कीं, पुनर्विवाहाला होणारा विरोध पुष्कळच कमी झालेला असून, जुन्या लोकांची जी कल्पना कीं, विधवेनें पुनर्विवाह करणें म्हणजे पाप होय, तिला आतां फारसें कोणी विचारीत नाहीं. विधवा पुनर्विवाह फार होत नाहींत याचें कारण अविवाहित मुलींमध्यें अनुरूप वर मिळविण्याबद्दल इतकी भयंकर चढाओढ चालू असते कीं, त्यामुळें लग्नाच्या बाजारांत त्यांनांच अधिक मागणी येते. दुसरेंहि एक असें लक्षांत घेतलें पाहिजे कीं, विधवाविवाहाची ज्या देशांत पूर्ण मुभा आहे, तेथें देखील थोड्याच विधवा पुनर्विवाह करितात."

स्त्रीशिक्षणाच्या प्रगतीसंबंधानें मि. नटराजन् म्हणतातः—

"स्त्रीशिक्षणांत गेल्या तीस वर्षांत झालेली प्रगति जवळ जवळ आश्चर्यजनक आहे. आणि ती इतर कोणत्याहि प्रांतापेक्षां मद्रासमध्यें विशेष आहे. मद्रास शहरांत आतां स्त्रियांचीं दोन मोठीं कॉलेजें असून त्यांत सर्व जातींच्या आणि पंथांच्या मिळून सुमारें चारशें मुली शिकत असतात. प्राथमिक आणि दुय्यम शाळांत शिकणाऱ्या मुलींची संख्याहि बरीच वाढलेली आहे, आणि विशेष लक्षांत घेण्यासारखी गोष्ट ही कीं, महायुद्धाच्या काळच्या आणि नंतरच्या महागाईमुळें व शाळा कॉलेजांची फी वाढल्यामुळें, जरी मुलांचें शिक्षण कांहींसें मागें पडलें, तरी मुलींच्या शिक्षणाची जी संख्येच्या व इतर दृष्टीनें सारखी अखंड प्रगति चालली आहे तिला त्यामुळें कांहींहि बाध आलेला नाहीं. या ठिकाणीं मला हिंगणें बुद्रुक येथील स्त्रियांच्या विश्वविद्यालयाचा उल्लेख केल्याशिवाय राहवत नाहीं. या विश्वविद्यालयाच्या स्थापनेचें श्रेय बहुतेक सर्वस्वीं प्रोफेसर कर्वे यांच्या स्वार्थत्यागपूर्वक कळकळीच्या दीर्घ प्रयत्नाला आहे. प्रोफेसर कर्वे यांच्या या स्त्रीशिक्षणाप्रीत्यर्थ केलेल्या सेवेचें हिंदुस्थानांतल्या सर्व समाजसुधारकांना सदैव कृतज्ञतापूर्वक स्मरण राहील.

"हिंदी स्त्रियांच्या या शिक्षणप्रगतीबरोबर, त्यांना समाजसेवेचें शिक्षण देणाऱ्याहि संस्था वाढल्या आहेत. अशा प्रमुख संस्था म्हणजे मुंबईचें सेवासदन, आणि पुण्याचें सेवासदन ह्या होत. मुंबईचें सेवासदन परलोकवासी मि. मलबारी आणि नुकतेच स्वर्गस्थ झालेले मि. दयाराम गिडुमल यांनीं स्थापिलें, आणि पुण्याच्या सेवासदनाची स्थापना स्वर्गस्थ श्रीमती रमाबाई रानडे यांच्या व्यवहारकुशलते-मुळें झाली."

येथवर झालेलें हें कार्य फार थोडें आहे यांत संशय नाहीं. परंतु सर्वत्र दिसत असलेलीं चिन्हें आशाजनक आहेत. आणि सरकार जर स्त्रीशिक्षणाकरितां आणखी पैसा सोडील, तर या चळवळीला मोठाच जोर येईल. सध्यां ही सगळी चळवळ केवळ आपखुशीच्या प्रयत्नांवर चाललेली आहे. यावरून दिसून येईल कीं, हिंदी समाजसुधारक आपल्या समाजाची स्थिति असावी तितकी चांगली नाहीं हें उघड कबूल करीत असून ती सुधारण्याकरितां त्यांचे सतत प्रयत्न चाललेले आहेत. ही सुधारणा घडवून आणण्याचें मुख्य साधन म्हणजे शिक्षण, त्याची कशी प्रगति होत चालली आहे हें आपण पाहिलेंच आहे.

या ठिकाणीं हेंहि सांगणें अस्थानीं होणार नाहीं कीं, या शिक्षणप्रगतीच्या मार्गांत जी एक आडकाठी घातली जात आहे, ती पाश्चात्य देशांत स्त्रियांनीं चालविलेल्या कित्येक अनिष्ट चळवळी आणि त्यांनीं हिंदी मनावर होणारा परिणाम, यामुळें होय. कलकत्ता युनिव्हर्सिटीचें सॅड्लर कमिशन त्यासंबंधानें आपल्या रिपोर्टाच्या दुसऱ्या भागांत पृ. ६ वर म्हणतेः—

"पाश्चात्य शिक्षणानें मुलींवर काय परिणाम होईल त्याबद्दलची ही धास्ती, स्त्रियांना मोकळीक दिल्यानें पाश्चात्य देशांत अलीकडे घडत असलेले कांहीं प्रकार न आवडल्यामुळें वाढलेली आहे."

पुष्कळ हिंदी गृहस्थांना अशी भीति वाटते कीं, 'मुलींना जें शिक्षण दिलें जात आहे त्या शिक्षणानें त्या हळूहळू इंग्रजी बनत जाऊन, आमच्या घरांतल्या शांत शुद्ध वातावरणांत दांडगट मतस्वातंत्र्याचे अनिष्ट परिणाम आणून सोडतील, अनादि कालापासूनच्या आमच्यात एकजीव होऊन रुजलेल्या आचारविचार पद्धतींना लाथाडून पाखंडी वादानें आमची सर्व पवित्रता छिन्नभिन्न करून टाकतील.' आम्हाला स्वतःला मात्र असलें कांहीं होईल असें वाटत नाहीं; परंतु लक्षांत घ्यावयाचें तें हें कीं, पुष्कळांना अशी भीति वाटते, आणि तितकी ती

प्रगतीला अडथळा आणते. या सगळ्याला जबाबदार एक त्या पाश्चात्य प्रमिला होत !

हिंदुस्थानांतल्या स्त्रीशिक्षणासंबंधानें मि. मेह्यु ह्यांनी आपल्या 'हिंदुस्थानांतलें शिक्षण' या पुस्तकांत एक महत्वाचा मुद्दा पुढें आणला आहे. हिंदुस्थानांत साक्षरतेच्या बाबतीत स्त्रीपुरुषांत फार मोठा फरक आहे ही गोष्ट जगजाहीर आहे; आठ पुरुषांत एक साक्षर मिळतो, तर स्त्रियांत ६३ त १ मिळते. हा फरक कोणामुळें झाला ? मिस् मेयोचें याला अगदीं ठेवलेलें उत्तर, कीं, हिंदु चालीरीतींमुळें ! तिच्या समजुतीनें, हिंदु लोक सर्वथैव स्त्रीशिक्षणाच्या विरुद्ध ! वास्तविक गोष्ट तशी नाहीं. मि. मेह्यू अगदीं बरोबर हिंदुस्थान सरकारला यांत जबाबदार धरतात. पृ. ९६ वर ते म्हणतातः—"सरकारनें आपले आरंभींचे सर्व प्रयत्न पुरुषांपुरतेच चालविल्यामुळें, त्यानें कुटुंबांत जी पूर्वी कधींच भिन्नता नसे ती आणून सोडली."

सरकारनें जेव्हां शिक्षणाकडे आपलें लक्ष पहिल्यानें वळविलें, तेव्हां स्त्रीशिक्षणाचा प्रश्न त्यानें नीट विचारांत घेतला नव्हता, आणि त्याकरितां स्वतंत्र पैसाहि ठेविला नव्हता. 'निसर्गानें ज्या मानवाधांला इंग्लंडमध्यें घरांतला एक अलंकार म्हणून निराळें केलें, त्याला हिंदुस्थानांतहि त्याच स्थानीं ठेवावयास कांहीं हरकत नाहीं.' ही कल्पना मनाशीं बाळगून त्यावेळीं सरकार चाललें होतें. अर्थात् त्याच सरकारी अधिकाऱ्यांनीं, स्त्रीशिक्षण तर पहिल्यानें पाहिजे, असें रोज उठल्या बसल्या हिंदुस्थानच्या कानाशीं ओरडावयाचें ठरविल्याबरोबर, मि॰ मेह्यू त्यांची बरोबर खरडपट्टी काढून म्हणतातः—"या ठिकाणीं विशेष जोर देऊन सांगावयाची गोष्ट ती ही कीं, सरकारनें आरंभीं निष्काळजीपणा दाखवून चालढकल केली म्हणूनच विशेषतः, आज हिंदुस्थानाला हा स्त्रीशिक्षणाचा विषय धडाक्यानें घेतां येत नाहीं."

येणेंप्रमाणें हिंदुस्थानांतील स्त्रियांच्या प्रश्नाचा हा विस्तरशः विचार केल्यानंतर, मग स्वतः आमचे या स्त्रियांच्या प्रगतीविषयीं काय विचार आहेत तें मागें ठेवणें योग्य होणार नाहीं. आमचें अगदीं उघड उघड असें मत आहे कीं, हिंदी स्त्रिया ज्या दिवशीं पाश्चात्य स्त्रियांची कांहीं एक मागें पुढें न पाहतां बेलाशक पाटेल तशी नक्कल करूं लागतील, त्या दिवशींच हिंदुस्थानच्या दुर्दैवास सुरुवात झाली हें खास समजावें ! आमच्या स्त्रियांनीं आपलें सद्गुण कायम राखून,

आपल्यामधील उत्कृष्ट गुणांचा पाश्चात्य स्त्रियांमधील उत्कृष्ट गुणांशीं योग्य असा मिलाफ करून, आमच्या मार्गानें स्वातंत्र्य गांठावयास निघालें पाहिजे. आंजची पाश्चात्य स्त्री मोठीशी अनुकरणीय आहे, असें म्हणावयास आज आमची मुळींच तयारी नाहीं. पाश्चात्य देशांत ज्यास स्त्रियांचें 'स्वातंत्र्य' म्हणून वारंवार संबोधण्यांत येतें, तें केवळ कुटुंबाच्या 'विघटनेचें' एक भपकेदार नांव आहे, या पलीकडे कांहीं नाहीं! ही गोष्ट पाश्चात्यांमधल्या श्रेष्ठ आणि दूरवर दृष्टि पोंचविणाऱ्या लोकांस हळुहळु पटत चालली आहे हें सुचिन्ह होय. इंग्लंडांतल्या अलीकडील विवाहित स्त्रियांसंबंधानें हिल्डा नील्ड यांनीं कांहीं दिवसांपूर्वी डेली क्रॉनिकल पत्रांत म्हटलें आहे कीं, "आधुनिक विवाहासंबंधानें सरसकट अशी टीका होत आहे कीं, शेंकडा ९९ बायकांना गृहिणीपदासंबंधाची काडीची देखील माहिती नसते; स्वयंपाक त्यांना करतां येत नाहीं, कपड्याला सुई लावतां येत नाहीं, संसारांत लागणारे जिनसपान्नस काय, कसे भरून ठेवावे याची यत्किंचितहि कल्पना नाहीं, आणि घरांत एकंदर कशी व्यवस्था राखावी यासंबंधानें तर त्यांचें डोकें कोरें ठणठणीतच असतें." आम्हांला तर वाटतें कीं ह्याच अनिष्ट प्रकारांची जाणीव होऊन व्हाइसरॉय साहेबांच्या पत्नी लेडी आयर्विन् यांनीं दिल्ली येथें भोपाळच्या बेगम साहेबांच्या अध्यक्षतेखालीं अलीकडेच भरलेल्या अखिल भारतीय स्त्रीपरिषदेंत भाषण करतांना सांगितलें कीं:—

"एका दृष्टीनें हिंदुस्थानची स्थिति चांगली आहे; कारण आज त्याच्यापुढें असलेल्या प्रश्नांत प्रथम इतर देशांनीं मार्ग काढण्याचा प्रयत्न करून चुका केलेल्या असल्यामुळें, त्या चुकांवरून तें शहाणें असेल तर त्यास बोध घेतां येण्यासारखा आहे.

"मुलींचें शिक्षण मुलांच्या शिक्षणाहून निराळें असलें पाहिजे हें त्या देशांना कळलेलें नाहीं. मुलांना आणि मुलींना एकाच जगांत रहावयाचें आहे, आणि त्या दोघांचाहि त्यांत वांटा आहे हें खरें; परंतु त्यांत या दोघांचीं कार्यें बरींच निराळीं आहेत. पुष्कळशा देशांत आज आपणास मुलींचें शिक्षण म्हणजे मुलांच्या शिक्षणाचें निवळ अंधानुकरण करून चाललें असल्याचें दिसत आहे.

"मुलींचा अभ्यासक्रम अमुक एक परीक्षा पास होण्याची आवश्यकता धरून ठरविणें खास अनुचित होय. कारण त्यानें आम्हांला जे विषय मुलींनीं अवश्यमेव शिकावेसे वाटतात ते गाळणें भाग पडतें.

"म्हणून, मला तर असें वाटतें कीं, आपण शक्य तो प्रयत्न करून निराळें ध्येय घालून दिलें पाहिजे, आणि जनतेंत आणि खुद्द मुलींमध्यें अशा प्रकारच्या शिक्षणाची इच्छा उत्पन्न केली पाहिजे कीं, ज्यामुळें मुलींना, निदान त्यांपैकीं बहुतेकांना तरी, अन्य दिशांनीं आपापली प्रगति करून घेतां येईल.

"त्यांना, मला वाटतें, पुढील गोष्टी मिळवून देण्याचें आपलें उद्दिष्ट असावें. गृहकृत्याचें प्रत्यक्ष व्यावहारिक कार्यज्ञान, पत्नी आणि माता या नात्यानें त्यांच्या कर्तव्याची एक बाजू पार पाडावयास जरूर लागणाऱ्या आरोग्यविषयक नियमांचें ज्ञान, आणि त्यांच्या भरीस, जेणेंकरून त्यांचें दृष्टिक्षेत्र वाढून मनोविकास व्हावयास विशेष मदत होईल अशा तऱ्हेच्या विषयांचा अभ्यास."

मि. ऑटो रॉथफील्ड् आपल्या 'हिंदुस्थानच्या स्त्रिया' या पुस्तकांत मोठ्या चाणाक्षपणानें सांगतातः—"परंतु हें अंतःस्वातंत्र्य आणि हा बाह्य विकास परकी लोकांच्या चालीरीतींचें अनुकरण करून मिळविण्याची जरुरी नाहीं, आणि तसा तो मिळणारहि नाहीं. असलें अनुकरण अस्वाभाविक आणि विसंगत झाल्याशिवाय कधींहि राहणार नाहीं; आणि ज्या जातींनीं तें करून पाहिलें, त्यांना त्याचे अनिष्ट परिणाम भोगल्याशिवाय राहिलेले नाहींत."

---

## प्रकरण १६ वें.

# रोगराई आणि दारिद्र्य.



सामाजिक चालीरीतींसंबंधानें लिहिणें निराळें, आणि रोगराईसंबंधानें लिहिणें निराळें. प्रत्येक सामाजिक चालीच्या मागें फायदे असतात, आणि तोटेहि असतात, आणि त्या चाली सध्यांच्या किंवा मागच्या कांहीं ना कांहीं तरी सामाजिक गरजे-मुळें उद्भवलेल्या असतात. तसें रोगराईचें नव्हे. रोग म्हणजे चांगल्याची यत्किंचि-तहि छटा नसलेली एक अंतर्बाह्य सर्वथैव अनिष्ट अशी गोष्ट आहे. म्हणून त्यासंबं-धानें मिस् मेयोच्या टीकेस उत्तर देतांना जरा चमत्कारिक परिस्थिती पडते. समजा तिनें म्हटलें, आणि वस्तुतः म्हटल्याप्रमाणें आहे, कीं, हिंदुस्थानचे झाडून सारे लोक रोगानें पछाडलेले आहेत, आणि हिंदुस्थानांत रोगाच्या सांथी यथेच्छ पोसल्या जातात!

आतां असल्या या ढोकळ मानानें बेलाशक दडपून दिलेल्या विधानाबद्दल कोणी शंका घेतली, तर त्यावर रोगराईबद्दल बेपर्वाई दाखविण्याचा आणि तिं . महत्व कमी करून दाखविण्याचा आरोप केला जाण्याचा संभव आहे. आणि ही अडचण विशेष वाटण्याचें कारण, रोगी कोणत्या लोकांना म्हणावें आणि निरोगी कोणाला म्हणावें, हें ठरवावयास सर्वसंमत अमुक असें कांहींच परिमाण नाहीं. त्याबद्दल सध्यांचें आमचें ज्ञान केवळ तुलनात्मक आहे. अमुक एक जन्ममृत्यूचें प्रमाण, किंवा अमुक एका मर्यादेचें रोगक्षेत्र, झालें म्हणजे तो लोकसमूह रोगी किंवा निरोगी समजावा असें आपणास कांहींच म्हणतां येत नाहीं. रोगाचा त्या मानानें कमी प्रादुर्भाव असला तरी देखील सुधारणा करण्याची इच्छा आणि कारण हें असतें, व असलें पाहिजेच.

रोगराई व सार्वजनिक आरोग्य या विषयावरील मिस् मेयोच्या टीकेचे तीन भाग करतां येतील. पहिला भाग, ती हिंदू वैद्यकाच्या कल्पनेची आणि उपपत्तीची टर उडवते; दुसरा, ती निश्चयपूर्वक असें विधान करते कीं, औषधोपचार आणि सार्वजनिक आरोग्य यांचें खातें हिंदी लोकांच्या हातीं दिल्यास तें खालावल्याशिवाय राहणार नाहीं; आणि तिसरा, तिला वाटतें कीं, हिंदुस्थानचे लोक इतके अडाणी आहेत कीं, रोगोत्पादक राहणीची त्यांना संवयच पडून गेली आहे, आणि ते स्वतःच आपल्यावर रोग वगैरे ओढून आणितात. यांतल्या तिसऱ्या मुद्याचा विशेष समाचार घेण्याची आमची इच्छा आहे; परंतु तो पहिल्या दोहोंचा विचार केल्यानंतर. हिंदू वैद्यकाची मिस मेयोनें उडविलेली टर तिच्या इतर करामतीला शोभेशीच आहे. परंतु वाचकांना कदाचित् ती खरेंच विचारपूर्वक म्हणत असेल असें वाटण्याचा संभव आहे, म्हणून त्याबद्दल थोडेंसें विवेचन करणें अस्थानीं होणार नाहीं.

हिंदु वैद्यकाची प्रगति प्राचीन कालीं फार उच्च कोटीला जाऊन पोंचली होती हें सर्व विद्वान् कबूल करतात. वाद आहे तो एवढ्याबद्दल कीं, ग्रीक लोकांनीं आपलें वैद्यक ( किंवा त्यांतील कांहीं भाग ) हिंदू लोकांपासून (मिसर देशाच्या उपाध्याय वर्गामार्फत ) घेतलें, किंवा हिंदू लोकांचें चरक ग्रंथांत ( इ. स. १ लें शतक ) आणि सुश्रुत ग्रंथांत ( इ. स. २ रें शतक ) व्यक्त झालेलें वैद्यकीय आणि शस्त्रक्रियेचें उच्च प्रतीचें ज्ञान त्यांना अलेक्झॅण्डरच्या स्वारीनंतर पाश्चात्य संस्कृतीशीं आलेल्या संसर्गामुळें प्राप्त झालें ? ' आशिया खंडांतील वैद्यकाचा इतिहास ' या

ग्रंथाचे कर्ते मि. वाइज्, आणि एन्सायक्लोपीडिआ ब्रिटानिका (ब्रिटिश ज्ञानकोश) मधील 'शस्त्रक्रिया' या विषयावरील निबंधलेखक, ह्या दोन्ही विद्वानांचें मत असें आहे कीं, 'ग्रीक लोकांनीं हिंदु वैद्यक घेतलें जाणें अधिक संभवनीय दिसतें.'

सदरहू ज्ञानकोशांतल्या त्या निबंधांत प्राचीन काळीं हिंदु लोकांच्या वैद्यकाची आणि शस्त्रक्रियेची केवढी प्रगति झाली होती हें विस्तरशः वर्णिलेलें आहे. त्यावरून स्पष्ट दिसतें कीं, हिंदु लोक पाश्चात्यांनीं अगदीं काल लावलेल्या शोधांच्याहि जवळ जवळ येऊन पोंचले होते। प्रोफेसर विल्सन् देखील म्हणतात कीं, "ज्या ज्या देशांच्या ज्ञानसंपत्तीची माहिती लिहून ठेवलेली आढळते, त्या कोणत्याहि देशांतल्या लोकांइतकीच हिंदु लोकांनींहि वैद्यकांत आणि शस्त्रक्रियेंत पारंगतता संपादन केली होती." प्रोफेसर मॅक्डोनेल आपल्या 'संस्कृत वाङ्मयाचा इतिहास' या ग्रंथांत सांगतात कीं, "अर्वाचीन काळीं युरोपियन् शस्त्रक्रियेंतील कृत्रिम नाकें बनविण्याची रीत ही हिंदुस्थानांतून घेतलेली आहे; तेथें ती इंग्रज लोकांस गेल्या शतकांत माहीत झाली."

दुसरीहि एक सर्वविश्रुत अशी गोष्ट आहे कीं, जगांत पहिल्यानें कोणीं हॉस्पिटलें स्थापिलीं असतील तर तीं हिंदूंनीं. अशोकाच्या काळीं ( ख्रिस्तपूर्व ३ रें शतक ) हिंदुस्थानांत हॉस्पिटलें होतीं, पण "युरोपांत पहिलें हॉस्पिटल इ० स० च्या १० व्या शतकांत स्थापन झालें" असें सर व्हिन्सेंट स्मिथ ह्यांचें मत आहे.

मद्रासमध्यें १९०५ सालीं प्रतिबंधक औषधाची किंग इन्स्टिट्यूट नामक संस्था उघडतांना गव्हर्नर लॉर्ड अॅम्प्थिल यांनीं आपल्या भाषणांत सांगितलें, "अलीकडे आतां आपणास कळून येऊं लागलें आहे कीं, हिंदु शास्त्रांत सुद्धां, तात्विक शुद्धतेच्या दृष्टीनें इतरांहून कांहीं कमी नाहीं असा आरोग्यविषयक नियमसंग्रह असून, महान् स्मृतिकार मनु हा आजवर जगांत झालेल्या मोठ्यांत मोठ्या समाजसुधारकांपैकीं एक होऊन गेला."

त्याच भाषणांत लॉर्ड अॅम्प्थिल यांनीं कर्नल किंग यांचा आधार देऊन सांगितलें कीं "प्राचीन हिंदु लोक गाईच्या शरीरांतून देवीची लस घेऊन देवी टोंचीत असत; यावरून उघड आहे कीं, जेन्नरचा मोठा शोध प्राचीन हिंदु लोकांनीं अगो-दरच माहिती होता." दुसरा एक कर्नल किंग यांच्या मतें लॉर्ड अॅम्प्थिलनीं सांगितलें कीं, "अलीकडची प्लेगमधली घर सोडून जाण्याची आणि जंतु मारून घर शुद्ध करण्याची पद्धत, प्राचीन हिंदु शास्त्रांत सांगितलेल्या पद्धतीहून कांहीं सुद्धां निराळी नाहीं."

यावरून उघड आहे कीं, प्राचीन किंवा अर्वाचीन हिंदु वैद्यक मिस् मेयोनें उडविलेल्या चेष्टेला मुळींच पात्र नसून त्यांत फक्त मिस् मेयोचेंच काय तें अज्ञान व्यक्त होत आहे ! हिंदु वैद्यकाची याहून प्रगति झाली नसेल तर त्याचें कारण परकी राज्य हें होय. आयुर्वेदिक पद्धतीला खालीं खेंचून तिला कोणी विचारूं नये अशी तिची दशा करून टाकण्यांत आली आहे. त्या पद्धतींत स्वतःचे कांहीं विशेष असे गुण आहेत, आणि तज्ज्ञांच्या मताप्रमाणें, ते कधीं कधीं पाश्चात्य वैद्यकाचे भरीस चांगले उपयोगी पडतात.

मिस् मेयो म्हणते कीं, सार्वजनिक आरोग्याचें कार्य आज हिंदी लोकांच्या ताब्यांत दिलें आहे त्या परिस्थितींत तें अगदीं लंगडें पडलेलें आहे. हें तो निव्वळ लबाड बोलते आहे. गोऱ्या लोकांचें हिंदुस्थानवर कायमचें वर्चस्व असावें या मताकडे जगाला वळवून घेण्यासाठीं ही जी तिनें मोहीम काढिली आहे, तिचाच तो एक भाग आहे. तिनें मोठी खटपट करून हिंदुस्थानच्या आरोग्यविषयक परिस्थितीचें जें अगदीं लांबलचक वर्णन दिलें आहे तें ती परिस्थिति सुधारावी या सदिच्छेनें नसून, तिच्या मनांत लोकांना असें दाखवून द्यावयाचें आहे कीं, एकंदर परिस्थिति इतकी वाईट आहे कीं, ( मिस् मेयोचे देवदूत ) ब्रिटिश अधिकारी जर काढून टाकले किंवा हिंदी प्रधानांवर जबाबदारी सोंपवून त्यांना त्यांच्या हाताखालीं ठेवलें, तर हिंदुस्थान आणि तेथील जनता यांजवर आकाशाची कुऱ्हाडच कोसळल्यासारखें होणार आहे !

वस्तुस्थिति अशी आहे कीं, सार्वजनिक आरोग्याचें कार्य हिंदी लोकांच्या ताब्यांत दिल्यापासून मुळींच बिघडलेलें नाहीं. कायदेमंडळांत असलेल्या जनतेच्या प्रतिनिधींकडून सार्वजनिक आरोग्याप्रीत्यर्थ याहून अधिक खर्च करा अशी एकसारखी मागणी चालू असते, आणि ती मान्य करावयास प्रधानाचीहि नेहमीं तयारी असते. परंतु सरकारच्या ( प्रांतिक कायदेमंडळांतील ) राखीव बाजूकडून त्याचे हात आंखडले जातात; कारण पैशाची पिशवी पडली त्या भागाच्या हातांत ! राखीव बाजू मोठ्यांत मोठा वांटा स्वतःसाठीं ठेवते, आणि प्रधानांच्या ताब्यांतल्या सोंपीव खात्यांना खर्चास पुरेसा पैसा मिळत नाहीं.

अर्थात् हिंदी लोकांच्या ताब्यांत गेल्यापासून सार्वजनिक आरोग्याचें कार्य लंगडें न पडतां, उलट जनतेचें सारखें टुमणें मागें लागल्यामुळें त्याचें पुढेंच पाऊल पडत आहे. हिंदी लोकांचा ताबा वाढत चालल्यामुळें, ब्रिटिश अधिकाऱ्यांना

काढून टाकलें जाईल ही भीति उगाच आहे. सार्वजनिक आरोग्याच्या खात्यांत लागणारे नोकर तज्ज्ञ असावे लागतात, आणि असली आणखी पुष्कळ तज्ज्ञ मंडळी हिंदुस्थानाला इंग्लंडहून आणावी लागेल. त्यांना आपलें काम उत्तम रीतीनें करावयास जरूर लागणारे तेवढे अधिकार दिलेले असतात; परंतु जबाबदार असलेला जो प्रधान त्याच्याच जागीं मी जाऊन बसणार असें जर त्यांच्यापैकीं कोणी म्हटलें तर तें उघडच हास्यास्पद होणार नाहीं काय ? कायदेमंडळाचे निवडून आलेले प्रतिनिधि आपलें कर्तव्य अगदीं चांगलें ओळखून असतात. ते जे कायदेमंडळांत आलेले असतात ते लोकांचें हित करण्यासाठीं आणि तदनुसार प्रधानांकडून काम करवून घेण्यासाठीं. त्यांच्यापेक्षां किंवा प्रधानांपेक्षां, ब्रिटिश अधिकाऱ्याला हिंदी लोकांचें हित कळतें असें मानणें म्हणजे विवेकशून्यतेचा कळस नव्हे काय ?

हिंदी अमलाखालीं सार्वजनिक आरोग्यविषयक कार्याचें पुढेंच पाऊल पडत चाललें आहे. या आमच्या विधानास आणखी पुरावा पाहिजे असेल तर तो नुकत्याच हिंदुस्थानांतून येऊन गेलेल्या लीग ऑफ नेशन्सच्या सार्वजनिक आरोग्यविषयक प्रतिनिधींचा होय. या प्रतिनिधींनीं "सार्वजनिक आरोग्यविषयक कार्यांत आणि पद्धतींत गेल्या सहा वर्षांत हिंदुस्थानभर झालेली विलक्षण प्रगति पाहून समाधान व्यक्त केलें. **ही प्रगति सुधारणेच्या कायद्यामुळें आणि सार्वजनिक आरोग्य हा प्रांतिक विषय केल्यामुळें झाली, असें त्या सगळ्यांचें मत पडलें."** ( टाइम्स ऑफ् इंडिया फेब्रुआरी १५ सन १९२८ ).

आतां आपण मिस् मेयोच्या टीकेंतील तिसऱ्या आणि शेवटच्या भागाकडे वळूं. मिस् मेयो हिंदुस्थानांत सर्वत्र पसरलेल्या रोगराईचें खापर लोकांच्याच माथ्यावर फोडते—म्हणजे लोक अडाणी, आणि त्यांच्या संवयी घाणेरड्या, त्याचा हा सर्व परिणाम, असें तिचें म्हणणें. आपण सार्वजनिक आरोग्याचा पाश्चात्य देशांतला इतिहास जर पाहिला तर आपणास सर्वत्र हेंच आढळून येईल कीं, गेल्या एक शतकापूर्वीपर्यंत तिकडच्या प्रत्येक देशांतल्या लोकांची राहणी हिंदुस्थानच्या लोकांची आज आहे तितकीच किंबहुना त्याहूनहि घाणेरडी असे. येथल्या इतकेच तिकडील लोकहि सार्वजनिक आरोग्यविषयासंबंधानें अडाणी आणि खुळ्या समजुती बाळगणारे होते.

असें असतां पाश्चात्य देश पुढारले, आणि हिंदुस्थानच तेवढें कां मागें पडलें ? याचें कारण या दोन सरकारांत असलेला भेद. पाश्चात्य देशांतील सरकार

पाण्यासारखा पैसा खर्च करून रोगबीज निर्मूल करून टाकतात, वैद्यकीय शोध लावितात, आणि लोकांना आरोग्याचें आणि शुद्ध राहणीचें शिक्षण देतात. हिंदुस्थान सरकारनें औषधपाण्याकडे आणि सार्वजनिक आरोग्याकडे विशेषसें लक्षच दिलें नाहीं. त्याचें मुख्य काम म्हणजे हिंदुस्थानशीं ब्रिटिश व्यापार वाढविण्याच्या अधिकाधिक सोयी पाहणें, आणि ब्रिटिश लोकांना इकडे नोकऱ्या तयार करणें; तेवढेंच तें करीत राहिलें.

अशा या गोष्टी असतांना मिस् मेयो उलटेंच म्हणते कीं, रोगराई पसरण्याचें कारण *लोकांच्या घाणेरड्या संवयी आणि त्यांचा अडाणीपणा !* लोक अडाणी, आणि त्यांची राहणी घाणेरडी, हा प्रकार हिंदुस्थानांतच आहे असें नसून सगळ्याच देशांत आहे. हा अडाणीपणा पद्धतशीर सतत हल्ला चालू ठेवून काढून टाकणें हें काम सरकारचें आहे. हिंदुस्थान सरकारनें तें केलें नाहीं. त्यानें फक्त प्रगतीचा वरवरचा देखावा राखण्याचें तेवढें काम केलें !

आमच्या म्हणण्याच्या सिद्ध्यर्थ, आपण प्रथम इंग्लंडची अलीकडील शतकांतील सार्वजनिक आरोग्यवृद्धी कसकशी होत आली आहे तें पाहूं. येल् येथील वैद्यक शाळेंतील सार्वजनिक आरोग्याचे प्रोफेसर डॉ. विन्स्लो, यांनी आपल्या 'आधुनिक सार्वजनिक आरोग्याच्या चळवळीची वाढ आणि महत्व' या पुस्तकांत इंग्लंड आणि युनायटेड स्टेट्स् मधील अलीकडच्या शतकांतील आरोग्यविषयक परिस्थितीचा चांगला मनोरंजक इतिहास दिला आहे. तो सगळा इतिहास येथें उतरून घेण्याचें कारण नाहीं. आपण कांहीं विशिष्ट कालविभाग घेऊन मुख्य मुख्य मुद्दे पाहूं. प्रथम आपण १६ वें शतक घेऊं. एरॅस्मस्नें कार्डिनल् वूल्सीचा वैद्य डॉ. फॅन्सिस् यास लिहिलेल्या एका सुप्रसिद्ध पत्रांत सोळाव्या शतकांतील इंग्रज कुटुंबांतली स्थिति पुढें दिल्याप्रमाणें वर्णिली आहे:—

"घरांतली जमीन मातीची आणि त्यावर पाणथळ जागेंतले लव्हाळे पसरून तयार केलेली असते. हे लव्हाळे कधींमधींच हालवीत असतील तर, एरवीं खालचा थर कधीकधीं वीस वीस वर्षे जशाचा तसा असतो, आणि त्यांत उलटी, कुत्र्या माणसांची लघवी, बीर दारू, मासाचे तुकडे, आणि नांवसुद्धां घेऊं नये अशली इतर घाण सांचलेली आढळते."

पाणी जाण्याच्या मार्गांतून तर मेलेली कुत्री वाहत जात असल्याचें पोप कवीनें हनिआंड् काव्यांत लिहून ठेवलें आहे.

यानंतर एक शतक झाल्यावरहि, डॉ. विन्स्लो म्हणतात, फारशी कांहीं सुधारणा झाली नाहीं. १८४२ सालीं पुअर लॉ कमिशनर्सनीं 'इंग्लंडच्या मजूरवर्गाची आरोग्यविषयक स्थिति' पाहून केलेल्या रिपोर्टांत पुढील गोष्टी नमूद केल्या होत्याः—

"मोड्बरी नांवाच्या खेड्यांत गरीब लोकांचीं बरीचशीं घरें अरुंद अंगणासभोंवतीं बांधलेली असून मुख्य रस्त्यावर बाहेर पडावयास एका अगदीं अरुंद, वर आच्छादन असलेल्या, मार्गाशिवाय दुसरें कांहीं नसतें. या अंगणांत अनेकांची राहटी असून, प्रत्येकाचा एक एक ढीग जमलेला असतो. कित्येक ठिकाणीं अंगणांत हे ढीग निरनिराळे केलेले असतात, आणि मध्यभागीं सर्वांची मिळून घाणेरडें पाणी सांचण्याकरितां जागा असते. दुसऱ्या कांहीं ठिकाणीं, सगळ्यांच्या मिळून उपयोगाकरितां मधोमध एक खड्डा खणलेला असतो. कित्येक ठिकाणीं सगळें अंगणचें अंगण अगदीं थेट दरवाजापर्यंत घाणीनें भरून गेलेलें आढळतें. ह्या घाणीभोंवतीं त्या लोकांच्या झोपड्या असतात. त्यांना मागच्या बाजूस दरवाजा, खिडकी, किंवा दुसरें कांहींहि उजेड हवा येण्याचें साधन नसतें. झोपड्यांच्या खिडक्या आणि दरवाजे त्या घाणीच्या बाजूस उघडतात. या खिडक्यांतून आणि दरवाजांतूनच काय ती आंत राहणाऱ्या लोकांस हवा मिळावयाची. मला असें कळलें कीं, ह्या लोकांना वारंवार ताप येतो, आणि कोणत्याहि सांथीचा पहिला धक्का या लोकांना बसतो."

हें सर्व वर्णन मिस् मेयोच्या पुस्तकाच्या 'जगाचा काळ' या २७ व्या प्रकरणांतील आरंभींच्या परिच्छेदाचें अगदीं हुबेहुब शाब्दिक रूपांतर आहे! परंतु तेव्हां १८४२ सालीं, इंग्लंडची आरोग्यविषयक परिस्थिति 'जगाचा काळ' आहे असें म्हणावयास, एखादी मिस् मेयो निर्माण झाली नव्हती!

आतां त्याहून जरा अलीकडच्या काळांत येऊं. १८५८।९ च्या उन्हाळ्यांत टेम्स नदीला इतकी घाण येत होती कीं—"अगदीं एक ऐतिहासिक चिरस्मरणीय गोष्ट म्हणून स्मरणांत राहण्यासारखी! पार्लमेंटच्या खोल्यांत कित्येक आठवडेपर्यंत नुसती बसावयाची सोय नव्हती! खिडक्यांवर अनेक तऱ्हेचीं जंतुनिवारक औषधें ओतलेले पडदे सोडावे लागत!" "देशीं परदेशीं, ही टेम्स नदीची दशा म्हणजे एक राष्ट्रीय शरमेची गोष्ट होऊन बसली होती! एका सुप्रसिद्ध परकीय लेखकानें राष्ट्रीय अधोगतीची हद्द म्हणून ह्या दोन गोष्टी जोडून इंग्लंडचें पुढील प्रमाणें वर्णन केलें होतें—'बाहेर हिंदुस्थानांत बंड, आणि घरीं टेम्स नदीस घाण!'"

न्यू यॉर्क शहरासंबंधानें १८६५ साली पुढील प्रमाणें रिपोर्ट करण्यांत आला होताः—" घरांतला केरकचरा आणि हरतऱ्हेची घाण रस्त्यांत फेंकण्यांत येते, ती रस्त्याच्या पृष्ठभागावर राहते, गटारांत भरून जाते, गाळ नेणारे नळ बुजवून टाकते, त्यामुळें सतत एकसारखी दुर्गंधी सुटते, आणि या दुर्गंधीमुळें मग अवश्य-मेव सांथीचे रोग उद्भवतात. हिंवाळ्यांत ही घाण रस्त्यावर कधीं कधीं दोन दोन तीन तीन फूट सांचते."

इतकें हें बाहेर आल्यावर आतां मिस् मेयोला सांगावयास तोंडच शिल्लक राहत नाहीं कीं, पाश्चात्य सामान्य जनतेची वैयक्तिक राहणी हिंदुस्थानच्या सर्व-साधारण जनतेहून कांहीं विशेष उच्च दर्जाची आहे म्हणून !

काउन्ट टॉल्स्टॉयनीं आपल्या "काय करावें ?" या पुस्तकांत मॉस्को शहरां-तल्या गरीब लोकांची भयंकर दुर्दशा वर्णिली आहे. नेक नामदार चार्लस बूथ यांचाहि एक "लंडनमधील जीवित आणि मजूरवर्ग" या नांवाचा चौदा पुस्त-कांचा एक ग्रंथ आहे, त्यांत दुर्दशेच्या इतक्या भयंकर गोष्टी नमूद केल्या आहेत कीं, त्यांचा विचार करणें देखील अनीतिकारक होय. मि. अप्टन् सिंक्लेअर वगैरे गृहस्थांनींहि आम्हांला पाश्चात्य सुधारणेच्या पोटांत काय चाललें आहे तें दाख-वून दिलें आहे. अशी ही हिंदुस्थानच्या परिस्थितीशीं तुलना करतां येईल अशा तऱ्हेची घाण खुद्द इंग्लंडमध्यें असल्यावर आतां इंग्लंडला 'जगाचा काळ' म्हणा-वयास काय हरकत आहे ? खरें पाहिल्यास, मिस् मेयो स्वतःच्या देशांत अस-लेल्या तशाच परिस्थितीकडे दुर्लक्ष करून, हिंदुस्थानांतल्या परिस्थितीकडे मात्र बोट दाखविते; तेव्हां उलट आम्हीच तिला वास्तविक सांगावयाचें कीं, 'वैद्यराज, प्रथम तुम्हीं आधीं निरोगी बना' ! परंतु आरोग्याचें महत्त्व कमी करण्याचा किंवा लोकांच्या घाणेरड्या संवयीचें समर्थन करण्याचा आमचा हेतु नाहीं. आमचा आग्रह तो एवढाच कीं, पाश्चात्यांनींही एक गोष्ट ओळखून असावें कीं, पाश्चात्य देशांतल्या सर्वसाधारण लोकांच्या वैयक्तिक संवयी हिंदुस्थानांतल्या सर्वसाधारण लोकांच्या संवयीहून फारशा निराळ्या नाहींत. आणि पाश्चात्य देशांतली स्थिति जर सुधारली असेल तर ती सरकारनें अलीकडे सार्वजनिक आरोग्याप्रीत्यर्थ अलोट पैसा खर्च केला आहे म्हणूनच. हिंदुस्थानांत आम्ही याच्या दुसऱ्या टोंकाला गेलों आहों; या ठिकाणीं सरकारी वसुलाचा केवढा तरी मोठा भाग सैन्याच्या खर्चा-करितां जाऊन, राष्ट्रपोषक खात्यांना अगदीं अपुरी रकम राहते, आणि सार्वजनिक आरोग्याकरितां तर अगदींच अल्पांश मिळतो.

---

## प्रकरण १७ वें.

# दोष कोणाचा ?



सार्वजनिक आरोग्यविषयक प्रश्नांचा अभ्यास करणाऱ्या प्रत्येक इसमास असेंच दिसून येईल कीं, खुद्द इंग्लंडमध्यें १८६० च्या सुमारास ' राष्ट्रीय शिक्षणाचा लढा ' जिकण्यांत आला, तसेंच लोकांना सार्वजनिक आरोग्याचें शिक्षण देऊन शुद्ध राहणीच्या सगळ्या सोयी करून देण्याकरितां १८७५ साली सरकारकडून एक स्वतंत्र सार्वजनिक आरोग्यखातें निर्माण करण्यांत आलें, त्यानंतरच कुठें खरी सुधारणा हळुहळु होऊं लागली.

अशा तऱ्हेची खरीखुरी आरोग्यविषयक चळवळ हिंदुस्थानांत करण्याची हिंदुस्थान सरकारनें कधीं खटपट केली आहे काय ? १९१४ मे च्या २३ तारखेस हिंदुस्थान सरकारनें आरोग्यविषयक कार्यक्रमासंबंधानें एक ठराव काढला आहे त्यावरून पाहतां " हिंदुस्थानांत शास्त्रशुद्ध आरोग्यविषयक पद्धति गेल्या शतकाच्या अखेरीस सुरू झाली"; तरी पण त्यासंबंधानें स्वतंत्र असें खातें १९१० पर्यंत कांहीं निर्माण झालें नाहीं. हें खातें देखील नांवालाच. त्याचें काम नोंद करून आंकडे जमविण्यापलीकडे कांहीं नाहीं. लोकांत आरोग्यविषयक चळवळ करावयास किंवा आरोग्यविषयक ज्ञान पसरावयास त्याजपाशीं पैसा नाहीं. सर्वसाधारण शिक्षणासंबंधानें बोलावयाचें तर, आम्ही मागें एका प्रकरणांत सांगितलेंच आहे कीं, शेंकडा फक्त ८·२ लोकच काय ते साक्षर आहेत, आणि असें असतां अझूनहि सरकारच्या मनांत येत नाहीं कीं, प्रांतिक शिक्षणप्रधानांना जरूर तो पैसा पुरवून निरक्षरता पार नाहींशी करून टाकावी !

जनतेच्या आरोग्यासाठीं सरकार ग्रेट ब्रिटन्‌मध्यें किती पैसा खर्च करतें आणि हिंदुस्थानांत किती करतें याची आतां आंकडे मांडून तुलना करूं. १९२६–२७ साली युनायटेड् किंग्डम्‌च्या बजेटांत सार्वजनिक आरोग्यखातीं ३६ लाख पौंड म्हणजे आजच्या हुंडणावळीच्या दरानें जवळ जवळ ४·७ कोटी रुपये, खर्ची घातले होते. १९२१ च्या खानेसुमारींत ग्रेट ब्रिटन्‌ची लोकसंख्या ४ कोटि ३० लक्ष दिली आहे. अर्थात् ठोकळ मानानें पाहतां, युनायटेड् किंग्डम्‌मधील सरकारनें, दर माणशीं १·०७ रु. सार्वजनिक आरोग्याप्रीत्यर्थ खर्च केले. इकडे हिंदु-

स्यानांत, १९२५–२६ साली प्रांतिक आणि मध्यवर्ती सार्वजनिक आरोग्य-खात्यांत मिळून सरकारनें सुमारें १ कोटि ७५ लक्ष रुपये खर्च केले; या रकमेला २४ कोटि ७० लक्ष या लोकसंख्येच्या आंकड्यानें भागलें म्हणजे दर माणशी सुमारें ०·०७ रुपया पडतो. याच्याशी आतां इंग्लंडच्या १·०७ हा आंकडा ताडून पहावा म्हणजे झालें।

क्षेत्रफळाच्या दृष्टीनें विचार करतां, युनायटेड् किंग्डम्च्या ४·०७ कोटि रुपयांच्या आंकड्यास ८९ हजार चौरस मैल या आंकड्यानें भागलें म्हणजे दर चौरस मैलास ५२२ रु. पडतात. हिंदुस्थानांत ब्रिटिश मुलखाचें क्षेत्रफळ ११ लक्ष चौरस मैल आहे, तेव्हां दर चौरस मैलास १६ रु. येतात।

औषधपाण्याची व्यवस्था आपण पाहिली तर आपणास असें दिसतें कीं, हिंदुस्थानांत ६८ हजार लोकांना १ दवाखाना आहे; युनायटेड् किंग्डममध्यें ३ हजारांना १ दवाखाना पडतो.

ही हिंदुस्थानची खरी स्थिति आहे. लोक, इतर देशांत—इंग्लंडांत आणि अमेरिकेंत सुद्धां—जसे कांहीं वर्षांपूर्वी धडाणी होते, तसे हिंदुस्थानांत आहेत. घाणेरड्या संवयी, जशा पाश्चात्य लोकांत होत्या व कित्येकांत अद्यापि आहेत, तशा आज हिंदुस्थानच्या लोकांत आहेत. परंतु तिकडे पाश्चात्य देशांत सरकारला जनतेच्या हिताची खरी तळमळ असल्यामुळें त्यानें वाटेल त्या उपायानें सुधारणा करण्याचा निश्चय केला; इकडे आमच्यावर परकी सरकार असल्यामुळें लोकांच्या आरोग्याची काळजी घेतली न जाऊन, त्याचे अनिष्ट परिणाम आम्ही भोगीत बसलों आहों।

जॉन् स्टुअर्ट् मिलच्या पुढील वचनाची सत्यता आम्हांला आज इतर कोणत्याहि विषयांपेक्षां सार्वजनिक आरोग्य आणि औषधपाण्याची मदत या विषयासंबंधानें पटत आहे:—"राष्ट्रांतल्या लोकांनीं आपल्यावर आपण राज्य करावें यांत सत्य आहे, अर्थ आहे; परंतु एका राष्ट्रांतल्या लोकांनीं दुसऱ्या राष्ट्रांतल्या लोकांवर आपलें हित विसरून राज्य करणें, अशी गोष्ट अस्तित्वांत नाहीं आणि येऊं शकणारहि नाहीं. एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राला स्वहितार्थ म्हणजे त्या दुसऱ्या राष्ट्रांत जाऊन स्वतःसाठीं पैसे कमवण्याकरितां आपल्या ताब्यांत ठेवून घेतें; तें दुसरें राष्ट्र पहिल्या राष्ट्रांतील लोकांच्या फायद्याकरितां राखून ठेविलेलें मानवी गुरांचें घरच बनून जातें. अर्थात् एका देशानें दुसऱ्या देशावर केलेलें राज्य हें खरें लोककल्याण दृष्टीनें राज्य नव्हे, व होऊंहि शकणार नाहीं."

सरकारच्या मनांत असेल तर, उदाहरणार्थ, मलेरिया नाहींसा करणें त्याला फारसें जड जाईल काय? खुद्द मिस् मेयोच सांगते कीं, "मलेरिया म्हणजे या देशावरची एक मोठी भयंकर आपत्ति होय. कारण तिनें हजारों लाखों लोक मृत्यु-मुखीं पडतातच, शिवाय बाकीच्यांचीहि शारीरिक आणि सामाजिक स्थिति खालावत जाऊन, त्यामुळें दुसरे अनेक प्रकारचे रोग उद्भवण्यास अवकाश मिळतो."

जेव्हां जेव्हां सरकारला कांहीं लोकहितकारक सुधारणा किंवा कार्य करावयाची निकड लागावी, तेव्हां पैसा नाहीं ही सबब पुढें करण्यांत येते. मुंबईतल्याप्रमाणें सार्वजनिक पैशाचे ४।५ कोटी रुपये बँकबेमध्यें कसलाच कांहीं मोबदला न मिळतां नुसते फेंकून द्यावयास सरकारच्या मनाकडे कांहीं वाटत नाहीं; एवढें हें कर्ज आणि तें फिटेपर्यंत मध्यंतरीं व्याज द्यावयास मुंबई इलाख्यांतल्या लोकांना कराच्या रूपानें दर वर्षी २७ लाख रुपये द्यावे लागत आहेत, आणि पुढें आणखी ६० वर्षे असेच द्यावे लागतील. त्या बॅम्बे डेव्हलपमेंट डिपार्टमेंटमध्यें मुळापासून शेंड्यापर्यंत, आंत बाहेर सगळा ब्रिटिश कारभाराचा अस्सल छाप होता हें त्यांत विशेष! ही एवढी रकम जर त्या इलाख्यांत मलेरिआ मारून टाकण्याकडे लावली असती तर नुसत्या दहा वर्षांतच तो सगळा देशभाग आणि लोकांची आरोग्यविषयक परिस्थिति इतकी पार बदलून गेली असती कीं, ओळखतां येणें कठीण!

आधुनिक वैद्यकशास्त्र शरीर निरोगी बनविण्याला अगदीं अव्वल दर्जाचें महत्व देतें तें बरोबर आहे. इंग्लंडचे प्रमुख डॉक्टर व आरोग्य खात्याचे मुख्य अधिकारी सर जॉर्ज न्यूमन् आपल्या 'प्रतिबंधक वैद्यक' या पुस्तकांत म्हणतातः—"बचावाची पहिली पायरी म्हणजे **निरोगी, धष्टपुष्ट, आणि प्रतिकारक्षम असें मानवी शरीर** होय." ह्याच कारणाकरितां मातृदशा आणि बाळंतपण यांसंबंधाच्या व्यवस्थेकडे अतिशय लक्ष पुरविलें पाहिजे. पहिली गोष्ट म्हणजे मुलें, जन्मतः निरोगी कशीं बनवितां येतील ही.

मागें सांगितलेल्या डॉ. मार्गरेट बाल्फर—मुंबईच्या हाफकिन् इन्स्टिट्यूटमध्यें मातृदशेसंबंधानें संशोधन करीत असलेल्या—टाइम्स ऑफ इंडियामधील (७, ९, १०, फेब्रुआरी) आपल्या लेखमालेंत म्हणतातः—"ज्यांनीं मुंबई शहरांतला बेबी शो पाहिला असेल त्यांची खात्रीच झाली पाहिजे कीं, हिंदी आईबाप—अगदीं गरींपांतल्या गरीब वर्गांचेसुद्धां—निरोगी बाळें निपजवूं शकतात." "असें जर आहे तर" त्या विचारतात, "आपण जितका पैसा, वेळ,

आणि विचार, प्लेग, मलेरिया, इत्यादि रोगांची कारणें शोधून काढण्यांत घालवितों, तितका वालकें जन्मतः अशक्त कां निपजतात याचीं कारणें शोधून काढण्यांतहि लावणें आपलें कर्तव्य नाहीं काय ?"

मातृपद आणि अर्भकशुश्रूषा यांजकडे इंग्लंड व इतर देशांत किती लक्ष दिलें जातें हें सांगून बाल्फरबाई म्हणतातः—"असलें कांहीं एक हिंदुस्थानांत करण्याची खटपट झालेली नाहीं. बाळंतपणांत पुष्कळच स्त्रिया मृत्युमुखीं पडतात, अशा एका अंधुक कल्पनेपलीकडे हिंदुस्थानांत या विषयासंबंधानें कांहींएक माहिती नाहीं." "बाळंतपणांतले हे रोग कसे उत्पन्न होतात एवढयाचीच नव्हे, तर उष्ण कटिबंधांतील हवामानांतल्या आणि उष्ण कटिबंधांतील परिस्थितींतल्या गर्भारपणाच्या संबंध प्रभावाचीच नीट शास्त्रशुद्ध चवकशी केली पाहिजे" असें बाल्फरबाईचें आग्रहपूर्वक सांगणें आहे. डेम् जेनेट कॅम्बेल 'मातृसंगोपन' विषयावरील आपल्या रिपोर्टांत म्हणतात कीं, खुद्द इंग्लंडांत देखील "दर २५० मुलांमागें एक बाळंतीण मृत्यु पावते असें प्रमाण आहे, आणि पुष्कळशा मातांना मागाहून इजा होऊन त्या इजेनें कधीं कधीं त्यांना मोठें कायमचें देखील शारीरिक व्यंग राहण्याचा संभव असतो." अशी ही स्थिति मातृसंगोपन आणि त्यावरील संशोधन यांप्रीत्यर्थ इतका पैसा खर्च केला जात असतांना त्या ठिकाणीं आहे !

हिंदुस्थानांत अशा किती मुलांमागें किती बाळंतिणी मरतात याचें अगदीं अचूक प्रमाण सांगणें कठीण आहे. तें बहुधा इंग्लंडांतल्याहून अधिक असेल, किंवा कमीहि असेल, कारण विश्वसनीय आंकडे उपलब्ध नाहींत. हा अनिश्चितपण असावयास एक महत्वाचें कारण आहे. पाश्चात्य राहणी बेसुमार कृत्रिम झालेली आहे, परंतु हिंदुस्थानांत अद्यापि निसर्गदत्त परिस्थिति चालू आहे, पाश्चात्य स्त्रीला बाळंतपण म्हटलें कीं एकदम धडकी भरते ! तशी हिंदी स्त्रियांना भरत नाहीं. मि. बर्नार्ड मॅकफॅडेन् आपल्या 'फिजिकल कल्चर' मासिकाच्या गेल्या डिसेंबरच्या अंकांत लिहितात कीं, अमेरिकन् रेड क्रॉस सोसायटीनें अलीकडे असें प्रसिद्ध केलें आहे कीं, सर्व सुधारलेल्या देशांत, अमेरिकेंतच बाळंतिणींच्या मृत्यूचें प्रमाण अधिक आहे.

असो. हें थोडेंसें विषयांतर झालें. परंतु मुद्दा असा कीं, हिंदुस्थानसरकारनें मातृसंगोपन—संशोधनकार्यासाठीं पुष्कळ पैसा खर्च करून, शोध लागेल त्याप्रमाणें मग पुढें मार्ग आंखला पाहिजे. शिवाय, मिस बाल्फर यांनीं टाइम्स ऑफ इंडियांतील लेखमालेंत सांगितल्याप्रमाणें, "इन्स्पेक्टर सुइणी नेमणें आव-

श्यक आहे; त्यांचा उपयोग अडाणी दायांमध्यें आपल्या कामाचें शिक्षण घेणें जरूर आहे याची जाणीव उत्पन्न करण्याकडे, आणि शिकलेल्या सुइणींना चोख काम करणें किती महत्वाचें आहे याची जाणीव करून देण्याकडे, होईल."

इंग्लंडमधील बाळंतिणींच्या मृत्युसंख्येच्या मोठ्या प्रमाणासंबंधानें सर जॉर्ज न्यूमन् आपल्या 'प्रतिबंधक वैद्यकांत' म्हणतातः—"ह्या परिस्थितीचा विचार केला असतां खात्री होते कीं, ह्या मातृपदविषयांत सरकारनें जरूर लक्ष घातलें पाहिजे.........परंतु प्रत्येक बाळंतिणीची, बाळंत होण्यापूर्वी, बाळंत होत असतां, आणि बाळंत झाल्यानंतर, योग्य पुरती शुश्रूषा व्हावी अशी व्यवस्था होण्याकरितां अद्याप पुष्कळ गोष्टी झाल्या पाहिजे आहेत." अशी ही जर इंग्लंडांतल्या लोकांना जरूर वाटते तर हिंदी बाळंतिणींना केवढी जरूर वाटावी बरें ! कारण त्यांच्या आरोग्याकडे तर सरकारनें आजवर फारसें मुळींच लक्ष दिलेलें नाहीं !

रोगप्रतीकाराची दुसरी पायरी, म्हणजे मातृसंगोपन आणि बालशुश्रूषा यांच्या पुढची पायरी, मुलांची काळजी होय. सर जॉर्ज न्यूमन् आपल्या 'प्रतिबंधक वैद्यका'च्या पृ० ६८ वर म्हणतातः—" आपल्या राष्ट्रास जर पुढें मजबूद आणि जोमदार माणसें पाहिजे असतील तर मूळांतच आपणास अधिक मुलें, आणि त्यांतहि अधिक निरोगी मुलें, मिळालीं पाहिजेत." सत्तराव्या पृष्ठावर ते आणखी म्हणतात, " १८ पासून ५८ व्या वयापर्यंत येणाऱ्या पुष्कळशा रोगराईचें आणि अपमृत्यूचें पहिलें कारण आपण त्या रोगबीजाची लहानपणीं हयगय करतों; दुसरें कारण, त्या वयांत आपण आरोग्यावह राहणीचें बीज पेरीत नाहीं—म्हणजे शुद्ध हवा, व्यायाम, ऊबदारपणा, शरीराचें पोषण, स्वच्छता, संयमी, हीं जीं आरोग्याचीं मूलतत्वें, तीं अवश्यमेव सांभाळण्याची खबरदारी घेत नाहीं. बालपण हाच, रोगाला प्रतिबंध करण्याचा, रोग उद्भवला नाहीं तोंच त्यास खर्ची करून टाकण्याचा, आणि निरोगी राहणीचें शिक्षण घेण्याचा, काल होय."

याच कारणाकरितां, शाळेंत जाणाऱ्या मुलांची वैद्यकीय तपासणी, हें एक सार्वजनिक आरोग्यविषयक कार्याचें अतिशय महत्वाचें अंग आहे. इंग्लंडांत शाला-वैद्यक खातें १९०७ त सुरू करून त्याचा १९१८ च्या शिक्षण कायद्यानें विस्तार करण्यांत आला. हिंदुस्थानांत शाळेंतल्या मुलांची तपासणी जवळ जवळ नाहींच म्हटल्यास चालेल. सबंध हिंदुस्थानांत एकट्या मुंबई म्युनिसिपालिटीनेंच काय ती आपल्या चतुःसीमेंतल्या शाळांत मुलांची वैद्यकीय तपासणी सुरू केली आहे. परंतु ती अद्याप सुरवातच आहे. तरीदेखील, मुंबई म्युनिसिपालिटीच्या

मेडिकल इन्पेक्टरांच्या १९२४–२५ सालच्या पंचवार्षिक रिपोर्टांवरून पाहतां, शाळेंतल्या मुलांच्या आरोग्यांत निःसंशय बरीच सुधारणा घडून आलेली आहे.

मुंबई म्युनिसिपालिटीहून वास्तविक प्रांतिक आणि मध्यवर्ती सरकारांनीं जास्त प्रगतिपर वृत्ति दाखवावयाची होती! परंतु शाळेंतल्या मुलांच्या वैद्यकीय तपासणीकडे ह्या सरकारांनीं मुळींच लक्ष दिलेलें नाहीं, एवढेंच नव्हे, तर हा प्रश्न त्यांच्या नजरेच्या टप्प्यांतहि आलेला नाहींसें दिसतें. आणि हा त्यांचा अत्यंत दोषार्ह असा हलगर्जीपणा चालू असतां, मिस् मेयो उलट लोकांवरच हल्ला करीत सुटली आहे!

हिंदी जनता पाश्चात्य जनतेहून रोगाला अधिक सुलभतेनें बळी पडते याचें एक कारण तिचें दारिद्र्य होय. हिंदी माणूस अर्धपोटीं असलेला जीव आहे. त्याला जरूर तितकें अन्न मिळत नाहीं. डॉ. विल्यम हंटर यांनीं कांहीं वर्षांमागें एका व्याख्यानांत सांगितलें होतें कीं, हिंदुस्थानांत अर्ध्यांहून अधिक लोक एकभुक्त राहतात. दारिद्र्याचीं कारणें काय याची चर्चा करण्याचें आम्हांला कारण नाहीं. जबाबदार हिंदी गृहस्थांचें असें मत आहे कीं, हिंदी लोकांचें हें दारिद्र्य परकीय सत्तेमुळें आहे, निदान परकीय सत्तेच्या कित्येक अपरिहार्य परिणामांमुळें तें जास्त असह्य झालेलें आहे. कांहींहि कारण असो, दारिद्र्यामुळें पुरेसें अन्न न मिळणें हें रोगराईच्या अनेक कारणांपैकीं एक कारण आहे, इतकें येथें सांगितलें म्हणजे पुरे आहे.

ह्या दारिद्र्यामुळेंच बऱ्याचशा हिंदी लोकांना, विशेषतः खालच्या वर्गांतल्या अतिशय गरीब लोकांना, रोगट जागेंत रहावें लागतें, मग ते सहजच एखाद्या रोगाला किंवा एखाद्या सांथीला बळी पडतात! गलिच्छ, गिचकार व अपुऱ्या जागेंत राहिल्यानें काय परिणाम होणार नाहींत? प्रसिद्ध इंग्रज लेखक मिस्टर ए. जी. गार्डिनर यांनीं "जॉन बुल" नामक पत्रामध्यें लिहिलेल्या एका लेखांत म्हटलेलें आहे कीं, स्वतःच्या वाढलेल्या मुलीवर बलात्कार केल्याचा आरोपावरून कोर्टापुढें शिक्षेकरितां आणलेल्या बापांची संख्या इंग्लंडमध्यें फार दिसते; त्याचें कारण दुसरें कांहीं नसून हेंच कीं राहण्यास त्यांना पुरेशी जागा मिळत नाहीं; एकाच लहानशा खोलींत पुष्कळ लोकांना एकत्र रहावें लागतें, व एकाच बिछान्यावर मुलगी, बाप, आई अशा तीन तीन चार चार माणसांना निजावें लागतें.

*ह्या दारिद्र्यामुळेंच गरीब लोकांना खासगी दवाखान्यांतल्या औषधोपचाराचा फायदा घेतां येत नाहीं: डॉक्टरला घरीं बोलवावयाचें तर त्याची फी इतकी मोठी असते कीं, बिचाऱ्या सामान्य खेडेगांवतल्या माणसाला ती देण्याचें*

सामर्थ्य नसतें. अर्थात् अगदीं शिकस्त झाली तरच तो डॉक्टरकडे जाण्याचा हिय्या धरतो. औषधाची दर दिवसाची किंमतहि त्याच्या अजमतीबाहेर असते.

परंतु अशी ही कठीण परिस्थिति असतांना देखील, अगदीं दूर आंतल्या गांवांतहि उघडलेले खासगी किंवा सरकारी दवाखाने, रोगी येत नाहींत म्हणून बंद करावयाची कधींहि पाळी आलेली नाहीं. याबद्दल अनेक डॉक्टरांनीं पुरावा दिलेला आहे. एकानें तर असें खात्रीलायक सांगितलें कीं, लोक आपल्या त्या भागांत कोण कधीं दवाखाना उघडतो याची अगदीं वाट पाहत असतात. यावरून स्पष्ट आहे कीं, लोकांना—म्हणजे अगदीं मागासलेल्या लोकांना सुद्धां—मिस् मेयो सुचवीत आहे तसा पाश्चात्य औषधाबद्दल हाडींमासीं खिळून गेलेला वीट आहे असें तर नाहींच, पण असले दवाखाने खेड्यांत मिळत नाहींत एवढ्याच मुळें केवळ ते अन्य मार्ग आणि जुन्या पद्धति पाहूं लागतात. याचा अर्थ एवढाच कीं, 'गरीब रयतेच्या हिताच्या' गप्पा मारणाऱ्या सरकारनें त्यांच्या औषधोपचाराची फारशी सोय मात्र करून ठेवलेली नाहीं!

हिंदुस्थानच्या शीलास काळिमा आणण्याकरितां मिस मेयोनें असें विधान केलें आहे कीं, हिंदुस्थानांत इंद्रियरोगाचा फार प्रसार आहे; ह्याला तिचा आधार म्हणजे हिंदुस्थानांतल्या हॉस्पिटलांवरच्या एक दोन ब्रिटिश डॉक्टरांनीं सहज बोलतांना सांगितलेली गोष्ट! वास्तविक इंद्रियरोग हा पाश्चात्य पद्धतीच्या सुधारणेचा एक रोग असून, त्याचा हिंदुस्थानांत फारसा प्रादुर्भाव नाहीं असें अनेक ब्रिटिश डॉक्टरांनीं शेंकडों वेळां सांगितलें आहे. तो रोग सर्वथैव पाश्चात्य आहे, आणि मिस मेयोच्या या विधानासंबंधानें बोलतांना एका ब्रिटिश वैद्यकीय अधिकाऱ्यानें सांगितलें आहे कीं, पाश्चात्य देशांत साधारणतः पांचांत चार माणसांना एक ना एक प्रकारचा गुप्त रोग असतो, परंतु हिंदुस्थानांत शेंकडा एकालाहि तो आढळत नाहीं. त्यांच्या मतें याचें एक कारण म्हणजे हिंदू लोकांची शारीरिक स्वच्छता हें होय, ही स्वच्छता त्यांस त्यांच्या धर्मानेंच लावून दिलेली आहे.

या ठिकाणीं हिंदु लोकांच्या शारीरिक स्वच्छतेसंबंधानें चार शब्द सांगणें अवास्तव होणार नाहीं. पाश्चात्यांना शुचिर्भूतता ही परमार्थाच्या खालची, पण हिंदूला ती परमार्थाचेंच एक अंग वाटते. युरोपियन लोकांना हिंदुस्थानांत दररोज स्नान करावयास आणि दांत घांसावयास हिंदूंनीं शिकविलें आहे. हिंदु लोकांत स्वयंपाक करतांना, जेवतांना, खातांना, अतोनात स्वच्छता पाळली जाते; कारण

हीं सर्व कार्यें त्यांच्या धर्मांचींच अंगभूत होत. अन्नाचा नैवेद्य प्रथम घरांतल्या देवाला दाखवावा लागतो, आणि म्हणून तें स्नान करून स्वच्छतेनें आणि पवित्रतेनेंच तयार करणें भाग पडतें.

सर माउण्ट स्टुअर्ट एल्फिन्स्टन् आपल्या हिंदुस्थानच्या इतिहासांत (पृ. २००) म्हणतात:—

"हिंदुलोकांची पद्धावी स्वच्छता, थंडी म्हणच पडून गेली आहे. ते लोक शुचिर्भूत असतात. घरांतल्या आणि शारीरिक शुचिर्भूततेंत, युरोपच्या दक्षिणेकडील लोकांबरोबर तुलना केली तर हिंदु श्रेष्ठ ठरतील. युरोपच्या उत्तरेकडच्या लोकांत देखील हिंदु लोकांच्या कांहीं चाली नेल्यास फायदाच होईल."

असें हें शंभर वर्षांपूर्वीचें एल्फिन्स्टन् साहेबांचें मत असतांना, जर मिस् मेयोच्या म्हणण्यावर विसंबून आपण हिंदुलोकांना आज घाणेरडे म्हणावयाचें, तर याचा असाच अर्थ होतो कीं, पाश्चात्यांच्या संसर्गामुळें आणि पाश्चात्य शिक्षणाच्या आणि पाश्चात्य विचारांच्या प्रसारामुळें हिंदु लोकांच्या आरोग्यावह संवयी बिघडून गेल्या असल्या पाहिजेत ! हा निष्कर्ष आम्ही स्वतः चुकीचाच मानतों, पण तो मिस् मेयोच्या स्वतःच्याच पूर्वपक्षावरून निघत असल्यामुळें तो तिला मात्र खरा मानणें भाग आहे !

मिस् मेयोची झट्कन् निष्कर्ष काढण्याची करामत मोठी वाखाणण्यासारखी आहे ! गुप्तेंद्रियरोग बरे करण्याबद्दलच्या जाहिराती हिंदुस्थानांतल्या वर्तमानपत्रांत येतात, म्हणून ती म्हणते कीं, हिंदुस्थानांत तो रोग सर्वत्र पसरलेला आहे असें सिद्ध होतें ! असा जर न्याय लावावयाचा तर आपणास असा निष्कर्ष काढावा लागेल कीं, ज्या अर्थी मि. एच्. जी. वेल्स् यांच्या "टोनो बंगे" नामक पुस्तकाचा इंग्लंडांत विलक्षण खप झाला, त्याअर्थी इंग्रज लोक कमकुवत व निकामी झाले असून त्यांना स्वतःमध्यें जोम राखावयास औषधें आणि उत्तेजक द्रव्यें असले कृत्रिम उपाय योजावे लागतात !

येणेंप्रमाणें सर्व दृष्टींनीं विचार करतां, हिंदुस्थानच्या आरोग्यविषयक परिस्थितीवरील मिस् मेयोची टीका आणि तिच्यावरून तिनें काढलेले निष्कर्ष क्षणभरहि टिकूं शकत नाहींत. जसजसा विचार करावा तसतशी आपली अधिकाधिक खात्री होत जाते कीं, फरक आहे तो लोकांच्या राहणींत किंवा संवयींत नसून, सरकार आपल्यासमोर आलेल्या प्रश्नाकडे कितपत लक्ष देतें, आणि त्याकरितां किती पैसा खर्च करतें, यांत !

मिस् मेयोनें जर आपलें पुस्तक "हिंदुस्थानच्या निरनिराळ्या लोकांबद्दल तिला वाटत असलेल्या प्रेमामुळें" आणि "शेतांतल्या ज्या एका मजुरानें एकदां भूतदयेनें प्रेरित होऊन तिचे प्राण वांचविले" त्याजबद्दलच्या कृतज्ञतेनें लिहिलें; आणि हिंदुस्थानच्या तोंडास काळिमा फांसून त्याला जगासमोर लाजेनें खालीं पाहत ठेवण्यासाठीं आणि हिंदी लोकांच्या राजकीय आकांक्षा हाणून पाडण्यासाठीं तिनें तें लिहिलेलें नाहीं; तर तिनें महात्मा गांधींनीं मनापासून दिलेलें आमंत्रण स्वीकारून परत हिंदुस्थानांत यावें, आणि 'आमच्यांत राहून आमचें जीवित सुधारावें.' हीच एक तिच्या खरेपणाची कसोटी आहे. ती जोंपर्यंत हें आमंत्रण स्वीकारीत नाहीं, तोंपर्यंत ती एक नामर्द मिश्री नालस्तीखोर स्त्री अशीच मानली जाणार।

---

## प्रकरण १८ वें.

# गोमांस खा! नाहीं तर दरिद्री व्हा!



गोहत्येसंबंधानें लिहिण्यांत मिस् मेयोनें आपल्या पुस्तकाचीं चार प्रकरणें खर्ची घातलीं आहेत. 'गाई' आणि ती 'पवित्र' या नुसत्या कल्पनेचीच मेयोनें टर उडविली आहे! हिंदूंनीं गोमांस तेवढें खायला शिकावें, कीं देशांतलें दारिद्र्य पार सातांसमुद्राच्या पलीकडे पळालेंच म्हणून समजा! निरुपयोगी जनावरांना हिंदू लोक जर मारून टाकतील तर देशाचा त्याच क्षणीं उदय ठेवलेला! किती अडाणी हे हिंदु लोक! गाई पवित्र म्हणे! काय याहून आणखी विचित्र कल्पना असावयाची!

पण ही गो–चर्चा सुरू करण्यापूर्वी तिनें जी प्रस्तावना केली आहे, तिच्यांत ती सांगते कीं, हिंदु लोक गोमूत्र पितात, आणि तिचें शेण खातात! अतिशय धार्मिक असेल तर तो दररोजच गोमूत्र पिईल! असल्या या मिस् मेयोनें दिलेल्या वर्णनावरून, हिंदुस्थानच्या सामाजिक किंवा धार्मिक राहणीची कांहीं देखील माहिती नसलेल्या एकाद्या पाश्चात्य गृहस्थास काय वाटेल बरें? पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, जन्ममृत्यूसारख्या फक्त क्रियाकर्मांतर–संस्कारादि विशेष प्रसंगींच काय तें जुन्या पद्धतीच्या कुटुंबांत गोमूत्राचा एक थेंब, आणि शेणाचा लहानसा कण पुष्कळशा

पाण्यांत मिसळून त्यांतून केवळ नांवाला एक थेंबभर, जिभेवर ठेवतात, तें सगळें घटाघट पिऊन टाकतात असें नव्हे !

मिस् मेयोच्या या विधानावर डॉ. रवींद्रनाथ टागोरनीं पुढीलप्रमाणें टीका केली आहे:—

"हिंदु लोक शेण खाणारे आहेत असें वर्णन करून या लेखिकेनें केवढी कावेबाज लबाडी केली आहे पहा! इंग्रज लोकांच्या दंतशास्त्रक्रियेंत सामान्यतः कोकेन् वापरलें जातें, म्हणून इंग्रज लोक कोकेन्-बाज आहेत अशी त्यांची माहिती त्यांजबद्दल विशेषसें कांहीं माहीत नसणाऱ्याला करून देण्याइतकाच हा तिचा गहजब होय्! हिंदु लोकांत अगदीं क्वचित् एवढासाच कुठें शेणाचा अंश घेतात, तोहि एक पक्वान्नाचा भाग म्हणून नव्हे, तर एखादी सामाजिक रूढि मोडल्याबद्दल प्रायश्चित्त म्हणून! युरोपियन् लोकांचीं कालवें आणि चीज घेऊन त्यांना जर जिवंत प्राणी खाणारे आणि कुजकें नासकें गिळंकृत करणारे म्हटलें तर कसें होईल? त्याला तर मिस् मेयोच्या विधानापेक्षां खात्रीनें जास्त आधार आहे! पण ज्याला युरोपियन् लोकांबद्दल इतरांच्या मनांत वाईट आणून देऊन मौज पाहत बसावयाचें नाहीं किंवा एखादा विशिष्ट हेतु साध्य करून घ्यावयाचा नाहीं, असा कोण सरळ बुद्धीचा मनुष्य त्यांचें असें विपर्यासात्मक वर्णन करण्याचें मनांत आणील? अशा रीतीनें क्षुल्लक कानाकोपऱ्यांतल्या गोष्टीला भलतें वडें स्वरूप देणें, अपवादाला नियम म्हणून पुढें आणणें, यासारखी पाजीपणाची दुसरी लबाडी नाहीं!"

आतां आपण दुसरा मुद्दा घेऊं. हिंदु लोक निरुपयोगी जनावरांना मारून टाकीत नसल्यामुळें, त्यांचें पालन करण्यांत त्यांचा प्रतिवर्षी अतोनात पैसा खर्च होतो, हें दारिद्र्याचें मुख्य कारण म्हणून म्हटलें आहे. असले मुद्दे जर उभे करून मुख्य वादाची टाळाटाळ करावयाची तर कधींच शेवट लागणार नाहीं! असो. या मुद्याचा विचार करण्यापूर्वी प्रथम आम्ही असें दाखवून देतों कीं, ही खर्चाची रक्कमच मुळीं अवास्तव फुगवून दाखविली आहे. मिस् मेयोचें म्हणणें असें कीं, -हिंदुस्थानांत १४ कोटी ६० लक्ष गुरांतून कमींत कमी शेंकडा ५० निरुपयोगी मानलीं पाहिजेत; यामुळें दरवर्षी देशाचें ११ कोटि ७० लक्ष पौंड (१ अब्ज ५० कोटि रु.) नुकसान होतें.

या ठिकाणी, एकूण एक गोष्ट हिंदुस्थानच्या विरुद्ध आणून टाकण्याच्या घाईंत मिस् मेयो माटेल तसली बेसूद विधानें कशीं करीत चालली आहे हें वाचकांच्या

नजरेस आणून देणें जरूर आहे. शेंकडा ५० जनावरें निरुपयोगी, हें ती बंगलोर येथील हिंदुस्थानच्या शेतकी बोर्डाच्या हकीकत पत्रकावरून सांगते आहे हें उघड आहे. पण हें पत्रक तपासून पाहतां, तेथें असें विधान दिसतें कीं, १४ कोटी ६० लक्ष गुरांतून फक्त २ कोटी ४५ लक्ष गुरें 'अनावश्यक' समजलीं जातात. यांत तर शेंकडा १६ प्रमाण दिसतें, मिस् मेयो सांगते तसें ५० नव्हे ! शिवाय 'अनावश्यक' म्हणजे मिस् मेयो समजते तशीं 'निरुपयोगी आणि विनकिफायतीचीं' असाच अर्थ होतो असें नाहीं !

प्रस्तुत लेखकानें शेतकीविषयक अर्थशास्त्राचा अभ्यास केला आहे, म्हणून त्या संबंधानें बोलण्याचा त्याला थोडाबहुत अधिकार पोंचतो. खेड्यापाड्यांतून त्यानें अनेकदां चौकशी केली आहे तिजवरून त्याला असें आढळून आलें आहे कीं, निरुपयोगी गुरांचें प्रमाण सामान्यतः शेंकडा ७ ते ८ पडतें. एका गांवांत २५९ गुरांतून फक्त १९ च निरुपयोगी होतीं. दुसऱ्या एका गांवांत १५७ गुरांतून ११ निरुपयोगी होतीं. इतर शोधकांचीहि माहिती घेतली, त्यावरूनहि शेंकडा ८ पेक्षां अधिक निरुपयोगी जनावरें नाहींत असेंच ठरलें. विलायतेहून आणलेले सरकारी तज्ज्ञ फारसे स्वतः खेड्यांत जात नसून ते बऱ्याच गोष्टी कल्पनेवर सोंपवितात. आणि दुसरी गोष्ट, ते नासधूस विशेष फुगवून सांगतात; म्हणजे वाईटच हेतूनें असें नव्हे, तर आपल्यावर सोंपविलेलें हें काम किती उपयोगी आहे आणि किती निकडीचें आहे हें सरकारवर आणि लोकांवर ठसावें म्हणून ! वास्तविक अनेक खेड्यांत शोध करून जी माहिती मिळाली आहे तिजवरून निरुपयोगी गुरांचें प्रमाण फार तर शेंकडा १० होईल एवढेंच. यावरून हिशोब करतां, मिस् मेयोनें दिलेला निरुपयोगी जनावरांच्या पोषणाचा खर्च एकदम त्याच्या $\frac{1}{5}$ वर, म्हणजे १५० कोटि रु. चा ३० कोटींवर, येऊन बसतो.

हे तीस कोटि रुपये आपण त्या गुरांना लागणाऱ्या पदार्थांची किंमत समजूं. या पदार्थांची निपज करण्याकरितां बरेच लोक लागतात, म्हणजे एवढ्या लोकांचें पोषण त्यांच्यावर होतें. निरुपयोगी जनावरें जर मारून टाकलीं, तर तेवढ्या-प्रमाणांत हे लोक रिकामे पडतील, मग त्यांना दुसरीकडून कुठून तरी काम आणून द्यावें लागेल. समजा कीं, त्यांच्या मजुरीची किंमत, निपज होणाऱ्या पदार्थांच्या किंमतीच्या निमे, म्हणजे १५ कोटि रुपये आहे. हे रुपये जर वजा केले, तर निरुपयोगी गुरांच्या पोषणापासून देशाचें होणारें नुकसान, किंवा त्यांना मारून टाकण्यानें देशाचा होणारा फायदा, १५ कोटि रुपयांहून अधिक पडत नाहीं.

याच्यापुढें प्रश्न येतो तो हा कीं, "हीं निरुपयोगी म्हटलेलीं जनावरें खरोखरीच निरुपयोगी आहेत काय ?" हा प्रश्न विरोधाभासात्मक दिसतो खरा, आणि कदाचित् कांहीं लोक आम्हांला हंसतीलहि! परंतु आम्ही खरोखरच विचारतों कीं, "हीं निरुपयोगी म्हटलेलीं जनावरें खरोखरच निरुपयोगी आहेत काय ?" निदान तज्ज्ञांचें त्याबद्दल एकमत नाहीं खास. आम्ही आमचे आधार दाखवितों, मग वाचकांनीं त्यांजवरून काय तो परस्पर निष्कर्ष काढावा.

१९२१ सालीं, संयुक्त प्रांताच्या सरकारनें कुमौन जिल्ह्यांतल्या जंगलासंबंधाच्या तक्रारी ऐकण्याकरितां एक कमिटी नेमली; तिचे अध्यक्ष मि. पी. विन्डहॅम कमिशनर हे असून, हिंदुस्थान जंगल खात्यांतले मि. आर. जी. मॅरिऑट, आणि मि. नेगी बिनसरकारी एम्. एल. सी., हे सभासद होते. ह्या कमिटीनें अगदीं काळजीपूर्वक बारकाईनें चौकशी करून रिपोर्ट केला त्याच्या १३ व्या कलमांत ती एकमतानें लिहितेः—"जमिनीला खताच्या कामीं होणाऱ्या गुरांढोरांच्या उपयोगाचें विशेष महत्व जें आमच्यापुढें सांगण्यांत आलें, तें आम्हाला पटलें. **ह्याताऱ्या क्षीण झालेल्या गुरांचा देखील उपयोग आहे**, असें आमच्या नजरेस आणण्यांत आलें." चौदाव्या कलमांत कमिटीनें त्या मुद्यावर आणखी जोर देऊन सांगितलें आहे कीं, निरुपयोगी गुरें मालकाला आणि शेतकाम करणाऱ्याला खरोखर अगदींच इतकी निरुपयोगी असतात असें नाहीं, कारण त्यांच्यापासून उत्कृष्ट शेणखत मिळत असतें. ह्या शेणखताची पैशाच्या रूपांत किंमत काय याचा अंदाज करणें कठीण आहे, परंतु असें म्हणावयास हरकत नाहीं कीं, ती किंमत निरुपयोगी गुरें पाळल्यानें देशाला होणाऱ्या नुकसानाइतकीच म्हणजे १५ कोटि रुपये, होईल; दर एक गुरूं वर्षाकांठीं निदान १० रुपये किंमतीचें तरी खत देईल म्हणावयास हरकत नाहीं! यावरून दिसून येईल कीं, ही 'एक मोठ्या थोरल्या रकमेची उधळपट्टी' म्हणजे एक मोठी थोरली निव्वळ गप्प आहे, दुसरें कांहीं नाहीं!

त्याच प्रश्नाचा आतां आपण निराळ्या दृष्टीनें विचार करूं. आपण असें धरून चालूं कीं, निरुपयोगी गुरें पाळल्यापासून खरोखरच पैशाचें भयंकर नुकसान होतें! परंतु अन्न खाणें म्हणजेच जिवंत राहणें असें कांहीं नव्हे! माणसाच्या गुणांत भावनेचेंहि फार महत्व आहे. अशा भावनेनें कधीं कधीं अतोनात आर्थिक नुकसान होत असतें. मि. नॉर्मन् एन्जल् यांनीं भविष्य वर्तविलें होतें

कीं, जगांत व्यापारविषयक परस्पर-संबंध अतिशय गुंतागुंतीचे झालेले असल्यामुळें आतां जगांत युद्ध होणें शक्य नाहीं; परंतु १९१४ त महायुद्ध सुरू होऊन हें भविष्य खोटें पडलें! मानवी सुखांत केवळ पैशाचाच जर प्रश्न असता, तर तो भावनेनें जसा आजवर अनेक वेळां दडपून टाकला आहे तसा टाकला नसता!

हिंदु लोक गाईला पूज्य मानितात. कसेंहि का होईना, हिंदुलोक अति प्राचीन कालापासून गाईला पवित्र मानीत आले आहेत खरे. हिंदुस्थानांतल्या आर्य लोकांना गाईचा शेतीमध्यें उपयोग होत आला आहे. तिच्यापासून दूधहि मिळतें. प्राचीन आर्यलोकांत संपत्ति गाईंनीं मोजली जात असे. येणेंप्रमाणें हळुहळु, गाय हें पवित्र जनावर असें मानलें जात आलें आहे. गाईला मारणें पाप आहे, गाईला आत्मा आहे, असें हिंदु लोक मानतात. उलट युरोपियन् लोक गाईला आत्मा नाहीं असें समजतात!

अशाच तऱ्हेच्या भावना अन्य देशांत आणि अन्य लोकांतहि प्रचत आहेत. उदाहरणार्थ, मुसलमान लोक डुकराला अशुद्ध प्राणी समजतात, त्याच्या मांसाला ते स्पर्श करीत नाहींत. उलट, ख्रिस्ती लोकांना तर डुकराच्याच मांसाची विशेष *चट लागली आहे!*

येणेंप्रमाणें, आर्थिक नुकसान निरनिराळ्या लोकांत निरनिराळ्या प्रकारांनीं होतें; तें त्यांच्यांत जी काय उच्चतम भावना असेल तिच्यावर अवलंबून असतें. गोल्डस्मिथ् आपल्या *व्हिकर ऑफ् वेकफील्डमध्यें म्हणतात त्याप्रमाणें "गरीबांची नमता* हामडौली श्रीमंतांच्या नुसत्या फिती जमविल्या तरी झांकून जाते!" निव्वळ आवडीखातर घरांमध्यें लक्षावधि कुत्रीं मांजरें पाळण्यांत कोट्यावधि रुपये खर्च होत नाहींत काय? या लाडक्यांचा एरवीं काडीमात्र उपयोग नाहीं, उलट, तीं देशांतला बराच अन्नांश खाऊन फस्त करून लोकांचें दारिद्र्य मात्र वाढवितात! तर मग तर्कप्रधान पाश्चात्य लोक या प्राण्यांना मारून टाकून आज चाललेलें हें आपलें आर्थिक नुकसान कां टाळीत नाहींत? किंवा त्यांना स्वतःच खाऊन टाकायाचा मिस् मेयोचा उपदेश कां घेत नाहींत?

आज युरोपांत धर्माच्या नांवाखालीं ख्रिस्ती—विशेषतः कॅथोलिक ख्रिस्ती देवळांत मेणबत्त्या पाजळण्यांत पैशाची केवढी उधळपट्टी होत आहे बरें! एका फ्रेंच अर्थशास्त्रज्ञाच्या पुस्तकांत आम्हांला असें वाचल्याचें आठवतें कीं, युरोपांतल्या या देवळांतल्या मेणबत्त्यांनीं दर वर्षीं ३० कोटि पौंड (३ अब्ज ७५

कोटि रुपये ) मातींत पडतात ! असें असून हा प्रकार अखंड चालूच आहे, आणि तो योग्य कीं अयोग्य कोणीच विचारीत नाहीं ! एकालाहि असें सांगण्याचें अद्याप धाडस झालेलें नाहीं कीं, युरोपखंडांतले लाखों लोक उपाशीं मरताहेत ते या मेणबत्त्यांनीं म्हणून ! पण राज्यकारभारांतल्या उधळ-पट्टीवर आणि वायफळ खर्चांवर मात्र यथास्थित टीका होते ! एकट्या हिंदु-स्थानांतलाच काय तो हा निरुपयोगी जनावरें पाळल्यामुळें होणारा खर्च लोकांच्या दारिद्र्याचें मुख्य कारण म्हणून जोरजोरानें जगभर पुकारला जात आहे ! तो उघडच एवढ्यासाठी कीं, इकडे भलत्याच मार्गावर लक्ष वेधलें कीं तिकडे राज्यव्यवस्था टीकेपासून सुरक्षित राहिली ! !

मानवी जीविताला आपण किंमत देतों हीसुद्धां एक प्रकारची भावनाच आहे. समजा कीं, पृथ्वीच्या पाठीवर एक सुधारलेलें नरमांसभक्षक राष्ट्र आहे—जशीं आज युरोपांत सुधारलेलीं गोमांसभक्षक राष्ट्रें आहेत ! सुधारणा—म्हणजे निव्वळ भौतिक शास्त्रांची प्रगति, तिचा प्राणिमांसभक्षणाशीं—मग तें नरमांस असो कीं पशुमांस असो—आवश्यक असा संबंध कांहींच नाहीं. ( वर सांगितलेल्या प्रकारचा ) सुधारलेला मनुष्य नरमांसभक्षक असूं शकेल; जसा युरोपांतला ( तसा ) सुधारलेला मनुष्य आज गोमांसभक्षक आहे ! आतां आपण असें समजूं कीं, ह्या नरमांसभक्षक राष्ट्रानें आपला एक तज्ज्ञ इसम युनायटेड् किंग्डममध्यें आर्थिक नासधुशीचीं कारणें शोधून काढण्यासाठीं पाठविला. तर हा तज्ज्ञ माणूस आपल्या राष्ट्राकडे पहिल्यांदा काय रिपोर्ट पाठवील ? पहिल्यानेंच त्याच्या नजरेस अशी कोणती मोठी नासधूस येईल ? अर्थातच् निरुपयोगी, बेकिफायतशीर, अशा माणसांचें पोषण करावयास लागणारा पैसा ! युनायटेड् किंग्डम्‌मध्यें आज असे किती म्हातारे कोतारे पंगु लोक आहेत बरें ? समजा दहा लाख. या दहा लाख पंगु लोकांना पोसावयास, दरसाल माणशीं २५ पौंड प्रमाणें, २॥ कोटी पौंड रक्कम लागेल.

यानंतर आपण पूअर लॉ फंडांतून पोसले जाणारे भिकारी घेऊं. यांजकरितां दर वर्षी सरासरी ४ कोटी पौंड खर्ची पडतात. त्यांत बेकार लोकांची संख्या जवळ जवळ दहा लाख मिळवा. त्यांच्या पोषणाचा खर्च ३॥ कोटि पौंड येईल, कारण हे धडधाकट लोक जास्त अन्न खातात !

म्हणजे या सगळ्या निरुपयोगी बेकिफायतशीर मानवी प्राण्यांना—पंगु, भिकारी, आणि बेकारांना—जिवंत ठेवावयास लागणारा सगळा पैसा एकत्र केला

तर दर वर्षी १० कोटि पौंडांची पर्वतप्राय रास पडेल ! 'केवढें हें इंग्लंडचें राष्ट्रीय नुकसान ! केवढी ही आर्थिक उधळपट्टी !'—तो नरमांसभक्षक तज्ज्ञ म्हणेल ! आणि त्यांत चूक ती काय ?

सबंध देशानें जर 'मानवी प्राण्याची उगाच पवित्रता काय म्हणून मानावयाची' असें म्हणून ती *'खोटी' भावना सोडून दिली, आणि माणसें खाण्याची* दीक्षा घेतली, तर राष्ट्राला त्या निरुपयोगी बेकिफायतशीर माणसांपासून अन्नाचा केवढा पुरवठा होईल याची कल्पना तरी आहे ! नुसतें त्या निरुपयोगी लोकांना युनायटेड किंग्डमनें मारून टाकलें तरी देखील त्याचे १० कोटि पौंड—कमी नाहीं—शिल्लक पडतील ! तसें तें करणें काय ? नाहीं. मग हा त्या राष्ट्राचा त्या नरमांसभक्षकाच्या दृष्टीनें केवढा गाढवपणा बरें ?

हें आम्ही नुसतें कल्पनेचें चित्र रंगवलें आहे असें नव्हे ! कारण एखाद्या इंग्रजानें किंवा अमेरिकनानें, हिंदुस्थानांत निरुपयोगी गुरांच्या पोषणार्थ खर्च होणारा पैसा म्हणजे निव्वळ धुळींत पडला असें मानून, टीका करण्याचें मनांत आणलें, तर त्यानें एखाद्या सुधारलेल्या नरमांसभक्षकानें त्या इंग्रजाच्या किंवा अमेरिकनाच्या देशासंबंधानें केलेल्या टीकेनें जसें त्या इंग्रजाला किंवा अमेरिकनाला वाटेल, तसेंच हिंदु लोकांस वाटेल.

अतएव हिंदुस्थानच्या दारिद्र्याचीं कारणें ह्या अशा भलत्या ठिकाणीं शोधीत बसणें व्यर्थ होय. त्यानें उलट एवढेंच होतें कीं, एखाद्या मनापासून शोध करणाऱ्या इसमाची फसगत होऊन तो क्षुल्लक गोष्टीचें अवडंबर माजवूं लागतो. मिस् मेयोच्या या वरच्या मुद्यांत काडीमात्र जर सत्य असतें, तर हिंदुस्थानांतल्या मुसलमान लोकांत मुळींच दारिद्र्य असावयास नको होतें. कारण मुसलमान गोमांस खातात. निरुपयोगी गुरेंढोरें मारून टाकण्यांत त्यांच्या मनाकडे कांहीं येत नाहीं. असें असतां हिंदुस्थानांत सर्वांत गरीब—म्हणजे हिंदू लोकांहूनहि गरीब—असे मुसलमानच; ते कां ?

हिंदुस्थान सरकारचें अलीकडे गुरांची जात सुधारण्याकडे लक्ष लागलें आहे. हा प्रश्न बिनसरकारी मताचा सतत दाब पडल्यामुळें घेण्यांत येऊन, तो सोडवावयासहि मुख्यतः बिनसरकारी गृहस्थच यथास्थित साहाय्य करीत आहेत. असें आहे तरी एकंदरींत सरकारचे प्रयत्न कांहीं मनापासून दिसत नाहींत !

याप्रमाणें निरुपयोगी गुरांच्या रक्षणार्थ खर्च होणारी 'अवाढव्य रक्कम' कमी होत होत शेवटीं एवढ्याशा क्षुल्लक प्रमाणावर कशी येते हें सिद्ध करून,

अशा तऱ्हेनें भावनेमुळें आणि श्रद्धेमुळें होणारा हा खर्च पाश्चिमात्य लोकांत आणि खुद्द इंग्लंडांतहि कसा चालू आहे हें दाखवून दिल्यानंतर, आतां आपण मिस् मेयोनें गाईसंबंधानें केलेल्या इतर विधानांचा विचार करूं. मिस् मेयो म्हणते कीं, हिंदु लोक गाईला पवित्र मानतात खरे, पण ते तिचें पोषण योग्य रीतीनें करीत नाहींत, ती म्हातारी क्षीणावयव झाली म्हणजे तिची प्रत्यक्ष उपासमार करतात, आणि तिजकरितां चैरणीसाठीं स्वतंत्र अशी कांहीं लागवड करीत नाहींत. वास्तविक हिंदु शेतकऱ्यासंबंधानें बोलावयाचें म्हणजे, तो आपलें जीवित कसें कंठीत असतो याचा थोडादेखील ज्याला अनुभव आहे तो सांगेल कीं, त्याच्यावर आरोप करणें ही मिस् मेयोची कमालीची निर्दयता होय! त्या बिचाऱ्याला स्वतःचा देखील उदरनिर्वाह करणें कठीण जातें. त्याची मिळकत फारच थोडी असते. आणि या आधींच अपुऱ्या असलेल्या मिळकतींतून तो स्वतःच्या कुटुंबाबरोबर आपल्या गुरांढोरांचेंहि पोषण करितो. दहापैकीं नऊ तरी गुरें त्यास दुधाच्या किंवा शेताच्या कामीं उपयोगी पडतात. पण निकामी गुरेंसुद्धां तो पोसतो— आपल्या स्वतःच्या पोटाला चिमटा घेऊन! 'तुमच्यापाशीं काय असेल तें सर्वांना वांटून द्या' हा येशू ख्रिस्ताचा उपदेश खरोखर कोणी पाळीत असेल तर तो! माणसांनाच काय पण त्याच्या पलीकडे पशूंनासुद्धां तो वांटा पोंचवितो! अशा स्वार्थत्यागी कनवाळू माणसाचे धन्यवाद गावयाचे तें सोडून उलट त्याचे दोष काढीत बसावयाचें ही केवढी निर्दयता बरें!

चैरणीकरितां लागवड करण्याबद्दलचें तिचें सांगणें सर्वथैव अस्थानीं आहे. त्यानें, हिंदुस्थानांत शेतीचें काय विशिष्ट अर्थशास्त्र आहे याची तिला मुळींच माहिती नाहीं एवढें मात्र सिद्ध होतें. आपल्या देशाचें तिनें उदाहरण दिलें आहे तें येथें मुळींच लागू पडत नाहीं. लाला लजपतराय हे युनायटेड् स्टेट्स्मध्यें राहिले होते; आणि तेथील परिस्थितीचा त्यांनीं चांगला अभ्यासहि केला आहे; त्यांनीं बॉम्बे क्रॉनिकलमधील आपल्या लेखमालेंत हिंदुस्थान आणि अमेरिका यांच्यांत पुढीलप्रमाणें अंतर असल्याचें दाखविलें आहेः—

"पहिली गोष्ट अशी कीं, युनायटेड् स्टेट्स्चें क्षेत्रफळ हिंदुस्थानच्या दुप्पट असून, लोकसंख्या फक्त एक-तृतियांशच आहे. दुसरी गोष्ट म्हणजे त्या ठिकाणीं वार्षिक 'जमीन महसूल' अशी कांहीं पद्धत नाहीं. तिसरी गोष्ट, तेथल्या गुरांची निपज करणाऱ्या मंडळीला सरकारी आश्रय असतो; कारण तेथें जमिनीच्या विशिष्ट परिस्थितीमुळें आणि लोकसंख्या विरळ असल्यामुळें, गुरांची निपज करणें

हा एक धंदा होऊन बसलेला आहे. चौथी गोष्ट म्हणजे तेथील लोकांची स्थिति इतकी गरिबीची नाहीं कीं, सरकारधारा देऊन शिल्लक राहील त्यावर मुलांमाणसांचा कसा तरी जीव जगविण्याकरितां, अधिक उत्पन्नाची शेती केलीच पाहिजे ! हिंदुस्थानांत लागवडींत आणिलेल्या एकूण एक जमिनीवर धारा बसविला जातो. युनायटेड् स्टेट्समध्यें इतकी हजारों एकर जमीन पडली आहे कीं, तिच्यांत वैरणीशिवाय कांहींच उत्पन्न होऊं शकत नाहीं !"

दुसरीहि एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं, अनादिकालापासून हिंदुस्थानची शेती गुरांना खुशाल रानांत चरावयास सोडावयाचें या पद्धतीवर बसविलेली आहे. या पद्धतीवर टीकाद्य चालविणें सोपें आहे, पण हिंदुस्थान सरकारनें १८९० च्या सुमारास मुद्दाम हिंदुस्थानची शेतकीची परिस्थिति तपासण्याकरितां बोलावून आणिलेले प्रसिद्ध ब्रिटिश शेतकी-शास्त्रज्ञ डॉ. व्होल्कर यांना ती पद्धत हिंदुस्थानच्या विशिष्ट परिस्थितीला योग्य म्हणून पसंत पडली होती. संयुक्त प्रांताची जंगल तक्रार कमिटी—जिच्या रिपोर्टांतून मागें आम्हीं उतारे घेतले आहेत—जिच्यांत दोन सभासद (मिस् मेयोचे देवदूत) ब्रिटिश अधिकारी होते—तिनें या गुरचरणींसंबंधानें अगदीं एकमतानें असें सुचविलें आहे कीं, "चरावयास किती गुरें येतात याची मोजणी करूं नये, त्यावर फी बसवूं नये, अमुक एका संख्येबाहेर गुरें येतां नयेत अशी मर्यादा घालूं नये." कारण कमिटीच्या लक्षांत ही गोष्ट येऊन चुकली होती कीं, "गुरांचें पहिलें काम म्हणजे रानांत खत नेणें; त्या कामीं म्हातारी कोतारींसुद्धां जनावरें उपयोगी असून, धष्टपुष्टपणापेक्षां गुरांचें संख्याबलच अधिक महत्वाचें आहे."

ह्या शब्दांनीं अगदीं मिस् मेयोसारख्या आंधळ्या टीकाकाराची सुद्धां खात्री झाली पाहिजे कीं, गुरांना पुरेसें खावयास मिळत नाहीं याला शेतकरी फारसा जबाबदार नसून, अत्यंत असमंजसपणाच्या आणि त्रासदायक मर्यादा घालून चरणीच्या आड येणारें जंगल खातेंच त्या गोष्टीस विशेष जबाबदार होय. जंगलवाढीला प्रतिबंध होऊं नये अशी योग्य ती तजवीज केलीच पाहिजे, त्याबद्दल प्रश्न नाहीं. पण मूळपासून अखेरपर्यंत जंगलखात्याचे प्रयत्न, कांहीं ना कांहीं तरी सबबीवर गुरांना जंगलांत मनाई करावयास कारणीभूत झालेले आहेत.

आतां एका शेवटच्या आरोपाचा विचार करावयाचा राहिला. मिस् मेयो म्हणते कीं, हिंदु लोक गाईला जरी पवित्र मानीत असले तरी ती मरावयास

टेंकली म्हणजे जें त्यांचें वर्तन होतें तें अत्यंत निर्दयतेचें असतें. त्यांना ठाऊक असतें कीं ती आतां मरणार आहे, तरी देखील तिला ते गोळी घालून यातनांतून मुक्त करीत नाहींत! यासंबंधानें सांगावयाचें तें असें कीं, सरळ जीव घेणें हें पाश्चात्य कल्पनेला दयेचें वाटतें हें आम्हांला ठाऊक आहे आणि त्यांत तथ्यहि आहे असें आम्हांला वाटतें. परंतु हिंदु लोकांना गाय पवित्र दैवत वाटत असतांना, ती मरणयातनांत असली तरी त्यांच्यानें तिचा जीव कसा घेववेल? पाश्चात्यांना मनुष्य प्राण्याबद्दल वाटत असलेली जी भावना तीच हिंदूंची गाईबद्दल भावना आहे. एखादा मनुष्य मरतो आहे, तेव्हां विचाऱ्याला एकदम मारून टाकून यातनांतून सोडवावा, असें दुसऱ्या माणसाला—पाश्चात्य माणसाला तरी—कधीं वाटतें काय? मरणोन्मुख झालेल्या एका माणसाला त्याच्या नातलगांनीं एकदम मारून टाकल्याचें एकच उदाहरण अलीकडे ब्रिटिश वर्तमानपत्रांत आलें होतें. परंतु तें प्रकरण पोलिस कोर्टांत गेलें; यावरूनच सिद्ध होतें कीं, मरणाऱ्याला यातनांतून एकदम मुक्त करणें ही तर्कदृष्टीला दया वाटत असली, तरी लोकांवर अद्याप जीवाबद्दलच्या पूज्यभावनेचा पगडा राहिलेला असून, दया करण्याकरितां म्हणून देखील अशा प्रसंगीं जीव घेणें अन्यायाचें समजलें जातें.

---

## प्रकरण १९ वें.

# ब्रिटिश लोक निघून गेले तर!

'हिंदुस्थानचा राज्यकारभार ब्रिटिश नोकरशाहीच्या हातांत राहिला पाहिजे, ब्रिटिशांचा प्रतापशाली बाहु सर्वत्र परजत राहिला पाहिजे,' असें मनांत कायम करून मग त्याजकरितां एक एक मुद्दा जे पुढें आणतात, त्यांचा तो एकूण एक मुद्दा मोडून पडला—आणि सत्य समोर आलें कीं, मोडून पडणार हें ठरलेलेंच—कीं मग अगदीं शेवटचा रामबाण म्हणून ते आपल्या भात्यांतून असा मुद्दा काढतात कीं, "जर यदाकदाचित् ब्रिटिश लोक हिंदुस्थानांतून निघून गेले, तर तुमचें कसें होणार? तावडतोब जी अनवस्था, अराजकता, खून, दरवडे सुरू होतील त्यांजपासून तुमचें रक्षण कोण करणार?"

ह्या अगदीं अखेरच्या पायरीवर, वादाच्या अवसानभूमीवर, आपण उभें राहिल्याबरोबर सर्वांचीं तोंडें गप्प झालींच पाहिजेत—अशी आपली आपणच:

समजूत करून घेऊन, मोठा गहन विचार व्यक्त केल्याच्या गंभीर मुद्रेनें, आणि केवढा दिग्विजय आपला हा अशी चोहोंकडे दृष्टि फिरवीत, मोठ्या श्रेष्ठपणाचा आव आणून छाती पुढें करून, हे लोक उभे राहतात! "काय उत्तर देणार! कसलें काय उत्तर यावर येऊं शकेल?" असें स्वतःच्याच निकालावर स्वतःच भ्रमण करीत समाधान मानतात! हिंदी लोकांत कांहीं शहाणपणा म्हणून असेल, तर त्यांनीं ब्रिटिश लोक ठेवतील तसें मुकाट्यानें राहिलें पाहिजे! दुसरी कांहीं गडबड कामाची नाहीं!

हुबेहुब हेच विचार मिस् मेयोनें मांडले आहेत! आणि ते खरे दिसावेत म्हणून तिच्या नेहमींच्या ठरलेल्या वहिवाटीप्रमाणें तिनें 'गोष्टी' आणि 'मुलाखती' रचून ठेवल्या आहेत! त्यांतली एक गोष्ट पहाः—

"ही पुढें दिलेली गोष्ट ज्या माणसानें सांगितली त्याच्या सत्यनिष्ठेबद्दल आजवर कोणीहि कधीं शंका घेतली असेलसें मला वाटत नाहीं. १९२० साल, मोठें धूमधडाक्याचें, सुधारणेच्या कायद्यानें काय होतें काय नाहीं अशी सर्वत्र भीति पसरलेली, ब्रिटिश लोक देश सोडून निघाले अशा बाजारवातम्या पुनः पुनः पसरत चाललेल्या! मला ही गोष्ट ज्यांनीं सांगितली ते एक बरींच वर्षे हिंदुस्थानांत राहिलेले अनुभव घेतलेले अमेरिकन गृहस्थ असून, एका बड्या संस्थानिकाकडे पाहुणे म्हणून गेले होते. हे संस्थानिक मोठे मोहक स्वभावाचे, सुसंस्कृत, आणि जोमदार मनोवृत्तीचे असून आपल्या संस्थानांत त्यांनीं अगदीं अव्वल दर्जाची सुधारणा केलेली होती. या संस्थानिकाचे त्यावेळीं दिवाणहि हजर होते. आणि ते तिघेहि फार दिवसांचे एकमेकांचे स्नेही या नात्यानें खुशाल गप्पा मारीत बसले होते.

दिवाण म्हणाले, "राजे साहेबांना वाटत नाहीं कीं ब्रिटिश लोक निघून जातील. पण इंग्लंडच्या नव्या सरकारच्या अंमलांत त्यांना कदाचित् असा सल्ला मिळेलहि! याकरितां राजेसाहेब आपल्या सैन्याची जुळवाजुळव करीत आहेत, दारूगोळा जमवीत आहेत, आणि रुप्याचें नाणें पाडताहेत. इंग्लिश लोक जर खरोखरच निघून गेले, तर मग तीन महिन्यांनीं सगळ्या बंगालमध्यें एक तरी रुपया किंवा कुमारिका शिल्लक राहते कीं काय पहा!!"

"यावर राजेसाहेब—बंगालहून अर्धहिंदुस्थानच्या पलीकडे असलेल्या आपल्या राजधानींत बसलेले—संमति दर्शविते झाले. कारण त्यांचे पूर्वज मराठे राजे शेंकडों वर्षे लूटच करीत आले होते!"

ह्या गोष्टीसंबधानें कलकत्त्याच्या 'कॅपिटल' पत्राचे संपादक परलोकवासी मि. पॅट लव्हेट यांनीं आपल्या पत्रांत लिहिलें आहे:—

"मिस् मेयोला आपल्यामध्यें काय उणीव आहे याची जाणीव असून, आपल्या त्या शिळया बाजारगप्पा ती सिगारेट्च्या हवेंत उडणाऱ्या गोष्टींनीं भरून काढीत आहे! ही मूळ गोष्ट मी चाळीस वर्षांपूर्वी सांगितलेली ऐकली आहे; आणि ती याहून चांगल्या रीतीनें आणि जोरदार पद्धतीनें! त्या वेळचीं पात्रें, लॉर्ड डफरिन् आणि जोधपूरचे कैक वेळां रीजंट असलेले शूर रजपूत सर प्रतापसिंग, हीं होतीं. लॉर्ड डफरिननीं विचारलें, "*ब्रिटिश लोक जर हिंदुस्थान सोडून गेले तर काय होईल हो!*"

"काय होईल! विचारतां काय व्हाइसरॉय साहेब! लगेच मी माझ्या जवानांना स्वार करून पिटाळीन, मग एका महिन्यांत सबंध बंगालमध्यें एक रुपया किंवा एक कुमारी शिल्लक राहते तर बघा!"

सर प्रताप माझ्या चांगल्या ओळखीचे होते, आणि कर्झन साहेबांच्या दरबारच्या वेळीं मी त्यांना हा असा संवाद कधीं तरी झाला होता कीं काय म्हणून विचारिलें. तेव्हां एकदम उग्र मुद्रा करून ते म्हणाले, "खोटें! साफ खोटें मि. लव्हेट! आम्ही रजपूत लोक गरीब बापड्यांना कधींहि त्रास देणार नाहीं! आम्ही आमच्या शत्रूंना दुखवूं; पण तेव्हां देखील त्याला आम्ही तरवारीनें प्रत्याघात करण्याची संधि देऊं."

या ठिकाणीं, सिडने स्मिथ्चा एक उतारा देऊन, अमेरिकन् लोक कसे सहज फसले जातात हें दाखवावेंसें मला वाटत होतें; पण एका पिसाळलेल्या बायको मनुष्याच्या वडबडीसाठीं सबंध राष्ट्राची निंदा काय म्हणून?

असल्या गोष्टी रचून, आणि त्या खऱ्या आहेत असें भासविण्याकरितां पुनः वाटेल तें खोटेंनाटें सांगून मिस् मेयो आपले मुद्दे स्थापन करूं पाहत आहे! असली ही गोष्ट रचून तितका तिनें खोट्याचा प्रसार केला हें झालेंच, पण शिवाय त्या गोष्टींत तिनें हिंदी संस्थानिकांच्या शीलावर शिंतोडे उडविले आहेत, त्याचें काय? हिंदी संस्थानिकांचें जीवितकर्तव्य जणूं एवढेंच कीं, असहाय लोकांना लुटावें, आणि कुमारिकांचा पातिव्रत्यभंग करावा; प्रजेचें संरक्षण करणें आणि रक्षिलेल्यांना सुराज्यव्यवस्था देणें हें जणूं आपलें कामच नव्हे!—असें ते मानीत असल्याचें ह्या मिस् मेयोच्या गोष्टीवरून दोत आहे. असाच तऱ्हेची एक दुसरी

गोष्ट रचून तिनें हिंदुस्थानचे लोकनायक संस्थानिकांना साफ उडवूं देऊं इच्छीत आहेत असा त्यांच्याहि शीलास कालिमा लावण्याचा प्रयत्न केला आहे! (प्रकरण १३ वें). म्हणजे तिचा उद्देश असा कीं, एकाच्या उलट दुसऱ्या-संबंधानें लिहून संस्थानिक आणि हिंदी लोकनायक यांच्यांत बेबनाव उत्पन्न करून त्या दोघांचें परस्पर भांडण लावून द्यावें।

ब्रिटिश निघून गेले तर हिंदुस्थानांत अंतःस्थ केवढी अस्वस्थता माजेल आणि काय गोंधळ होईल त्याचें वर्णन केल्यावर, तिनें हिंदुस्थानावर बाहेरून अफगाणिस्थानासारख्या शेजारच्या देशांकडून किंवा वायव्य सरहद्दीवरच्या सारख्या लोकांकडून स्वारी होणें कसें संभवनीय आहे, नव्हे, कसें खात्रीलायक आहे, याचा विचार मांडला आहे. मिस् मेयोच्या मतें, हिंदी लोक जे नामशेष होत नाहींत, किंवा पृथ्वीच्या पाठीवरून साफ झाडून टाकण्यांत येत नाहींत, ते केवळ ६०००० ब्रिटिश शिपाई हिंदुस्थानांत आहेत म्हणूनच। यांत तिनें एक महत्वाची गोष्ट जी डॉ. रवींद्रनाथ टागोर यांनीं प्रामुख्यानें जगासमोर आणलेली आहे ती अजीबाद दृष्टीआड केलेली आहे; म्हणजे ही कीं, "हिंदुस्थानच्या लोकांनीं आपला जीव आणि आपली संस्कृति, ब्रिटिश शिपायांच्या मदतीशिवाय," आणि ब्रिटिश किंवा अमेरिकन् लोकांहून "अधिक शतकें अखंडपणें, रक्षण केलेली आहे."

यासंबंधानें आम्ही आतां विचार करणारच आहों, परंतु तत्पूर्वी आम्हांला एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे ती ही कीं, हा प्रश्न सध्यां व्यवहार्य राजकारणांत मुळींच येत नाहीं. ब्रिटिश वर्चस्व आणि ब्रिटिश सैन्य हिंदुस्थानांतून साफ निघून जावींत अशी प्रत्यक्ष मागणी हिंदुस्थाननें केलेलीच नाहीं. सर्व जबाबदार हिंदी लोकांनीं खुद्द कायदेमंडळांत आपली इच्छा प्रदर्शित करून स्पष्टपणें जाहीर केलेलें आहे कीं, लष्कर आणि परराष्ट्रीय संबंध हिंदुस्थानांतल्या ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या हातीं ठेवावयास कांहीं हरकत नाहीं, परंतु इतर बाबतींतला राज्यकारभार ग्रेट ब्रिटनची अधिराजसत्ता ठेवून कायदेमंडळाच्या तंत्रानें चालावा.

या मुद्यावर आम्ही जोर देत आहों याचें कारण आम्हांला आज अगदीं नेमकें काय पाहिजे आहे हें ब्रिटिश लोकसत्तेला आणि सबंध जगाला कळविण्याची आमची इच्छा आहे. 'हातचें गेलेलें राज्य' ह्या पुस्तकाच्या लेखकानें, पुस्तकाला तसलें तें गैरसमज करणारें नांव देऊन आणि एरवींहि विपर्यास करून इंग्लंडांत

आणि हिंदुस्थानांत दोन्ही ठिकाणीं अशी मुक्तीची फलगा पसरून दिली आहे कीं, ब्रिटिशांनीं आपलें पंचूगाळें घेऊन एकदांचें पार निघून जावें असें हिंदुस्थानचें म्हणणें आहे.

अर्थातच यावर विरोधी पक्ष आम्हांला सहज विचारूं शकेल कीं, हिंदी राष्ट्रीय सभेनें गेल्या ( मद्रासच्या ) अधिवेशनांत संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पास केला आहे त्याचें काय ! परंतु आम्हांला वाटतें कीं, सध्यांच्या संतापजनक परिस्थितीत त्यांत कांहीं आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. सायमन् कमिशन् आणि त्यांतील सभासद नेमण्याची सर्वथैव असमाधानकारक पद्धति, आणि हिंदुस्थानाला १९२० सालापासून ब्रिटिश साम्राज्यांतर्गत राष्ट्रमंडळांत एक भागीदार म्हणून व जगाच्या राष्ट्रसंघांत स्वतंत्र सभासद म्हणून मान्य केलें असतांना त्याचा कमिशनच्या कामांत बरोबरीच्या नात्यानें भाग घेण्याचा हक्क साफ नाकारणें, ह्या गोष्टी म्हणजे हिंदुस्थानचा प्रत्यक्ष अपमान आणि त्याला आव्हानच होत. अर्थात् त्यामुळें कोणाहि समजूतदार आणि स्वाभिमानी माणसांना चीड येणें अगदीं स्वाभाविक आहे.

सर व्हॅलेन्टाइन् चिरोल यांनीं हिंदुस्थानासंबंधाच्या आपल्या अलीकडच्या पुस्तकांत म्हटलें आहे कीं, ज्या ज्या वेळीं ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानाला राजकीय सुधारणा दिल्या आहेत त्या त्या वेळीं त्या ' वेळ गेल्यानंतर ' आल्याचें ठरल्या आहेत. पहिल्यांदा आधीं असें कीं, ब्रिटिश लोकांना मुळीं कल्पनाशक्तीच नाहीं. पुढें काय घडामोडी होतील त्या त्यांना अजमावतां येत नाहींत. त्यांचें नाक दाबलें तरच तोंड उघडतें. न्यायतः नव्हे, तर सर्वथैव अपरिहार्यतेमुळें, परिस्थितीच्या जोरापुढें आतां टाळाटाळ करतां येणें शक्य नाहीं असें स्पष्ट झालें म्हणजेच, ब्रिटिश लोक अशा बाबतींत कार्यप्रवृत्त होतात. दुसरी गोष्ट म्हणजे, सरकारला असें वाटतें कीं, लोकांना जास्त अधिकार देणें हें साधारणतः ब्रिटिश हिताच्या विरुद्ध आहे, म्हणून अधिकारदानाला सरकारचा केव्हांहि विरोधच असतो. यामुळें, सुधारणा मूर्तस्वरूपांत येईपावेतों, सर व्हॅलेंटाइन् म्हणतात त्याप्रमाणें, त्या दानांतलें स्वारस्य कधींच निघून गेलेलें असतें ! यामुळें, त्या सुधारणा तयार होत असतांना जो विरोध, द्वेष, आणि जें किल्मिष तयार होत असतें, तें त्या सुधारणा देऊन झाल्यानंतरहि शिल्लक राहतें !

लॉर्ड मोर्ले ह्यांना राजकीय मानसशास्त्रांत उपजत अलौकिक बुद्धि असल्यामुळें, ते हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी असतांना ह्या वर सांगितलेल्या गोष्टीची पूर्ण

जाणीव ठेवून होते. लोकांच्या मागणीला उत्तर म्हणून त्यांनीं हिंदुस्थानाला सुधारणा देण्याचें मनाशीं निश्चित केल्यावर, त्यांनीं तत्कालीन व्हाइसरॉय लॉर्ड मिंटो यांना आपली योजना लवकर आंखण्याबद्दल लिहिलें. कारण त्यांनीं असा विचार केला कीं, असल्या बाबतींत दिरंगाई केली तर मग लोक चिडून जाऊन 'राष्ट्रीय कारणाकरितां' सुधारणा मागूं लागतील. म्हणून सुरवात होते की नाहीं याची खात्री करून घेण्याकरितां, त्यांनीं स्वतःच सुरवात करण्याचें देखील योजिलें.

यावरून उघड होईल कीं, सरकारचें संतापजनक वर्तन किंवा सुधारणा देण्यांत असह्य दिरंगाई, यांमुळेंच हिंदी लोक असामान्य वृत्ति धरून बसतात.

वरील विवेचनावरून आतां ब्रिटिश जनतेला आणि जगालाहि स्पष्ट कळून येईल कीं, ब्रिटिश सत्ता आणि ब्रिटिश सैन्य हीं पार निघून जावींत अशी हिंदुस्थानची मुळींच मागणी नाहीं. शिवाय दुसरें असें कीं, हिंदुस्थानची तशी मागणी असो वा नसो, ब्रिटिश लोक कांहीं हिंदुस्थान सोडून जायला निघालेले नाहींत! ते हिंदुस्थानांत आहेत, त्यांचें सैन्य हिंदुस्थानांत आहे—अर्थातच हिंदुस्थानच्या हितासाठीं नव्हे, तर स्वतःच्या हितासाठीं! मि. एच्. जी. वेल्स यांनीं आपल्या 'विल्यम क्लिसोल्डच्या इतिहास' नांवाच्या पुस्तकांत पाश्चात्य राष्ट्रांच्या ढोंगीपणावर चांगली झणझणीत टीका करून दाखविलें आहे कीं, हीं पाश्चात्य राष्ट्रें मागासलेल्या राष्ट्रांत प्रथम शक्तीच्या जोरावर हक्क काबीज करतात, मग त्यांच्या निसर्गदत्त संपत्तीचा यथेच्छ फायदा घेत सुटतात, आणि या कृत्याला मग त्या मागासलेल्या राष्ट्रांची त्यांच्या स्वतःच्याच हितासाठीं चाललेली प्रगति असें नांव देतात!! खरी गोष्ट अशी आहे कीं, ब्रिटिशांना हिंदुस्थानची राजकीय सत्ता पाहिजे आहे ती आपला व्यापारसंबंध रक्षण करण्याकरितां व वाढविण्याकरितां, तसेंच आपल्या लोकांची येथें वर्णी लावण्याकरितां! ब्रिटिशांनीं जर आज हिंदुस्थान सोडलें तर त्यांच्या विलायतेंत इतकी भयंकर बेकारी माजेल कीं, लोक प्रत्यक्ष उपाशीं मरूं लागतील! हिंदुस्थानाला हें पक्कें ठाऊक आहे; आणि 'जास्त गडबड कराल तर आम्ही तुम्हांला सोडून जाऊं, मग तुमची काय दशा होईल तें तुमचें तुम्ही पाहून घ्या' अशा तऱ्हेची धमकी म्हणजे निव्वळ थट्टा, निव्वळ ढोंग आहे, हेंहि तुसतें ऐकल्याबरोबरच त्यांनीं ओळखून ठेविलें आहे!

अलीकडे एकदां ऑक्सफोर्डच्या विद्यार्थ्यांना उद्देशून भाषण करतांना लॉर्ड बर्केनहेड यांनीं असें म्हटल्याचें प्रसिद्ध झालें आहे कीः—

" हिंदुस्थान हा आमचा ठेवा आहे. आमचें जीवन त्याच्यावर आहे. आमच्या स्वदेशांतल्या संपत्तीवर आम्ही वर्षांतून फक्त ६ आठवडे जगूं शकूं. याकरितां रक्ताचा शेवटचा बिंदु जाईपर्यंत हिंदुस्थान हातून जाऊं द्यावयाचें नाहीं, असें करणें आतां तुमच्यावर—तुम्हां तरुण पिढीवर आहे."

त्याच अर्थाचें सर विल्यम जॉयसन् हिक्स यांचेंहि भाषण झालें. हे गृहस्थ कांहीं महिन्यांपूर्वी बाल्डिवन् साहेबांच्या कॅबिनेटमध्यें होम सेक्रेटरी होते. ते म्हणाले:—

" आम्ही जो हिंदुस्थान देश जिंकला, तो हिंदी लोकांच्या हितासाठीं नव्हे. मिशनरी लोकांच्या सभांत असें सांगतात हें मला ठाऊक आहे कीं, आम्ही हिंदुस्थान देश हिंदी लोकांना वर काढण्याकरितां जिंकला ! ही निव्वळ ढोंगी भाषा आहे. हिंदुस्थान देश आम्ही ग्रेट ब्रिटनचा माल खपावा म्हणून जिंकला. हिंदुस्थान आम्ही तरवारीवर जिंकला आहे, आणि तरवारीनें तो आम्ही राखला पाहिजे. मी असें ढोंगी माणसारखें म्हणणार नाहीं कीं, आम्ही हिंदी लोकांच्या फायद्यासाठीं हिंदुस्थान हातीं ठेवलें आहे ! हिंदुस्थान म्हणजे आम्हांला आमचा ब्रिटिश माल आणि विशेषतः लँकाशायरचें कापड खपण्याचें अत्युत्कृष्ट स्थान मिळालेलें आहे."

यावरून उघड आहे कीं, ब्रिटिश लोक निघून जावेत असें हिंदी लोक म्हणत नाहींत, आणि हिंदी लोकांच्या हातांत सत्ता देऊन चंबूगवाळें आटपून एकदांची आगबोट धरावी असें ब्रिटिशांनाहि वाटत नाहीं ! हे प्रश्न आजच्या व्यवहार्य राजकारणाचे नव्हेत ! आणि असें असून, प्रत्यक्ष आज काय सुधारणा करतां येईल याचा विचार चालू असतां असले हे भलते प्रश्न विनाकारण उपस्थित करून मुख्य गोष्टींबद्दल गोंधळ घालण्यांत येत असतो !

निघून जाऊं या धमकीच्या मुळाशीं अशी कल्पना आहे कीं, हिंदुस्थानाला स्वतःची राज्यव्यवस्था स्वतः राखतां येणार नाहीं ! नाहीं, असें वादासाठीं आपण गृहीत धरूं. पण प्रश्न असा कीं, हिंदुस्थानची स्वतःवर राज्य करण्याची आणि देशांत सुव्यवस्था राखण्याची शक्ति जर नष्ट झाली असेल, तर असल्या या दुर्दशेप्रत त्याला आणून सोडलें कोणीं ? उदाहरणार्थ हिंदुस्थानांतल्या ब्रिटिश-सरकारनें देशी राजांच्या मुलखांत सुव्यवस्था राखण्याचें काम आपण पतकरून, त्या राजांना राज्यकारभार सुव्यवस्थित हांकण्याची आपली पात्रता वाढविण्याची तितकी संधि जी मिळणार होती ती नाहींशी केली ! यामुळें पुढें ते मुलखोलप

बनून ' वंशच्छेदाच्या नियमाला ' बळी पडले. ही गोष्ट सर वुइलिअम् हंटर यांनीं डलहौसीच्या चरित्रांत, लंडन् टाइम्समधला एक लांबलचक उतारा देऊन स्पष्ट केली आहे.

याप्रमाणें स्वतंत्र राज्य करण्याचें जें काय सामर्थ्य आमच्या देशी राजेरजवाड्यांमध्यें होतें तें नाहींसें करावयास ब्रिटिश लोकच कारणीभूत झालेले आहेत. पण त्याहूनहि वाईट गोष्ट म्हणजे अशी कीं, त्यांनीं हिंदुस्थानचा राजकीय पायाच पुनः आपल्या मदतीशिवाय कधीं जाग्यावर आणतां येणार नाहीं अशा रीतीनें ढांसळून टाकला आहे. आम्ही मागें एका प्रकरणांत दाखविलेंच आहे कीं, ब्रिटिश राज्य होण्यापूर्वी हिंदुस्थानच्या राजकीय व आर्थिक घटनेचें मुख्य अंग ग्रामपंचायती ह्या असून, देशांत त्या अराजकता होऊं देत नसत किंवा ती आवरून धरीत असत. ब्रिटिश राज्य झाल्यावर प्रथम या ग्रामपंचायतींचे अधिकार खच्ची करण्यांत आले, आणि मग त्या ग्रामपंचायतीच अजीबाद रद्द करून टाकण्यांत आल्या, व त्यामुळें हिंदुस्थानचें राजकीय स्वास्थ्य राखणारा एक घटक नाहींसा झाला.

तरी देखील, सध्यांच्या परिस्थितींत सुद्धां आम्हांला वाटत नाहीं कीं, ब्रिटिश लोक आणि ब्रिटिश सैन्य हिंदुस्थानांतून निघून गेलें म्हणजे मागें अराजकता आणि गोंधळ माजून राहील! कारण हिंदी राष्ट्रानें आतां आपली नाडी पुरती ओळखली आहे. आह्मी आज १८ व्या शतकांत होतों तसे राहिलेलों नाहीं. आम्हांला आज पुष्कळ दिवस समजून चुकलें आहे कीं, आम्हीं सर्व एकाच राष्ट्राचे घटक आहों. बंगाली, मद्रासी, महाराष्ट्रीय, पंजाबी, सगळ्याना वाटत आहे कीं, आपण हिंदी आहों. तसाच आणीबाणीचा प्रसंग आला तर आम्हीं हीच राष्ट्रीय दृष्टि दाखविल्याशिवाय राहूं काय? नाहीं! कधींहि नाहीं!

नुसतें एक स्टॅटयूटरी कमिशन असमाधानकारक नेमल्याची—सबंध देशाच्या एवढ्या मोठ्या विशाल जीवितांतील त्या मानानें एक क्षुल्लक गोष्ट, पण तिनें देखील कित्येक विरोधी घटकांना एक केलें आहे. अलीकडे—म्हणजे निदान देशाचें सगळें लक्ष कमिशनकडे लागल्यापासून—आपणास हिंदु-मुसलमानांचे दंगे इतके ऐकूं येतात काय? असें हें ऐक्य जर आम्ही आज करूं शकतों, तर आज ब्रिटिश निघून गेले म्हणजे त्या ऐन आणीबाणीच्या वेळीं आम्ही आमची साधनसामग्री एकत्र करावयास चुकूं काय?

कित्येकजण म्हणतात कीं, त्या वेळीं मग हिंदु-मुसलमानांत यादवी माजल्याशिवाय राहणार नाहीं. आधार म्हणून याला ते सध्यांच्या हिंदुमुसलमानांमधील

मैबनावाकडे बोट दाखवितात. हे हिंदु-मुसलमानांचे दंगे ब्रिटिश आणि पर-राष्ट्रीय वर्तमानपत्रांतून इतक्या अतिशयोक्तीच्या स्वरूपाला पोंचविलेले आहेत की, ते वाचून एखाद्याला वाटावयाचें कीं हिंदुस्थानांत शांततेचा असा एकहि दिवस किंवा शांततेचें असें एकहि ठिकाण शिल्लक नाहीं ! परंतु ऐकून पुष्कळांना आश्चर्य वाटेल कीं या दंग्यांत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीनें संबंध आलेल्या सर्व लोकांची या घटकेपर्यंतची संख्या हिंदुस्थानच्या एकंदर प्रजेच्या शेंकडा $\frac{१}{२}$ वर कांहीं पोंचत नाहीं !

परंतु हे लहान सहान दंगेधोपे देखील पुष्कळदां तृतीय पक्ष म्हणजे परकीय सरकार आहे म्हणूनच होतात. आमचा असें म्हणण्याचा उद्देश नाहीं कीं, या दंग्याधोप्यांना ब्रिटिश अधिकारी प्रत्यक्षपणें चिथावणी देतात ! तरी देखील, ब्रिटिश लोकांनीं आपलें पुरातन 'तोडून फोडण्याचें' तत्व सर्वस्वी सोडून दिलें आहे कीं नाहीं याबद्दल आम्हांला अद्याप शंका आहेच ! आमच्या म्हणण्याचा अर्थ हा कीं, तृतीय पक्ष असला म्हणजे भांडणाऱ्या पक्षांना आपापसांत तंटा मिटवून घेण्याची जबाबदारी वाटत नाहीं, यामुळें भांडण तसेंच चालू राहतें. ब्रिटिश लोकांनीं जी कल्पना करून घेतली आहे—आणि जी ते स्वहेतुसिद्धयर्थ नेटानें पसरवीत आहेत—ती ही कीं, या परस्परद्रोही घटकांना कोणी आवरून धरतील तर ते एकटे ब्रिटिश लोकच. पण असें जर आहे तर असले हे दंगेधोपे हिंदी संस्थानांत फारसे होत नाहींत ते कसे ?

समजा कीं, हिंदुमुसलमानांना सामोपचारानें मिटतें घेतां न येऊन, त्यांच्यांत यादवी सुरू झाली. पण युद्धाला देखील शेवट हा आहेच ! दोघेहि दमले कीं, मग तरी समेट करतील, आणि तो समेट कायमचा होईल ! शिवाय यादवी म्हणजे अशी काय अगदीं जगावाहेरची गोष्ट लागून राहिली आहे ! एका महत्वाच्या प्रश्नाचा निकाल युनायटेड स्टेटसनें यादवीनेंच लावून घेतला नव्हे काय ? मग तसलाच एक प्रश्न कायमचा मिटवून, भेद आहे तेथें ऐक्य घडवून आणण्याकरितां, हिंदुस्थानांतच तेवढी यादवी अनिष्ट कां मानावी ? स्विट्झर्लंडचें उदाहरण तर याहूनहि विशेष लागू पडण्यासारखें आहे. अमेरिकेचे माजी प्रेसिडेंट डॉ. वुड्रो विल्सन आपल्या 'स्टेट' या पुस्तकांत म्हणतातः—"स्विट्झर्लंडमध्यें यादवी झाली ती राजकीय मतभिन्नतेमुळें नसून धार्मिक मतभिन्नतेमुळें होय; आणि या यादवीनें मग त्या भिन्नतेंतून ऐक्य उत्पन्न झालें." स्विस् लोकांमधलें १८४७ मं

परस्परांतलें युद्ध अगदीं एक घाव दोन तुकडे असें होऊन अंतःस्थ भानगडी कायमच्या मिटल्या गेल्या.

समजा कीं, हिंदुस्थानांतल्या या यादवीनें परस्परांतील कलह सामोपचारानें न मिटतां, एका पक्षाचा विजय होऊन दुसरा पक्ष खालीं पडला. समजा, हिंदु जिंकले. हिंदु राजवटीनें अगदीं मूळपासून अखेरपर्यंत मुसलमानांना सहिष्णुतेनें वागविलेलें आहे, आणि मुसलमानहि हिंदु राज्यांत अगदीं पूर्ण विश्वास संपादन करून घ्यावयास चुकलेले नाहींत. म्हैसूरच्या हिंदु संस्थानचे दिवाण आज एक मुसलमान गृहस्थ आहेत. किंवा समजा कीं, मुसलमान विजयी झाले आणि मुसलमानी राज्य स्थापन झालें. पण अगदीं कडव्या मोगल बादशहाच्या कारकीर्दींत देखील हिंदु लोकांवर पूर्ण विश्वास ठेवून त्यांना मोठमोठ्या जबाबदारीच्या जागांवर नेमण्यांत येई. आजची परिस्थिति त्याहून कितीतरी निवळलेली आहे. येथें हेंहि सांगून टाकूं कीं, हैदराबादच्या मुसलमान संस्थानचे दिवाण आज हिंदु आहेत!

हिंदुस्थानांत हिंदु राज्य झालें किंवा मुसलमानी राज्य झालें; एकूण परकी राज्य तर नव्हे ना! आजच्याहून वाईट स्थिति तर होणार नाहीं खास! पैशाची ओहोटी अजीबाद बंद होईल. देशांतले उद्योगधंदे जे आज ब्रिटिश राजसत्तेच्या अनुकूल वातावरणांत ब्रिटिश मालाला करतां येत असलेल्या चढाईनें आणि स्पर्धेनें मरणोन्मुख पडले आहेत ते जिवंत होतील आणि त्यामुळें दारिद्र्याचें एक महत्वाचें कारण नाहींसें होईल. कै. टिळकांसारखे कट्टे हिंदु लोकनायक, पण त्यांनासुद्धां परकी ब्रिटिश राज्यापेक्षां परचें—मुसलमानी राज्य सुद्धां—पसंत होतें!

परंतु यावर असें म्हणतील कीं, अफगाणिस्थानासारखे हद्दीवरचे देश स्वारी करतील त्याचें काय? त्यावर उत्तर असें कीं, ही भीति आजदेखील आहे. रशियाचें बोल्शेव्हिक सरकार कांहीं कारस्थान करीत नसेल ना, अशी भीति आजहि ब्रिटिश सरकारला वाटत नाहीं काय? आम्हांला तर असें वाटतें कीं, एकदां हिंदी (हिंदु-मुसलमान) राज्य, किंवा मुसलमानी राज्य, किंवा हिंदु राज्य, झालें म्हणजे तें प्रबळ सैन्य ठेवून परशत्रूपासून रक्षण करण्याची योग्य ती तजवीज करीलच!

त्यावरहि पुनः असा मुद्दा येतो कीं, देशांत आपसांत लढाई चालू असतांना जर एखाद्यानें स्वारी केली तर तो हा देश सहज जिंकून जाईल! परंतु आम्हांला मात्र कांहीं तशी खात्री वाटत नाहीं. कारण स्वारी झाली तर त्यामुळेंच कदाचित्

देशांत एकी होऊन शत्रु उडविला जायचा ! आणि राज्यव्यवस्था जर अगोदरच कायमची स्थापन झालेली असेल, तर शत्रुदेखील स्वारीचें धाडस करण्यापूर्वी जरा विचारच करील !

परंतु कांहीं म्हटलें तरी भीति काय ती एकट्या अफगाणिस्थानची ! त्याच्या जोडीस मिस् मेयोनें वायव्य सरहद्दीवरच्या 'लुटारूं'ना आणलें आहे— कारण 'लुटारू' म्हटले कीं ते मिस् मेयोसारख्या बायकांचे आणि त्यांतल्या त्यांत 'कुमारिकां'चे लाल, हें मिस् मेयोच्या रसभरित वर्णनावरूनच उघड होत आहे ! हे दोघे एक झाले कीं, मिस् मेयो म्हणते, ते हिंदी लोकांना जिवंत भाजून काढतील ! या तिच्या म्हणण्यांत कांहीं तरी तथ्य आहे काय ? अफगाणिस्थानची अगोदर लोकसंख्या किती ? तर ५० लाख; वायव्य सरहद्द प्रांताची लोकसंख्या किती ? तर ५ लाख. हे ५५ लाख लोक ३२ कोटि हिंदी लोकांना जिंकून ताब्यांत ठेवणार आहेत काय ? किती असंभाव्य गोष्टी आपण बोलत आहों ह्या !

प्राचीन काळीं अफगाणिस्थान हें हिंदुस्थानचाच एक भाग असून त्यावर हिंदुस्थानचीच सत्ता चाले. कर्नल टॉड् आपल्या 'राजस्थान' ग्रंथांत सांगतात कीं, विक्रमाच्या पूर्वी बराच काल जेसलमीरच्या यदुवंशाची सत्ता गिझनीपासून समरकंदपर्यंत होती, असें त्या वंशाच्या यादींत लिहिलेलें आढळतें. "ही तर गोष्ट आतां सिद्धच आहे कीं, हा सर्व प्रदेश मुसलमानी धर्माच्या आरंभींच्या अमदानींत हिंदु राजांच्या सत्तेखालीं होता, आणि नंतरहि तो पुनः सत्तेखालीं आणण्यासाठीं हिंदु राजांनीं अनेक वेळां यत्न केलेले होते. त्याचें एक अतिशय ठळक असें उदाहरण बाबरानें गिझनीचें वर्णन करतांना दिलें आहे. तें असें कीं, हिंदुस्थानच्या राजानें जेव्हां गिझनीला वेढा घातला तेव्हां आंत असलेल्या सबक्तगीनानें पाण्याच्या झऱ्यांत गोमांस टाकावयाचा हुकूम केला, त्यामुळें हिंदूंना वेढा उठवून निघून जाणें भाग पडलें."

अलीकडच्या काळीं परकीय स्वाऱ्या हिंदुस्थानावर झाल्या त्याचें कारण हिंदुस्थानच्या लोकांत आपण सगळे एकाच राष्ट्राचे प्रजाजन आहों याची कल्पना उद्भूत झाली नव्हती. आज ती स्थिति पार पालटून गेली आहे. हिंदुस्थान आज शंभर वर्षे एकछत्राखालीं आहे, आणि प्रत्येक हिंदी इसमास वाटत आहे कीं, आपली भूमि म्हणजे एखादा जिल्हा किंवा प्रांत एवढीच नसून सबंध भरतभूमि होय.

१८ व्या आणि १९ व्या शतकांत देखील, पंजाबांत शीख लोकांचें राज्य असतां अफगाणिस्थान शीखांना थरकांप भीत असे! आणि वायव्य सरहद्दीवरील लोकांना तर शीख लोक नुसतीं मेंढरें समजत! वायव्य-सरहद्द-चौकशी-कमिटीच्या रिपोर्टावरून देखील शीख अंमलांत या लोकांची काय पराधीन स्थिति होती हें स्पष्ट दिसतें, आणि असें असून पुनः मिस् मेयो इकडे निर्लज्जपणानें म्हणतेच आहे कीः—

"ब्रिटिश लोक आहेत—दुसरे कोणी नव्हेत—म्हणूनच आज हिंदूंना खैबर घाटांत पाऊल टाकतां येतें. ब्रिटिश साम्राज्याची दरक येथवर येऊन पोंचली नव्हती तोंपर्यंत हिंदु लोकांना बायकांचा वेष घेऊन स्वारींत बसल्याशिवाय जिवंत सुटावयाची सोयच नव्हती!"

केवढें थक्क करून टाकणारें खोटसाळ विधान हें! वास्तविक, प्राचीन कालापासून हिंदुस्थान, अफगाणिस्थान, आणि मध्य आशिया, यांच्यामध्यें सरास व्यापार चालू असून त्याचा हमरस्ता म्हणजे खैबर घांटच! वायव्य सरहद्दीवरच्या टोळ्या चांगल्या दाबांत ठेविल्या जात असत एवढेंच नव्हे तर त्या, खैबर घांटाच्या दोन टोंकांस दोन बसलेल्या सरकारांना थरकांप भीत असत! शीख लोकांची सत्ता स्थापन होण्यापूर्वी देखील, सुप्रसिद्ध राघोबा दादा पेशवे यांनीं या टोळ्यांना चांगली दहशत बसवून ठेविलेली होती, आणि अगदीं अलीकडेपर्यंत लाहोरमधल्या एका रस्त्याचें नांव "राघोबादादा रस्ता" असें होतें.

परक्यांची स्वारी होईल या कल्पनेच्या मुळाशीं अशी एक दुसरी कल्पना आहे कीं, लुटालुटीशिवाय ज्यांना जगांत दुसरें कांहींच दिसत नाहीं अशा कित्येक लोकांप्रमाणें, अफगाण लोकहि हिंदुस्थानावर झेंप घालावयास अगदीं जसे काय टपून बसलेले आहेत! मिस् मेयोनें त्यांचें असेंच वर्णन केलें आहे. ती म्हणते, "शिवाय, समोर चकाकणाऱ्या हिंदुस्थानरूपी भक्ष्यावर लकलकणारे हिरवट डोळे लावून अफगाणिस्थानचा चित्ता झेंप घालावयास मागें टपून बसलेला आहे, आणि केव्हां एकदां हद्दीवरून उडी टाकून मुसलमानांनीं भरलेल्या पंजाबांतून इस्लामी चांदाचें निशाण फडकावीन, जाऊं तेथें मागें सर्व मुसलमानमय करून सोडीन, आपण हिंदुस्थानांत घुसूं असें त्याच्या डोक्यांत सारखें भ्रमण चाललें आहे!" परंतु खरोखरच असे विचार आज अफगाण लोकांच्या डोक्यांत येत आहेत काय? अफगाण लोकांवर मिस् मेयोनें हा निव्वळ अन्याय चालविला आहे नव्हे काय?

अलीकडे तर अफगाणिस्थानने आपली केवढी तरी सुधारणा केली आहे, आणि गतकालांत त्यांच्या डोक्यांत काय कल्पना असतील त्या असोत, आज तरी त्या खास नाहींत ! शिवाय त्यांनीं थगदीं उच्या मारून पळावें इतकी हिंदुस्थानांत तरी आतां संपत्ति कुठें उरली आहे !

खरें अफगाणिस्थानाला थोपवून धरलें आहे कोणी ? तर 'इंग्लिश लोकांनीं' ! वास्तविक अफगाण तर ब्रिटिशांना मुळींच भीत नाहींत ! शिवाय आपण स्वारी केली तर हिंदी लोक ब्रिटिशांनाच धरून राहतील अशी मिस् मेयोला खात्री आहे काय ? अफगाण लोकांनीं जर मनावरच घेतलें तर बोल्शेव्हिक रशियाच्या सहाय्यानें त्यांना काय करतां येणार नाहीं ? परंतु वस्तुस्थिति अशी आहे कीं, त्यांच्या तें मनांतच नाहीं, शिवाय चांगली खंडणी देऊन ब्रिटिशहि त्यांना आपल्या बाजूस धरून आहेत.

तसेच चांगले तह करून हिंदी राज्याला किंवा मुसलमानी राज्याला किंवा हिंदु राज्याला अफगाणिस्थानचा त्रास चुकविणें कठीण जाईल काय ? नाहीं, असें निदान आम्हांला तरी वाटतें.

परंतु समजा कीं अनिष्ट व्हावयाचें तें होऊन, अफगाण लोकांनीं हिंदुस्थानवर स्वारी केली आणि अफगाण राज्य स्थापिलें ! त्यानें हिंदुस्थानची आजच्याहून काय वाईट स्थिति होणार आहे ? नुकतेच हिंदुस्थानांतून गेलेले अफगाणिस्थानचे अमीर हे तर चांगले सुसंस्कृत सत्ताधीश दिसले. त्यांनीं आपल्या स्वधर्मीयांना हिंदु लोकांशीं स्नेहभावानें वागा असाच उपदेश केला. त्यांच्या अफगाणिस्थान देशांत कायम वस्ती करून राहिलेले असे बरेच हिंदु लोक आहेत, त्यांचा त्यांनीं मुसलमानांइतकाच दर्जा ठेवलेला आहे, आणि हिंदु लोकांच्या भावना दुखावतील म्हणून त्यांनीं उघड्या जागेंत गोवधाला सुद्धां बंदी केली आहे. असें असतां, ब्रिटिश गेले तर हिंदुस्थानवर अफगाण राज्य म्हणजे केवढें अरिष्ट कोसळणार आहे असा जो बाऊ परकी लेखक करून दाखवितात, तो तसा खरोखरच बाऊ आहे काय ?

अफगाण लोकांची ही स्वारी झाली म्हणजे हिंदु लोक नामशेष होऊन जातील असें सांगण्यांत येतें. अर्थात् ते जगले आहेत कोणामुळें ? तर ६० हजार ब्रिटिश सैन्यामुळें ! यावर आम्ही विचारतों कीं, ज्या अफगाण स्वारीसंबंधानें अशी ही काल्पनिक भीति घालण्यांत येते, ती ही हिंदुस्थानावर मुसलमानांची स्वारी पहि-

त्यानेंच होणार आहे, कीं, अशा आजपर्यंत हिंदुस्थानावर मुसलमानांच्या अनेक स्वाऱ्या झाल्या आहेत, आणि मुसलमानी राज्येंहि स्थापन होऊन गेलीं आहेत ? मग त्या स्वाऱ्यांतून हिंदु टिकले कसे ? एवढेंच नव्हे तर इतक्या स्वाऱ्यांतून पृथ्वीच्या पाठीवर कोणतेही लोक टिकून राहिले नाहींत इतके हिंदु लोक टिकून राहिले, आणि ते पुनः शतकेंच्या शतकें टिकून राहिले, ते कसे ? म्हणजे याचा अर्थ एवढाच कीं, हिंदु मानववंश नामशेष होण्याचा हा बागुलबोवा, एकतर मिस् मेयो सारख्या लेखकांच्या केवळ इच्छेचें प्रतिबिंब असला पाहिजे, किंवा तो ब्रिटिश सत्ता हिंदुस्थानांत कायम रहावी या तत्वास पुष्टि मिळविण्याकरितां मुद्दामच उभा केला असला पाहिजे !

यावरहि वादासाठीं आपण क्षणभर असें समजूं कीं, ब्रिटिश निघून गेल्यानंतर मिस् मेयोची इच्छा सफल होऊन हिंदुस्थानवर सारख्या स्वाऱ्यांवर स्वाऱ्या होऊन हिंदु लोक साफ नामशेष झाले ! तर काय ? तें महात्मा गांधी आपल्या अगदीं थोडक्यांत मुद्यापुरतें शांतपणें उत्तर देण्याच्या पद्धतीनें सांगतातः—

" समजा, मिस् मेयोच्या खटपटीचा उपयोग झाला; आणि लीग ऑफ नेशन्सनें हिंदुस्थान देशाला सुटला जावयास नालायक ठरवून बाजीत टाकलें; तर मला वाटतें पूर्व आणि पश्चिम या दोघींचाहि फायदाच होईल. मग कदाचित् आमच्या आपापसांत लढाया सुरू होतील; त्यांत मिस् मेयो भीति घालीत आहे तशी वायव्येकडून आणि मध्य एशियांतून टोळधाड येऊन हिंदु लोकांचा कदाचित् फन्ना उडेल,—पण तें क्षणोक्षणीं वाढत जाणाऱ्या पौरुषनाशाहून शतपट बरें ! जिवंत भाजून मारण्याच्या दिरंगाई पद्धतीहून सरळ एकदम विजेच्या धक्क्यानें मारण्याची पद्धत जशी जास्त दयाशीलतेची; तद्वत् आम्ही हे मिस् मेयोनें वर्णिल्याप्रमाणें प्रतिकारशून्य, घाणेरडे, भोळसर, आणि कामशय्येवर लोळणारे लोक, आज या क्षणीं जें अपमानास्पद जिवंत मरण भोगीत आहों, त्याहून मध्य-आशियांतल्या प्रचंड वीरसमूहाच्या एका झेंपेनें जर आम्ही स्वर्ग गांठला, तर केवढे उपकार बरें ? "

अतएव कोणत्याहि दृष्टीनें विचार केला तरी आज या घटकेला ब्रिटिश निघून गेल्यानें अशी कोणतीहि आपत्ति ओढवणार नाहीं कीं, जी टाळण्याकरितां ब्रिटिश लोकांनीं आमच्यावर सदैव सत्ता चालवीत रहावें अशी आम्ही इच्छा धरावी !

प्रश्न वास्तविक व्यवहार्य राजकारणाचा नव्हे. ब्रिटिशांना चंबूगवाळ्यासकट पार हांकून द्यावें, अशी हिंदी लोकांमध्यें ताकद असली तरी इच्छा नाहीं. हिंदु-

स्थानाला फक्त ब्रिटिश सत्तेखालीं जबाबदार राज्यपद्धति तेवढी पाहिजे आहे. सध्यां लष्कर आणि परराष्ट्रीय व्यवहार ब्रिटिशांच्याच ताब्यांत ठेवावयास तें तयार आहे. इकडे ब्रिटिश लोकांचीहि निघून जाण्याची धमकी काडीमात्र देखील मनापासून नाहीं. हिंदुस्थानांत ते स्वहितासाठीं सत्ता धरून आहेत. त्यांना ब्रिटिश व्यापार हिंदुस्थानात कायम राखून वाढवावयाचा आहे, आणि ब्रिटिश लोकांची एरवीं उपासमार होईल ती टाळण्याकरितां हिंदुस्थानांत त्यांची उदरनिर्वाहाची सोय करावयाची आहे.

तथापि आम्ही हा प्रश्न व्यवहार्य राजकारणाचा नसला तरी तो तसा आहे असें कल्पून विचारांत घेतला आहे; आणि ब्रिटिश निघून गेल्यानें काय काय भानगडी उपस्थित होणें शक्य आहे त्या सगळ्या बारकाईनें तपासून, मिस् मेयोनें काढलेला एकहि निष्कर्ष कसा टिकूं शकत नाहीं, हें निर्विवाद सिद्ध केलें आहे.

---

## प्रकरण २० वें.

# पुढें काय ?

—*:०:*—

प्रस्तुत पुस्तक राजकारणविषयक नव्हे. तें मुख्यतः 'मदर इंडिया'ला उत्तर म्हणून आहे. त्यांत राजकारणविषयक प्रश्न आले असतील तर ते, मिस् मेयोनें कोणत्या ठिकाणीं चूक केली आहे, हिंदुस्थानांतल्या परिस्थितीचा कोणत्या ठिकाणीं विपर्यास केला आहे, आणि खरी परिस्थिति काय आहे, हें दाखवून देण्यापुरतेच. वास्तव या ठिकाणीं, हिंदुस्थानची भावी राज्यघटना काय असावी याचा आम्हांस विचार कर्तव्य नाहीं. शिवाय तसा विचार करावयाचा तर एक स्वतंत्रच पुस्तक लिहावें लागेल. या प्रकरणांत आम्ही फक्त मिस् मेयोनें उपस्थित केलेल्या कांहीं मुद्यांचा साधारणपणें विचार करून, तिनें हिंदुस्थानच्या सार्वजनिक कार्यकर्त्यासंबंधानें आणि राजकीय प्रगतीसंबंधानें केलेल्या कांहीं विधानांचा समाचार घ्यावयाचें योजिलें आहे.

"वरिष्ट जागीं असलेले हिंदी इसम धडधडीत खोटीं विधानें करतात; मग कागदपत्रांचा आधार देतात; आणि हे कागद हुडकून पाहिले तर ते त्या विषयाला एक तर लागूच पडत नाहींत, किंवा तें विधान तरी खोटें पाडतात ! हा काय प्रकार

आहे ?" मिस् मेयो साळसूदपणें प्रश्न करते; अर्थ असा कीं, हिंदुस्थानांतले उच्च दर्जाचे लोक स्वभावतःच खोटें बोलणारे असतात ! आणि तो आरोप आणणारी कोण तर खुद्द लबाडांची महामाया ! खाशी ! !

अर्थातच आपल्या चालू वहिवाटीनुसार, ती एकाहि थोर हिंदी गृहस्थानें कुठें खोटें विधान केल्याचें एकदेखोल उदाहरण देत नाहीं ! कारण ती ओळखून आहे कीं, जें विधान ती खोटें म्हणून म्हणणार तें पुराव्यासकट खरें म्हणून ठरणार आहे !

उदाहरणार्थ, 'ब्रिटिश राजवटींत हिंदुस्थानची गरिबी वाढली आहे' हें एक वादाचें विधान घ्या. हिंदुस्थानांतल्या पुष्कळ राजकारणी पुरुषांना तें खरें वाटत असून तें त्यांनीं अनेक वेळां उच्चारिलेलें आहे. पण मिस् मेयो आपल्या ठरीव लेखनपद्धतीप्रमाणें बेधडक म्हणून टाकणार कीं 'खोटें !' आतां मिस् मेयो तें खोटें म्हणते, म्हणून तें खरोखरच खोटें असलें पाहिजे असें आपण म्हणावयाचें काय ? वास्तविक सदरहू विधान ब्रिटिश राज्यकारभारी, ब्रिटिश मुत्सद्दी, आणि ब्रिटिश इतिहासकार, यांच्या मतांवरून बनविलेलें आहे. त्यांचे आधार आम्ही सदरहू विधानाच्या समर्थनार्थ मागें पांचव्या प्रकरणांत दिलेले आहेत. फार तर एवढेंच म्हणतां येईल कीं, तें एक वैयक्तिक मत आहे. पण हिंदी राजकारणी लोक खोटेंच बोलतात असें त्यावरून कसें म्हणतां येतें ?

स्वतःच्या युनायटेड् स्टेट्स् देशाच्या सार्वजनिक आयुष्याचा अनुभव असलेल्या मिस् मेयोनें, अद्याप निरढावलेले न बनलेल्या हिंदुस्थानच्या राजकारणी पुरुषांवर खोटें बोलण्याच्या संवयीचा आरोप करावा हें आश्चर्य नव्हे काय ? अमेरिकेंतल्या व युनायटेड किंग्डममधल्या राजकारणी लोकांची नीतिमत्ता हा तर राजकारणविषयावरील लेखकांचा सदांचाच टीकाविषय होऊन बसला आहे ! इंग्लंडांत आणि पाश्चात्य देशांत, म्हणजे जेथें प्रजासत्ताक राज्य आहे तेथें, सार्वजनिक कार्यकर्ते व राजकारणी पुरुष यांना सत्याकडे दुर्लक्ष करण्याची संवयच झाल्यामुळें किती हलके समजतात हें 'सार्वजनिक आयुष्य' या पुस्तकाचे कर्ते मि. स्पेंडर यांनीं कित्येक उदाहरणें देऊन दाखविलें आहे.

सध्यांचे मुख्य प्रधान मि. बॉल्डवीन् यांच्या 'सत्यनिष्ठा आणि राजकारण' या विषयावरील व्याख्यानाचा आम्ही मागें ११ व्या प्रकरणांत आरंभींच उल्लेख केला आहे. त्या व्याख्यानांत ते हेंच सांगतात. त्यांनीं आपला अर्थ व्यक्त करा-

चयास ' सत्याला रजा ' अशी शब्दयोजना केलेली आहे; ही ' रजा ' राजकारणी लोक एखादी चळवळ किंवा मोहीम सुरू करावयाची झणजे देत असतात. खुद्द मिस् मेयोचे देशबंधु प्रेसिडेंट रुझ्वेल्ट, हे सत्याला प्रस्थान न देणाऱ्यांपैकीं एक वडें घेंड होते !

सदरहू व्याख्यानांत मि. बॉल्डवीन् यांनीं, राजकारणी लोकांना या संबंधांत काय अडचणी येतात तें चांगलें विशद केलेलें आहे. लोकमतानुवर्ति राज्यव्यवस्था म्हणजे सामान्य जनतेकडे प्रश्न सोंपविणें; सामान्य जनतेवर विचारापेक्षां भावनेचाच जास्त परिणाम होणार; आणि पक्षभेदावर राज्यव्यवस्था असली म्हणजे लोकांना आपल्या बाजूस वळवून घेण्याकरितां एक पक्ष दुसऱ्या पक्षाची निंदा करणार ! ह्या अगदीं सामान्य गोष्टी वाटेच्या वाटसराला सुद्धां ठाऊक असतात. पण मिस् मेयो आपणास अमेरिकेचें किंवा युनायटेड् किंग्डमचें सार्वजनिक जीवित माहीत नाहीं असें ढोंग करून, फक्त हिंदी राजकारण्यालाच तेवढा दोष देत आहे !

मतदारांची दिशाभूल करण्याकरितां वाटेल त्या साधनांचा निःशंकपणें उपयोग करावयाचा ही खोड इंग्लंडमध्यें दुसऱ्या कोणत्याही पक्षापेक्षां कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाला जास्त आहे. ( लॉवेलकृत ' इंग्लंडची राज्यव्यवस्था ' भाग २ रा पहा ). गेल्या निवडणुकीच्या वेळीं मजूर पक्षाला पाडण्याकरितां कॉन्झर्व्हेटिव्ह लोकांनीं अगदीं ऐन वेळीं एक खोटेंच पत्र रशियाकडून आलेलें म्हणून प्रसिद्ध केलें नाहीं काय ?

' राजकारणांतला दुटप्पीपणा ' ज्याला म्हणतात, त्याचा सविस्तर विचार मि. हॅमिल्टन फाइफ यांनीं ' राज्यव्यवस्थेची भावी दशा ' या अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या एका पुस्तकांत फार उत्कृष्ट रीतीनें केला आहे. मि. फाइफ म्हणतात कीं ' राजकारणांत जें हलक्या प्रतीचें वर्तन दिसून येतें, तें राजकारणी लोक इतरांपेक्षां कमी अमूदार किंवा कमी प्रामाणिक असतात म्हणून नव्हे, तर तो केवळ पक्षभेदपद्धतीचा परिणाम आहे.' राजकारणी लोक कसे असतात हें दाखविण्याकरितां त्यांनीं लॉर्ड किचनेरच्या एका पत्राचा उल्लेख केला आहे. लॉर्ड किचनेर कॅबिनेट प्रधानगिरीचा पहिलाच अनुभव घेतल्यानंतर, आपल्या सभोंवतालच्या राजकारणी लोकांसंबंधानें एका मित्रास लिहितात:—" या लोकांचें वर्तन काय किंमतीचें होतें, असें तुला वाटतें ? मला तर युवा कल्पनाच नव्हती !"

दुसऱ्यांवर खोटें बोलण्याचा आरोप करणाऱ्यांना एक मोठी भीति असते; ती ही कीं, बाण उलट त्यांच्यावरच येऊन बसण्याचा संभव असतो. 'दुसऱ्यांचे दोष काढूं नका, नाहींतर तुमचेहि दोष बाहेर पडावयाचे,' ह्या हितकर उपदेशानुसार कित्येक लोक वागतील तर फार चांगलें होईल ! मिस् मेयोसारख्या कांचेच्या घरांत राहणाऱ्यांनीं तर दुसऱ्यांच्या घरांवर दगड फेंकण्याचें मुळींच मनांत आणूं नये !

मिस् मेयो तर यःकश्चित्. पण मोठमोठ्या लोकांना पश्चात्ताप करावा लागला आहे ! चार्लस किंग्स्लेनीं कार्डिनल् न्यूमनवर पद्धतशीर लबाडी शिकविण्याचा आरोप केला. त्यावर न्यूमननीं किंग्स्लेवरच नव्हे तर त्याच्या सगळ्या धर्मपंथावरच यथास्थित शेकलें !! ही इंग्लंडची गोष्ट. आतां हिंदुस्थानची घ्या. लॉर्ड कर्झन व्हाइसरॉय या नात्यानें कलकत्ता युनिव्हर्सिटीचे चॅन्सलर होते. तेव्हां त्यांनीं एकदां पदवीदानसमारंभाच्या वेळच्या आपल्या भाषणांत सगळ्या हिंदु लोकांवर आग पाखडून त्यांना लबाड बोलणारे म्हणून ठरविलें. मग काय विचारतां ! 'अमृत बझार पत्रिका' ती ! संपादक चिरस्मरणीय मोतीलाल घोस ! लॉर्ड कर्झननीं 'दूरच्या पूर्वेकडील प्रवास' या आपल्या पुस्तकांत आपण स्वतः काय काय किती किती खोटें बोललों होतों हें मोठ्या अभिमानानें सांगितलेलें होतें ! तें जसेंच्या तसें मोतीलाल बाबूंनीं दुसऱ्याच दिवशीं छापून टाकलें ! वृत्तपत्रकाराच्या कौशल्याची ही कमाल चिरस्मरणीय होय ! त्या वेळीं लॉर्ड कर्झनना शरमेनें कुठें तोंड लपवूं असें होऊन, मुकाट्यानें त्या लेखाचा तो भाग त्यांनीं आपल्या ग्रंथाच्या पुढील आवृत्तींतून गाळून टाकला !!

याकरितां पाश्चात्यांनीं इतःपर सावधगिरी ठेवावी; कारण हिंदु लोकांइतके सत्यप्रिय लोक जगांत दुसरे कोणीहि नाहींत. दूर राहून मिस् मेयोच्या लबाड्या वाचून तें कळून येणार नाहीं, त्याकरितां हिंदुस्थानांत स्वतः येऊन पाहिलें पाहिजे. प्राचीन काळापासून जे जे परकी लोक हिंदुस्थानांत आले, त्या सर्वांनीं याबद्दल कबुली दिली आहे. ग्रीक प्रवासी मेगॅस्थेनीस्, चिनी प्रवासी ह्युएन्त्संग्, मुसलमान इतिहासकार अबुल फझल, हे सगळे हिंदु लोकांच्या सत्यनिष्ठेची साक्ष देत आहेत. अलीकडच्या काळीं, सर जॉन् माल्कम् ह्यांनीं 'हिंदु लोकांची सत्य-निष्ठा त्यांच्या धैर्याइतकीच विलक्षण आहे,' असें म्हटलेलें आहे; आणि प्रोफेसर मॅक्स मुलर 'हिंदुस्थानः त्याजपासून आपणास काय शिकतां येईल ?' या आपल्या पुस्तकांत म्हणतात कीं, "ज्या ज्या लोकांचा हिंदुस्थानशीं संबंध येई, त्या सर्वांना सत्यप्रियता हेंच हिंदी लोकांच्या राष्ट्रीय शीलाचें प्रमुख अंग असें दिसून येई."

झालेली आहे. एवढेंच जरी त्यांनीं केलें असलें तरी देखील त्यांनीं वरीच कामगिरी केली असें मी म्हणेन. " ( एशियाटिक रिव्यू एप्रिल १९२६. )

आणखी एक मिस् मेयोच्या भात्यांतून विषारी बाण डोकावतो आहे ! पण नीट तपासून पाहिलें तर नेहमींचीच शिळी बाजारगप्प ! " हिंदुस्थानाला आज मतदारसंघ—त्या शब्दाचा कोणताहि व्यावहारिक अर्थ घेतला तरी—नाहीं, आणि सध्यांच्या तत्वानुसार आणखी पिढयान् पिढयाहि मिळणार नाहीं ! " इतक्या दुष्ट भावनेनें ही जी मिस् मेयो बोलते आहे, ती तिची मतदारसंघाची कल्पना तरी काय आहे ? तिला यांत काय ध्वनित करावयाचें आहे तें उघडच दिसतें आहे. तें निव्वळ आगलावेपणाचें असून, तिचा हेतुहि अत्यंत दुष्टपणाचा आहे. हें विधान तिनें आपला देवदूत जो ब्रिटिश अधिकारी त्याला संतुष्ट करण्याकरितां केलें आहे ! तिच्या पुस्तकावर टीका करतांना एकानें म्हटल्याप्रमाणें, हें लिहिते आहे मिस् मेयो, पण मागें बोलतो आहे ब्रिटिश अंमलदार !

हिंदुस्थानांत आज ६० लाख मतदार आहेत. मताची पात्रता हिंदुस्थानांतल्या परिस्थितीला झेंपणार नाहीं इतकी उच्च ठेवलेली आहे. ती कमी करून—आणि करतां येण्यासारखी आहे—आणखी निदान १ कोट तरी मतदार वाढविले पाहिजेत. हीहि एक गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे कीं, गेल्या तीन निवडणुकींत प्रत्यक्ष मत देणाऱ्या लोकांची संख्या सतत वाढत आली आहे, आणि गेल्या निवडणुकींत तर एकट्या असेंब्लीसाठीं शेंकडा ४८ वर मतदारांनीं आपलीं मतें दिलीं आहेत. बहुतेक हेंच प्रमाण प्रांतोप्रांतींहि दिसून आलें; बिहार, ओरिसा, आणि मध्यप्रांत, यांत तर तें प्रमाण ६० च्याहि वर गेलें ! हे आंकडे पाश्चात्य देशांतल्या निवडणुकींतील शेंकडेवारीशीं ताडून पाहतां चांगलेच आहेत !

नामदार सर माल्कम् हेले यांनीं, १९२५ च्या नोव्हेंबरांत पंजाब लेजिस्लेटिव्ह काउन्सिल उघडतांना, मतदान वाढविल्याचे फायदे पुढील शब्दांत वर्णिले आहेतः—

" निवडणुकीचें क्षेत्र विस्तारल्यामुळें, आजवर मूक असलेले लोकसमाज राजकारणाच्या कक्षेंत येऊन बसले आहेत; आणि त्यांना काय पाहिजे काय नाहीं यासंबंधाची या ठिकाणीं चर्चा होत असल्यामुळें, पंजाबच्या सगळ्या सार्वजनिक आयुःक्रमालाच नवीन स्वरूप प्राप्त झालें आहे. या प्रगतीची किंमत, त्या लोकांचीं मतें सरकारी धोरणावर किती जोरानें आदळतात यावरूनच काय ती ठरवावयाची.

असें नाहीं. खेडेगांवांतील लोकांना, राजकारणविषयक जाणीव जागृत झाल्यामुळें, नवीन दृष्टि येऊं लागली आहे. कारण त्यांजकडून 'याहून चांगलें शिक्षण द्या, धंदेशिक्षण द्या,' अशी एकसारखी मागणी येऊं लागली आहे. सहकारी संस्थांसारख्या शीलसंवर्धक संस्थांचा फायदा घेण्याची त्यांच्यांत मोठी चळवळ चालू आहे, आणि जें-जें कांहीं आपल्या आर्थिक कल्याणासंबंधाचें असेल त्याजकडे ते नवीनच आणि विशेष समजूतदारपणानें लक्ष घालीत आहेत."

मतदान विस्तृत करावयास हा अगदीं स्पष्ट सबळ आधार आहे. साक्षरतेचें अत्यल्प प्रमाण, ही एक कदाचित् अडचण म्हणून सांगण्यांत येईल. म्हणून हीहि गोष्ट येथें सांगितली पाहिजे कीं, आजच्या मतदानांत मुळीं साक्षरतेची लायकी ठेवण्यांतच आलेली नाहीं! मग साक्षरतेचें अत्यल्प प्रमाण अडचण कां होईल? शिवाय साक्षरतेचें प्रमाण जर अल्प असेल तर त्याला स्वतः सरकारच जबाबदार नव्हे काय?

वास्तविक पाहतां साक्षर माणसें लोकसंख्येच्या शेंकडा ८.२ आहेत, आणि मताधिकार ६० लक्ष लोकांना म्हणजे लोकसंख्येच्या शेंकडा २$\frac{१}{२}$ लोकांना दिला आहे. मग मताधिकार विस्तृत करावयास हरकत कोणती?

आम्हांला तर वाटतें कीं, मताधिकार देण्यासंबंधांत साक्षरतेला हें उगाच नसतें महत्त्व दिलेलें आहे. एखाद्या राजकीय मुद्यावर आपली बाजू ठरवावयाची हा व्यवहारज्ञानाचा प्रश्न आहे, साक्षरतेचा नव्हे; आणि साक्षर वा निरक्षर, कोणाहि सर्वसाधारण हिंदी माणसाला सभोंवार काय चाललें आहे तें ध्यानांत येण्याइतकें चांगलें व्यवहारज्ञान असतें. साक्षरतेची मदत होते हें खरें, पण ती असली म्हणजे फसवणूक होणारच नाहीं अशी कांहीं हमी देतां येत नाहीं! चालू राजकारणविषयावर लिहिणाऱ्या सर्वांनीं असें स्पष्ट दाखवून दिलें आहे कीं, निवडणुकीत सयुक्तिक मुद्यांपेक्षां इतर अवांतर गोष्टींचाच परिणाम जास्त होतो, आणि 'सामान्य मतदाराची राजकारणी निश्चय-बुद्धी असें जें वारंवार म्हणण्यांत येतें तें निवळ ढोंग होय. साक्षर मनुष्य—आणि पाश्चात्य देशांतहि ही सर्वसाधारण साक्षरता केवळ नांवाची असून राजकारणी निश्चय-बुद्धीला कांहीं मदत करू शकत नाहीं—तर्कशुद्ध विचारांहून अन्य विचारांना कमी बळी पडतो ही गोष्टच मुळीं खरी नव्हे.

सुधारणा चौकशी कमिटीच्या (सन १९२४) अल्पसंख्याकांच्या रिपोर्टांत म्हटलें आहे कीं, "मतदार गांवांतला किंवा शहरांतला कुठलाहि असो, त्याला

आपल्या स्थानिक हितसंबंधाचे प्रश्न समजण्याइतकी अक्कल असते, आणि आपण कोणते प्रतिनिधि पाठवावे हें ठरविण्याइतकी त्याची लायकी असते." आणखीहि पुढें असें म्हटलें आहे कीं, " मताधिकार चालवीत राहणें हेंच मुळीं एक बहुमोल शिक्षण आहे, आणि ह्या शिक्षणक्रम राजकीय सत्तेच्या जोडीनेंच चालू राहिला पाहिजे."

हिंदुस्थानांत आज मतदारांची लोकसंख्येशीं पडणारी शेंकडेवारी, इंग्लंडांत १८३२ सालीं पहिल्या सुधारणा बिलाच्या सुमारास पडत असलेल्या शेंकडेवारीशीं साधारणपणें जुळते म्हणावयास हरकत नाहीं. त्या वेळीं इंग्लंडांतील मतदार श्रीमंत आणि हक्कदार वर्गांतले असत. त्यानंतर फारच सावकाशपणें मतदारसंख्या वाढत गेली. डॉ. चॅपल ( कॉन्टेम्परारी रिव्ह्यू १९२४ ) यांनीं दाखविलें आहे कीं, १८३२ पासून १८६७ पर्यंतच्या काळांत मतदारसंख्या शेंकडा ०.५ पर्यंत वाढली, १८६७ त शेंकडा ९ झाली, १८८४ त शेंकडा १८ च्या वर थोडीशी, आणि १९१८ सालींच काय ती शेंकडा ५० वर गेली आहे.

परंतु इंग्लंड देश लोकसत्तेचे अधिकार १६८९ पासून उपभोगीत आहे. १८३२ सालीं मताधिकार शेंकडा फक्त ३ च माणसांना होता तरी पार्लमेंटची सत्ता कर्तुमकर्तुं होती. ३ हा आंकडासुद्धां नांवालाच होता. कारण, " १७९३ सालीं हाउस् ऑफ् कॉमन्समध्यें जेव्हां ५५८ सभासद होते, तेव्हां त्यांपैकीं कमींत कमी ३५४ फक्त नांवाला १५००० हून कमी मतदारांनीं निवडलेले, पण वस्तुतः सरकारनें आणि १९७ खासगी बड्या लोकांनीं नेमून दिलेले असत. १८०१ सालीं आयर्लंड जोडून घेतल्यामुळें १०० सभासद अधिक झाले, पण त्यांपैकीं ७१ सभासद ५६ इसमांनीं नेमून दिलेले असत. १८१६ सालीं, ८५८ सभासदांतून ४८७ सभासद सरकारनें आणि २५७ खासगी गृहस्थांनीं—यांपैकीं पुनः १४४ उमराव होते—नेमलेले असत."

असली ही निवडणुकीची पद्धत असतांना देखील, पार्लमेंटची सत्ता सर्वश्रेष्ठ होती. या पद्धतीशीं तुलना करतां, सध्यांची हिंदुस्थानांतली निवडणुकीची पद्धत वरील वर सांगितलेल्या दोषांपासून साफ मोकळी आहे. ती निश्चित आणि सरळ पद्धत असून तिच्यांत खरीखुरी निवडणूक आणि खरेंखुरें मत चालविण्यांत येतें. शिवाय ती विस्तारतांहि येण्यासारखी आहे.

हे सर्व मुद्दे विचारांत घेतां, मतदारसंघाच्या ह्या प्रश्नानें हिंदुस्थानच्या राजकीय प्रगतीस मुळींच अडथळा येण्याचें कारण नाहीं, हें स्पष्ट आहे.

असतात! उलट सरकार मात्र त्या अस्पृश्य वर्गांना, ह्या 'राजकारणवाल्यां'ची राजकीय प्रगतीची मागणी विशेष नेटानें होऊं लागली कीं त्यांच्या तोंडावर फेंकून देण्यापुरतेंच काय तें पुढें आणीत असतें!

खरें पाहूं गेल्यास, ह्या सुधारणा येईपावेतों, अस्पृश्यवर्गांबद्दल सर्व कांहीं काम स्वयंस्फूर्तीनें—सरकारची फारशी मुळींच मदत न मिळतां करण्यांत आलें आहे. मॉंटफर्ड सुधारणा आणि हिंदी दाबा सुरू करण्यांत आल्यानंतरच काय तें सरकारला, कायदेमंडळांतून व्यक्त झालेल्या लोकमताला विरोध करणें अशक्य झालें आहे.

अतएव जों जों आपण राजकीय प्रगतीला जरूर असलेल्या गोष्टींबद्दल विचार करावा तों तों आपली अधिकाधिक खात्री होत जाते कीं, हिंदुस्थान आज जबाबदार राज्यपद्धतीच्या बऱ्याचशा मोठ्या हप्त्याला पूर्णपणें लायक होऊन राहिलेलें आहे. पण हें आज इंग्लंडांत कोण कबूल करील काय?

सत्तेचें कवच घालून बसलेल्या ब्रिटिश सरकारला वाटत आहे कीं, सगळ्या शहाणपणाचा गट्ठा काय तो आपणापाशीं आहे! हिंदुस्थाननें सुचविलेले विचार आणि दिलेली सल्ला तें लाथाडून देत असतें. महायुद्धाच्या दिवसांपुरतीच काय ती त्यानें आपणास साहाय्य मिळावें म्हणून हिंदुस्थानची खुशामत केली, माणसें आणि पैसे घेऊन प्रत्यक्ष सहकार्य करावयास,या म्हणून हिंदुस्थानची मनधरणी केली, आणि ती सफलहि झाली. हिंदी सैन्यानें जर्मनांचा पहिलाच हल्ला थोपवून धरून, त्यांना इंग्रजांची व फ्रेंचांची तयारी होईपर्यंत पुढें पाऊल टाकूं दिलें नाहीं, तें जर त्यानें केलें नसतें, तर आज इंग्लंडची काय दशा होती!

आज इंग्लंड हिंदुस्थानशीं असहकारिता करीत आहे, त्याला आव्हान देत आहे, त्याचा अपमान करीत आहे. हिंदुस्थाननें आपल्या असेंब्लीच्या मार्फत तें आव्हान स्वीकारिलें आहे—आणि असहाय, दुर्दैवी, परंतु स्वाभिमानी अशा कोणत्याहि राष्ट्रानें असेंच केलें असतें! हिंदुस्थान प्रौढ दशेला येऊन पोंचल्याचें मान्य करून, त्याला ब्रिटिश साम्राज्यांत समान भागीदार आणि राष्ट्रसंघांत स्वतंत्र सभासद म्हणून स्थान देऊन, आतां मात्र त्याचा स्वतःची दैवरेषा आंखावयाचा हक्क नाकारला जात आहे.

"तरारलेल्या बोथ्यांत शहाणपण राहत नाहीं" असे पंडित मोतिलालनीं लॉर्ड बर्कनहेडच्या डॉन्कॅस्टर येथील भाषणासंबंधानें असेंब्लींतील वादविवाद

जातीजातींमधील—विशेषतः हिंदुमुसल्मानांमधील—तेढ हाहि एक प्रगतीच्या विरुद्ध म्हणून मुद्दा मांडण्यांत येत असतो. *त्यासंबंधानें आम्हांला काय वाटतें तें* आम्ही गेल्या प्रकरणांत सांगितलेंच आहे—म्हणजे हें कीं, बहुधा तिसरा पक्ष असल्यामुळें हीं भांडणें वाढतात. कसेंहि असो, पण आतां सदरहू प्रश्न जबाबदार संस्थांनीं आणि पुढाऱ्यांनीं उत्साहपूर्वक हातीं घेतलेला असून, गेल्या राष्ट्रीय सभेंत या प्रश्नावर पसार झालेल्या ठरावाच्याच धर्तीवर गेल्या फेब्रुआरी महिन्यांत दिल्लीस भरलेल्या अखिल भारतीय ऐक्य परिषदेंत थोडाबहुत समेटहि होऊन गेला आहे.

यानंतरची मिस् मेयोची बचावाची फेल म्हणजे अस्पृश्य वर्ग ! अरे ! अरे ! अरे ! मिस् मेयोनें केवढा नक्राश्रूंचा पूर ओतला आहे या वर्गावर हा ! काय ढोंग ! किती बेशरमपणा ! या वर्गाचें कोट कल्याण करण्याचें सरकारच्या अगदीं हातांत होतें, तेव्हां सरकारनें कांहीं केलें काय ? उलट, 'राजकीय चळवळे' म्हणून ज्यांची निंदा केली जाते तेच लोक मात्र या वर्गाला वर काढण्यासाठीं रात्रंदिवस खपत आहेत ! असेंब्लीमध्यें ( फेब्रुआरीच्या १६ आणि १८ तारखांस ) सायमन् कमिशनवर तो मोठा संस्मरणीय वाद चालू असतां, एका सभासदानें लाला लजपतराय यांनां विचारलें कीं, तुम्ही या अस्पृश्य वर्गासाठीं काय केलें आहे ? लजपतरायांनीं तावडतोब उत्तर दिलें कीं, "महाराज ! मी आज २५ वर्षे त्यांच्यांत खपून त्यांना वर काढण्याची खटपट चालविली आहे; पण ज्या ज्या वेळीं आम्ही पंजाब सरकारकडे त्या लोकांना शिक्षण द्या, सार्वजनिक विहिरी खणा, अशी विनंति करावयास गेलों आहों, त्या त्या वेळीं त्यानें ती आमची विनंति धुडकावून लाविली आहे."

तसेंच पंडित मदन मोहन मालवीय—मिस् मेयोचे दुसरे एक चळवळे ( जो दिसेल तो 'स्वार्थ-साधु चळवळ्या' ! देशभक्त नव्हे ! )—यांनींहि त्या वादाच्या वेळीं दाखवून दिलें कीं, जुन्या वरिष्ठ कौन्सिलांत आपण एकदां सरकारला "*या अस्पृश्यांकरितां शिक्षणाची कांहीं विशेष सोय करा, पुढारलेल्या जातींच्याहूनहि जास्त सोय करा,*" अशी आग्रहपूर्वक विनंति केली असतां त्या वेळचे होम मेंबर सर रेजिनाल्ड क्रॅडॉक, यांनीं तो ठराव फक्त प्रांतिक सरकारांकडे पाठवून धपावा एवढीच इच्छा प्रदर्शित केली !!

याहून आणखी कोणता पुरावा पाहिजे म्हणजे कळेल कीं, हे जे 'राजकारण-वाले' लोक तेच सरकारहून थोडे तरी या अस्पृश्य वर्गाच्या गरजा हे लक्ष देऊन

असतात! उलट सरकार मात्र त्या अस्पृश्य वर्गांना, ह्या 'राजकारणवाल्यां'ची राजकीय प्रगतीची मागणी विशेष नेटानें होऊं लागली कीं त्यांच्या तोंडावर फेंकून देण्यापुरतेंच काय तें पुढें आणीत असतें!

खरें पाहूं गेल्यास, ह्या सुधारणा येईपावेतों, अस्पृश्यवर्गाबद्दल सर्व कांहीं काम स्वयंस्फूर्तीनें—सरकारची फारशी मुळींच मदत न मिळतां करण्यांत आलें आहे. मॉंटफर्ड सुधारणा आणि हिंदी तावा सुरू करण्यांत आल्यानंतरच काय तें सरकारला, कायदेमंडळांतून व्यक्त झालेल्या लोकमताला विरोध करणें अशक्य झालें आहे.

अतएव जों जों आपण राजकीय प्रगतीला जरूर असलेल्या गोष्टींबद्दल विचार करावा तों तों आपली अधिकाधिक खात्री होत जाते कीं, हिंदुस्थान आज जबाबदार राज्यपद्धतीच्या बऱ्याचशा मोठ्या हप्त्याला पूर्णपणें लायक होऊन राहिलेलें आहे. पण हें आज इंग्लंडांत कोण कबूल करील काय?

सत्तेचें कवच घालून बसलेल्या ब्रिटिश सरकारला वाटत आहे कीं, सगळ्या शहाणपणाचा गड्डा काय तो आपणापाशीं आहे! हिंदुस्थाननें सुचविलेले विचार आणि दिलेली सल्ला तें लाथाडून देत असतें. महायुद्धाच्या दिवसांपुरतीच काय ती त्यानें आपणास साहाय्य मिळावें म्हणून हिंदुस्थानची खुशामत केली, माणसें आणि पैसे घेऊन प्रत्यक्ष सहकार्य करावयास,या म्हणून हिंदुस्थानची मनधरणी केली, आणि ती सफलहि झाली. हिंदी सैन्यानें जर्मनांचा पहिलाच हल्ला थोपवून धरून, त्यांना इंग्रजांची व फ्रेंचांची तयारी होईपर्यंत पुढें पाऊल टाकूं दिलें नाहीं, तें जर त्यानें केलें नसतें, तर आज इंग्लंडची काय दशा होती!

आज इंग्लंड हिंदुस्थानशीं असहकारिता करीत आहे, त्याला आव्हान देत आहे, त्याचा अपमान करीत आहे. हिंदुस्थाननें आपल्या असेंब्लीच्या मार्फत तें आव्हान स्वीकारिलें आहे—आणि असहाय, दुर्दैवी, परंतु स्वाभिमानी अशा कोणत्याहि राष्ट्रानें असेंच केलें असतें! हिंदुस्थान प्रौढ दशेला येऊन पोंचल्याचें मान्य करून, त्याला ब्रिटिश साम्राज्यांत समान भागीदार आणि राष्ट्रसंघांत स्वतंत्र सभासद म्हणून स्थान देऊन, आतां मात्र त्याचा स्वतःची दैवरेषा आंखावयाचा हक्क नाकारला जात आहे.

"तरारलेल्या डोक्यांत शहाणपण राहत नाहीं" असे पंडित मोतिलालनीं लॉर्ड बर्कनहेडच्या डॅनकॅस्टर येथील भाषणासंबंधानें असेंब्लींतील

प्रसंगीं उद्गार काढले. ब्रिटिश लोकांच्या हिंदी राज्यकारभारासंबंधांत शहाणपणाची सल्लामसलत वायफळ झाल्याचें हें पहिलेंच उदाहरण आहे असें नाहीं. यापूर्वी देखील भयंकर चुका होऊन गेल्या आहेत.

गेल्या वीस वर्षांचा इतिहास घेतला तर प्रथम १९०४-५ सालीं लॉर्ड कर्झन् यांनीं बंगालचा भंग करण्याचा प्रयत्न, लोकमत विरुद्ध असतां आणि निर्धारपूर्वक निषेध केला जात असतांहि निव्वळ बेपर्वाईनें चालविला. विरोधाकडे आणि निषेधाकडे प्रथम लक्षच देण्यांत आलें नाहीं, आणि मागाहून तो अत्यंत निर्दयपणें दावून टाकण्यांत आला. असंतोषानें आरंभीं जमिनींत दडी मारली, पण पुढें भयंकर स्वरूपांत डोकें वर काढलें, आणि तोंपर्यंत हिंदुस्थानास माहीत नसलेला बॉम्ब हिंदुस्थानांत उत्पन्न झाला! पण तो वंगभंग तरी शिल्लक राहिला काय? नाहीं; तो १९१२ त रद्द करण्यांत आला; आणि दुखावलेलीं मनें काय तीं शिल्लक राहिलीं!

पुढें राउलॅट् ॲक्ट घ्या. हिंदुस्थानानें ज्या महायुद्धांत इंग्लंडला मनापासून मदत केली, त्या महायुद्धांतून बाहेर पडतांच इंग्लंडनें हिंदुस्थानची उपकारफेड कशी केली म्हणाल, तर ज्या ॲक्टान्वयें लोकांना पकडून चौकशीशिवाय तुरुंगांत टेवतां येईल असा राउलॅट् ॲक्ट पास करून! हिंदी लोकांपैकीं सरकारच्या स्नेहांत असलेले अत्यंत राजनिष्ठ गृहस्थ परलोकवासी सर सुरेंद्रनाथ बानर्जी आणि सर दिनशा वाचा, यांनीं सरकारला अशी सल्ला दिली होती कीं, हा कायदा तुम्ही पास करूं नका, कारण महायुद्धांत हिंदुस्थानानें उत्कृष्ट सेवा बजाविल्यानंतर त्याच्या पदरीं हा कायदा बांधणें म्हणजे त्याचा अगदीं उघड उघडच अपमान करण्यासारखें आहे. परंतु सरकारनें तो सल्ला धुडकावून देऊन महात्मा गांधींची सत्याग्रहाची चळवळ आमंत्रण करून बोलावून आणिली, तिचा शेवट म्हणजे ती जालियनवाला बागची कत्तल!—जिच्याइतकी ब्रिटिश लोकांच्या नांवाला कालिमा आणणारी सबंध ॲंग्लो-सॅक्सन् इतिहासांत दुसरी गोष्ट नाहीं!

हा राउलॅट ॲक्ट राहिला काय? नाहीं. तोहि वंगभंगाच्याच मार्गानें गेला! हृदयाच्या जखमा तेवढ्या शिल्लक राहिल्या!

म्हणून आमचा प्रश्न आहे कीं, "आज कर्झनशाही अवतरली आहे काय?" एरवीं चुकांवर चुका करण्याचा हा हट्टवाद दिसणें शक्य नाहीं!

अशा प्रसंगीं वास्तविक ॲंग्लो-इंडियन वर्तमानपत्रकारांनीं हिंदुस्थानांतलें सारें लोकमत ब्रिटिश लोकांना कळवून, सरकारला योग्य मसलत द्यावयाची. परंतु सारें

बोलावयाचें म्हणजे, एकूण एक अँग्लो-इंडियन् पत्रें—एरवीं सामान्यतः समंजस असणारा टाइम्स ऑफ इंडिया सुद्धां—अगदीं आज एक सूर काढीत आहेत, आणि हिंदुस्थानची परिस्थिति आणि लोकमत विपर्यस्त स्वरूपांत दाखवून ब्रिटिश लोकांची दिशाभूल करीत आहेत; इतकेंच नव्हे तर आरडाओरड करून आरोळ्या मारून सरकारच्या अंगांत वारें उत्पन्न करून त्याला भयंकर खांचाखळग्यांत ढकलून देत आहेत.

मि. एडमंड बर्क आपल्या "ब्रिस्टलच्या शेरिफांना लिहिलेल्या पत्रां"त अगदीं बरोबर सांगतात कीः—

"गंभीरपणें सल्ला मसलत द्यावयाचें सोडून हुजरेपणा करणें, विचारशक्ति जागृत करावयाची सोडून अभिमान आणि मनोविकार चेतविणें, दुसऱ्यांना प्रतिकारास प्रोत्साहन मिळेल म्हणून अत्याचाराचा धोका काय आहे हें लक्षांत येऊं न देणें—हें खऱ्याखुऱ्या सरकारनिष्ठेचें किंवा खऱ्याखुऱ्या स्वदेशाभिमानाचें द्योतक नव्हे! असल्या गोष्टींना मान तुकावण्यानें, मोठमोठे राजे महाराजे आणि मोठमोठीं राष्ट्रें धुळीस मिळालेलीं आहेत; आणि आजहि जर कोणी अशा रीतीनें सत्याला विरोध केल्यानें आणि खुशामतीपुढें मान वाकविण्यानें भयंकर परिस्थितींत पडली असतील तर त्यांनीं, आपणास अगोदरच ताकीद देऊन ठेवणारांवर उगाच दांतओंठ खात न बसतां, आपल्याला ज्या चुकांनीं संकटांत आणून सोडलें त्या चुका प्रथम सुधारावयास लागावें."

परंतु हिंदी लोक हे निःशस्त्र केलेले लोक आहेत, त्यांनीं नुसतें निराधार भाषणाप्रमाणें पोटभर निषेध करून स्वस्थ बसावें, प्रत्यक्ष कार्य त्यांच्या हातून कांहींहि होणें नाहीं! ही कल्पना आज ब्रिटिश मुत्सद्याच्या डोक्यांत वावरत आहे. नाहींतर 'तुम्ही कांहीं झालें तरी दास आहां, जिंकलेले लोक आहां,' अशी बर्कनहेडप्रभृति वेळ काळवेळेची कांहीं देखील पर्वा न करितां आम्हाला आठवण देत राहिले नसते!

होय! आम्ही जिंकून घेतलेले लोक आहों! आम्हांला शरम वाटली पाहिजे—आणि इतकीं वैगुण्यें असतांना देखील ज्या ब्रिटिश सरकारबद्दल आमच्यासारख्या कित्येक लोकांना थोडें बहुत प्रेम वाटे, त्यांना तर विशेषच वाटली पाहिजे—सर्व कांहीं कबूल!! परंतु ब्रिटिश लोकांना आमचें एवढेंच सांगणें आहे कीं, थांबा, फाजील आत्मविश्वास बाळगून वागूं नका. बेभान घोडा उद-

विणार, तो खालीं येणार ! तुमचे स्वतःचेच मुत्सद्दी एडमंड बर्क, 'अमेरिकेशीं समेट' यावरच्या आपल्या भाषणांत काय म्हणतात पहा:—" प्रत्येक राष्ट्राच्या नशिबीं असा एक आणीबाणीचा काळ येतो कीं, पूर्वी ज्यांच्यामध्यें त्या राष्ट्राच्या वैभवांत भर घालण्याइतकी ताकद नव्हती ते त्या वेळीं त्याचा समूळ नाश करण्याइतके खंबीर बनतात."

ब्रिटिश लोकांना हिंदुस्थानचा व्यापार ही अव्वल महत्वाची गोष्ट होय. हिंदुस्थान जर अनुकूल नाहीं, तर तो व्यापार ते फार दिवस चालवूं शकतील काय ? भाकरी खातांहि आली पाहिजे आणि ठेवतांहि आली पाहिजे, हीं दोन्ही कशीं साधतील ? हिंदुस्थानाला वैरी तर करावयाचें आणि त्याच्याशीं पुनः स्नेह ठेवावयाचा, हें कसें जुळेल ? तुमची राजसत्ता त्यांना नको असली तरी तुम्हाला ती त्यांजवर लादतां येईल; परंतु तुमचा माल त्यांनीं विकत घ्यावा अशी कांहीं बळजबरी तुम्ही त्यांजवर करूं शकणार नाहीं ! हिंदुस्थान हातांत नाहीं, तर इंग्लंड काय पदार्थ आहे ? 'दुसरें हॉलंड !' बेझंटबाई म्हणतात !

परंतु ब्रिटिश लोक आणि ब्रिटिश मुत्सद्दी, हिंदुस्थानची नीट ओळख करून घ्यावयास आणि त्याच्या अडचणी नीट समजून घ्यावयास कितीहि नाखुष असोत, हिंदुस्थान त्यांचें लक्ष बळेंच खेंचून घेतल्याशिवाय राहणार नाहीं. झटापटीस मुकती कुठें सुरवात झाली आहे, आणि ब्रिटिश साम्राज्याचा एकनिष्ठ प्रजाजन या नात्यानें प्रस्तुत लेखकास मि. एडवर्ड थॉम्प्सन् यांच्या शब्दांत पुढील विचार व्यक्त करावेसे वाटत आहेत:—

*" आम्ही असें विचारतों कीं, दोन हात झालेच पाहिजेत असें आहे काय ? आजवर कोणत्याहि राष्ट्रानें दाखविलें नसेल इतकें शहाणपणाचें आणि औदार्याचें श्रेष्ठत्वनिदर्शक धोरण आम्ही दक्षिण आफ्रिकेच्या बाबतींत दाखविलें असतां— अखेर एकदांचें आयर्लंडशीं, आणि पुनें वैर संपल्यामुळें युनायटेड स्टेट्सशीं, स्नेहवचनानें बद्ध झालों असतां—कानडा, आस्ट्रेलिया, आणि न्यू झीलंड यांजबरोबरच्या आमच्या संबंधांतील नीतिदायक टप्प्यांतून सुरक्षितपणें पार पडलों असतां—त्यांच्या मागाहूनचा हा हिंदुस्थानचा साम्राज्यविषयक प्रश्नदेखील आम्हांला तसाच निरविता येणार नाहीं काय ? किंवा शांतता स्थापन होण्यापूर्वी झटापट ही झालीच पाहिजे असें जर असेल, तर त्याबरोबर मनेंहि दुखविली पाहिजेत असें कांहीं घाट आहे काय ? "*

हिंदी राजकारणाकडे ' विशाल आणि उदार ' भावनेनें पाहण्याची आवश्यकता आजच्या या आणीबाणीच्या प्रसंगाइतकी केव्हांहि भासली नव्हती. बर्क म्हणतात कीं, " राजकारणांत उदार अंतःकरण हेंच बहुधा शहाणपण ठरतें."

---

## प्रकरण २१ वें.

# उपसंहार.



वाचक हो, संपलें. मिस् मेयोच्या लबाड्या चव्हाट्यावर आणल्या, आणि तिच्या निराधार खोटसाळ आरोपांना उत्तर दिलें. इतःपर कोणीहि तिच्या निंदाप्रचुर चोपड्यावरून हिंदुस्थानची माहिती मिळवूं पाहूं नये !

परंतु एवढयावरच थांबलें नाहीं. मिस् मेयोच्या हृदयांत द्वेषाग्नि कायमचा भडकून राहिला आहे. अलीकडे अगदीं ताजी बातमी अशी समजली आहे कीं, तिनें आपल्या लबाड्यांना नांवारूपास आणण्यासाठीं अमेरिकन् नटी नॅझिमोवा हिच्याशीं संधान बांधलें आहे.

ह्या नॅझिमोवा नटीनें ' हिंदुस्थान ' नांवाचें एक नाटक रंगभूमीवर आणलें आहे असें कळतें. त्यांत हिंदुस्थानचें चित्र विपर्यस्त स्वरूपांत प्रहसनात्मक दाखविण्यांत येत असून, त्याची सामग्री ' मदर इंडिया 'तून घेतलेली आहे ! (बॉम्बे क्रॉनिकल फेब्रुआरी तारीख २०, सन १९२८, रागिणी देवीचा लेख पहा ).

सैतान युद्धांत पराजय पावून नरकांत गुंगीत पडला. परंतु शुद्धीवर येऊन कांहींसा ताजातवाना होतांच म्हणतोः—" एकूण झालें तें काय ? पराजयच ना ? रण हातचें गेलें म्हणजे सर्वस्व तर गेलें नाहीं ना ? माझी दुर्दमनीय इच्छाशक्ति—सूडाचा निदिध्यास—अविनाशी द्वेषबुद्धि—आणि कल्पांतींहि मस्तक न नमविण्याचें धारिष्ट—हीं तर माझ्यापाशीं कायम आहेत ना ! मग आणखी अजिंक्यता ती काय असावयाची ? "

हेंच द्वेषपूरित कवन, छीः थूः होऊन पातालांत पडलेल्या मिस् मेयोच्या डोक्यांत गूं गूं करीत आहे !

प्रत्याघात म्हणून अमेरिकेंतली मोठमोठ्या ठिकाणची घाण चव्हाट्यावर आणणारा तसलाच एखादा पाजी फार्स किंवा सिनेमाचो फिल्म् हिंदी लोकांनांही तयार

करतां येणार नाहीं काय ? पण नको ! हिंदुस्थानाला हा डाग नको ! पाश्चात्य राष्ट्रें खिस्ताला विसरून सैतानाला कवटाळोत, पण हिंदुस्थानानें भगवान् बुद्धाला विसरणें ठीक नव्हे ! आपला बहुमोल पैतृक ठेवा हिंदुस्थानानें कधींहि डोळ्यांआड करतां नये !

---

अखिल जगानें लक्षांत घ्यावें कीं, मिस् मेयोचा श्वास देखील विषारी, तिच्या "मदर इंडिया"चा आस्वाद घेतल्यानें नैतिक जीविताचा चौमोड होऊन जगांत नरकाचें साम्राज्य पसरलें जाईल.

त्यांतल्या त्यांत समाधान मानावयाचें तें हें कीं, सत्याची शक्ति आज नाहीं उद्यां प्रभावशाली ठरणारच ! मानवी अंतःकरण कितीहि काळें पडलें तरी शेवटीं स्वर्गांकडेच डोळे लावून बसणार ! "ईश्वर एक आणि त्याचींच हीं आम्ही लेंकरें" याच सनातन तत्वाकडे जग एक एक पाऊल टाकीत चाललें आहे.

जगांतल्या सर्व राष्ट्रांना, सर्व लोकांना, सर्व मानववंशांना आमची अंतःकरणपूर्वक एवढीच विनंति आहे कीं, आपल्या हिंद-भगिनीवर प्रेम करा. वंशद्वेषाची विषारी सांथ पसरविणाऱ्या निंदकांच्या बडबडीनें फसले जाऊं नका. आपण स्नेहबंधनांनीं बांधले जाऊं या.

रवींद्रनाथ टागोर म्हणतात," मनुष्यप्राण्यामध्यें जो पाशवी गुण राहत आला आहे, त्याजपासून मुक्त होण्याची आशा, त्यांतल्या हानिकारक घटकांना शारीरिक नाशाच्या द्वारें उडवून देण्यांत नसून, मनाला योग्य वळण लावण्यांत आणि खऱ्या संस्कृतीची शिस्त लावून घेण्यांत आहे हें समजून वागावें. " शेवटीं

पकमेकां साह्य करूं । अवघे धरूं सुपंथ ॥

ही साधुश्रेष्ठांची उक्ति गर्जून पुरें करतों.

---

## परिशिष्ट १ लें

### महात्मा गांधी यांचा लेख.

# गटर इन्स्पेक्टरचा रिपोर्ट.



**वरील मथळ्याखालीं महात्मा गांधींनीं आपल्या तारीख १५ सप्टेंबरच्या 'यंग इंडिया' साप्ताहिकांत 'मदर इंडिया'चें पुढीलप्रमाणें परीक्षण केलें आहेः—**

अनेक इसमांनीं माझ्याकडे मिस् मेयोच्या 'मदर इंडिया'वरील परीक्षणात्मक किंवा निषेधात्मक लेख वर्तमानपत्रांतून कापून घेऊन पाठविले आहेत. शिवाय कांहींनीं त्या पुस्तकाबद्दल माझें मत विचारलें आहे. लंडनच्या एका गृहस्थांनीं मिस् मेयोनें माझा ज्या ज्या ठिकाणीं उल्लेख केला आहे, त्यासंबंधानें कांहीं प्रश्न काढून त्यांचीं उत्तरें पाठवावयास मला रागारागानें कळविलें आहे. खुद्द मिस् मेयोनें माझ्याकडे आपल्या पुस्तकाची एक प्रत पाठविण्याची कृपा केली आहे.

हें पुस्तक मी प्रवासांत असतां वाचावयास वेळ काढला नसता खास; विशेषतः माझी शक्ति कमी होऊन माझ्या डॉक्टर मित्रांनीं मला श्रमातिशय न घेण्याबद्दल बजावलेलें असतांना! परंतु वर सांगितलेल्या पत्रांमुळें मला तें पुस्तक सावडतोब वाचावेंच लागलें.

पुस्तक मोठ्या चतुराईनें आणि जोरदार पद्धतीनें लिहिलेलें आहे. उतारे काळजीपूर्वक निवडून घातले आहेत, त्यामुळें पुस्तक बाह्यतः खरें असें भासतें. परंतु माझ्या मनावर परिणाम झाला तो एवढाच कीं, हें पुस्तक म्हणजे गटर उघडून तें तपासण्याकरितां किंवा त्यांच्यांतून मग कशी दुर्गंधि बाहेर पडते त्याचें हुबेहूब वर्णन देण्याकरितांच एखाद्या देशांत पाठविलेल्या गटर इन्स्पेक्टरचा एक रिपोर्ट आहे. मिस् मेयोनें जर उघड सांगितलें असतें कीं, आपण हिंदुस्थानांत केवळ गटर उघडून तपासण्याकरितांच आलें होतें, तर मग तिच्या या गोळा केलेल्या गोष्टींबद्दल फारशी तक्रारीला जागा नव्हती. परंतु ती तर उलट कांहींशा विजयोत्साहानें म्हणते कीं, "हे गटर म्हणजेच हिंदुस्थान!" शेवटच्या प्रकरणांत तिनें थोडीशी सावधगिरीची सूचना दिली आहे खरी. परंतु ती अशा चतुराईनें दिली आहे कीं, तिनें जी सरसकट दोषाची फेरसुणी फिरविली आहे

तिलाच उलट पुष्टि मिळावी ! मला वाटतें ज्याला म्हणून हिंदुस्थानची थोडीबहुत तरी माहिती आहे, तो इसम तिनें या दुर्दैवी देशांतल्या लोकांवर त्यांच्या आचार-विचारांसंबंधानें केलेले आरोप खरे मानणें कधींहि शक्य नाहीं !

पुस्तकांत नमूद केलेल्या गोष्टी कितीहि खऱ्या असोत, तें पुस्तक मात्र खरें नव्हे हें निर्विवाद होय. मी जर लंडनचें गटर उघडून त्यांतून बाहेर पडणारी दुर्गंधि अगदीं काळजीपूर्वक बारकाईनें वर्णिली, आणि म्हटलें कीं, 'हें पहा लंडन !' तर मी सांगितलेल्या गोष्टी अर्थातच कोणीहि नाकबूल करणें शक्य नाहीं. परंतु माझी विचारशक्ति मात्र सत्याचा विपर्यास करणारी म्हणून दोषार्ह ठरल्याशिवाय राहणार नाहीं. याहून कांहींहि दुसरें किंवा चांगलें असें मिस् मेयोच्या पुस्तकांत नाहीं.

पुस्तककर्त्री म्हणते कीं, आपण जें काय हिंदुस्थानाबद्दल वाचलें तें आपणास कांहीं बरेंसें वाटलें नाहीं, म्हणून "पैशानें न भारलेल्या, अमुक एका मार्गानें जावयास बांधला न गेलेल्या आणि कोणाशींहि संबद्ध नसलेल्या, अशा एखाद्या स्वयंस्फूर्तीनें निघालेल्या माणसास रोजच्या व्यवहारांतल्या साध्या गोष्टींत काय दिसतें तें पाहण्याकरितां" आपण हिंदुस्थानांत आलें.

पुस्तक चांगलें लक्षपूर्वक वाचून पाहतां, हें तिचें म्हणणें मला मान्य करवत नाहीं, हें सांगावयास मला वाईट वाटतें. पैशानें भारलेली ती कदाचित् नसेल. पण ती अमुक एका मार्गानें जावयास बांधली गेलेली नाहीं किंवा ती कोणाशींहि संबद्ध नाहीं, असें मात्र कोणत्याहि पृष्ठावर दिसत नाहीं. हिंदुस्थानांत सरकारनें आश्रय दिला जाणारीं—' आश्रय ' हा ' पैशानें भारलें जाणें ' ह्याला एक नाजुक प्रतिशब्द होय—स्वार्थपर पुस्तकें प्रसिद्ध होतात याची आम्हाला चांगली ओळख आहे. ब्रिटिश-पूर्वकालापासूनच आम्हांला अशी समजूत करून घ्यावयाची संवय झाली आहे कीं, राजव्यवहारकलेमध्यें ( ही कला ब्रिटिशांनीं पूर्णत्वास नेलेली आहे ), संशयित लोकांवर पाळत ठेवण्याकरितां आणि जणूं काय त्रयस्थानेंच दिलेलें शिफारसपत्र म्हणून तत्कालीन सरकारचें गुणवर्णन करण्याकरितां, विद्वान् आणि सचोटीचे व सरळ वर्तनाचे म्हणून मानले जाणारे असे लोक गुप्तपणें नोकरींत ठेवणें, याचा समावेश होतो. या संशयाच्या छायेंत मिस् मेयो आली तर ती कदाचित् रागावेल ! परंतु तिला ऐकून थोडेंसें समाधान वाटावें म्हणून सांगतों कीं, हिंदुस्थानचे ब्रिटिश फार मोठे हितेच्छु इंग्रज लोक या छायेंत आलेले आहेत !

पण हा संशय आपण बाजूस काढला तरी, हें लबाडीचें पुस्तक तिनें कां लिहिलें हा प्रश्न शिल्लक राहतोच. या पुस्तकांत दोन तऱ्हेची लबाडी आहे. पहिली ही कीं तिनें एका सबंध राष्ट्राला—तिच्या शब्दांत बोलावयाचें म्हणजे 'हिंदुस्थानच्या निरनिराळ्या लोकांना,' कारण आमचें 'एक राष्ट्र' आहे, हें तिला कबूल नाहीं—आरोग्य, नीति, धर्म, इत्यादि संबंधांत सर्वस्वीं, अगदीं कांहीं बाकी न ठेवितां, दोष दिलेला आहे. दुसरी लबाडी अशी कीं, तिनें जे ब्रिटिश सरकारच्या पदरीं गुण म्हणून बांधिले आहेत, ते तसे वास्तविक बांधतां येत नाहींत, आणि ते बांधलेले पाहून बरेच ब्रिटिश अधिकारी लाजेनें खालीं मान घालतील !

ती जर पैशानें भारली गेली नसेल, तर मग ती हिंदद्वेषानें आणि आंग्लप्रेमानें तरी भारलेली असेल. कारण तिला हिंदी लोकांत कांहीं चांगलें, आणि ब्रिटिश व त्यांची सत्ता यांच्यांत कांहीं वाईट, असें मुळींच दिसत नाहीं.

तिच्या विचारशक्तीवरून, पाश्चात्यांची विचारशक्ति फारशी उच्च दर्जाची आहे असें कांहीं आपणास दिसत नाहीं. ती पाश्चात्य देशांतल्या खळबळ उडवून देणाऱ्या लेखकवर्गांतली एक आहे खरी, पण तो वर्ग मला वाटतें आतां कमी होत चालला आहे. खळबळ उडविणारें, झणझणीत, किंवा कुटिल असें लेखन दिसलें कीं दूर फेंकून देणारे अमेरिकेंत बरेच लोक आहेत आणि त्यांची संख्या वाढत चालली आहे. परंतु दुर्दैव असें कीं, त्याचबरोबर अद्याप हजारों लोक असे आहेत कीं ज्यांना 'शिलिंग माला' दिसली कीं उकळ्या फुटतात ! शिवाय या लेखिकेनें दिलेले उतारे, आणि मधल्याच काढून घेऊन दिलेल्या गोष्टी, त्याहि सत्यस्वरूपांत मांडलेल्या नाहींत. त्यांतल्या मला ज्या प्रत्यक्ष माहीत आहेत तेवढ्याच मी घेतों. पुस्तकांत जिथें तिथें, तोंडची म्हटलेली वाक्यें मागचा पुढचा संबंध न दाखवितां दिलेली आहेत, आणि उतारे दिलेले आहेत ते अधिकारयुक्त माणसांनीं खोटे म्हणून दाखविलेले आहेत.

बाल-विवाहाशीं कविसम्राटाचें नांव जोडून देण्यांत या लेखिकेनें औचित्यभंगाची परमावधि करून ठेविली आहे ! लवकर लग्न होणें कांहीं वाईट नाहीं असें कविराजांनीं म्हटलें आहे खरें, पण लवकर लग्न होणें आणि लहान वयांत लग्न होणें यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे. तिनें शांतिनिकेतनांतल्या स्वतंत्र आणि स्वातंत्र्य-प्रिय मुलींची व स्त्रियांची ओळख करून घेण्याची तसदी घेतली असती म्हणजे 'लवकर लग्न' याचा कविराज काय अर्थ समजतात तें तिला कळून चुकलें असतें.

"त्या वेळीं ते तुरुंगांत असल्यामुळें, एक इंडियन् मेडिकल सर्व्हिसमधला ब्रिटिश सर्जन् तावडतोब त्यांना तपासावयास आला. (त्यासंबंधाची हकीकत प्रसिद्ध झाली आहे तिजवरून ) सर्जन म्हणाले, 'मि. गांधी, सांगावयाला मला वाईट वाटतें कीं, आपणास ॲपेंडिसायटीस् झाला आहे. आपण जर माझ्या हातांतले रोगी असतां, तर मी तावडतोब शस्त्रक्रिया केली असती. पण आपणास कदाचित् आपला आयुर्वेदिक वैद्यच बोलाविणें बरें वाटत असेल.'

"पण गांधींच्या मनांत निराळेंच दिसलें.

"सर्जन पुढें म्हणाले, 'मला ऑपरेशन् न करणेंच बरें वाटतें. कारण परिणाम जर वाईट झाला तर तुमचे स्नेही आमच्यावर आरोप करतील कीं चांगली काळजी घेण्याचें यांचें काम असतांना यांनीं गांधींबद्दल द्वेषबुद्धि मनांत धरून हें काम केलें.'

"'तुम्ही नुसतें ऑपरेशन् करावयाचें तेवढें कबूल करा,' गांधी काकुळतीस येऊन म्हणाले, 'कीं आतां मी माझ्या स्नेह्यांना बोलावून आणून त्यांना हें तुम्ही माझ्या विनंतीवरून करीत आहां असें सांगून टाकतों.'

"अर्थात् गांधीजी जाणूनबुजून 'पापप्रसारक संस्थेंत' गेले, इंडियन् मेडिकल सर्व्हिसमधील 'वाईटांत वाईट' म्हणजे 'युरोपियन् डॉक्टराकडून' त्यांनीं ऑपरेशन् करून घेतलें, आणि बरे होतांना त्यांनीं एका इंग्रज भगिनीकडून शुश्रूषा करून घेतली, आणि असेंहि समजतें कीं, एकंदरींत असली माणूस कांहीं फारशी निरुपयोगी नव्हे असें त्यांस वाटलें."

सत्याचा हा भयंकर विपर्यास होय. त्यांतल्या नालस्तीच्या भागापुरतीच मी दुरुस्ती करतों; इतर चुका राहूं द्यात. प्रस्तुत प्रसंगीं वास्तविक आयुर्वेदिक वैद्य बोलाविण्याचा प्रश्नच नव्हता. ऑपरेशन् ज्यांनीं केलें त्या कर्नल मॅडॉकनां, पाहिजे असतें तर मला न विचारतां, किंवा माझी संमति नसतां देखील, ऑपरेशन् करण्याचा हक्क होता. पण त्यांच्या व सर्जन-जनरल हूटन यांच्या मनांत, मला काय वाटेल हा विचार येऊन, त्यांनीं मला तुम्ही स्वतःच्या डॉक्टरांची—हे डॉक्टर त्यांना ठाऊक होते आणि शिवाय ते पाश्चिमात्य वैद्यक आणि शस्त्रक्रिया शिकलेले

आपला मुद्दा स्थापित करण्यासाठीं तिनें वारंवार माझ्या विधानांचा आधार घेतला आहे. एखाद्या समाजसुधारकाच्या रोजनिशींतले उतारे गोळा करणें आणि त्या संदर्भरहित आधारावर, तो समाजसुधारक ज्या लोकांची सुधारणा करूं इच्छीत आहे त्या लोकांवर चिखल उडवणें, हें कोणीहि समंजस निःपक्षपाती वाचक किंवा श्रोता ऐकून घेणार नाहीं! हरएक हिंदी गोष्टीकडे विकृत दृष्टीनें पाहण्याची घाई झाल्यामुळें, तिनें माझ्या लेखनाचा विपर्यास केला आहे; इतकेंच नव्हे तर तिनें स्वतः, किंवा दुसऱ्या कोणी, माझे म्हणून म्हटलेले विचार खरोखरच माझे आहेत कीं काय, हें मला विचारून खरें खोटें करून घेण्याचीहि तिला जरूर वाटली नाहीं. तिनें आम्ही हिंदुस्थानांत म्हणतों तीं न्यायदानाचीं आणि अंमलबजावणीचीं अशीं दोन्ही कामें स्वतः एकटीनेंच केलीं आहेत. फिर्यादी तीच, आणि न्यायाधीशहि तीच! तिनें माझ्या भेटीचें वर्णन देऊन आपल्या वाचकांस कळविलें आहे कीं, माझ्याबरोबर सदैव दोन "सेक्रेटरी" असतात, आणि माझ्या तोंडांतून येईल तो शब्द ते टिपून घेतात. हा मुद्दा तिनें मुद्दाम विपर्यास केलेला नाहीं हें मला ठाऊक आहे. परंतु तें विधान खरें आहे असें मात्र नव्हे. मिस् मेयोला मी नम्रपणें कळवितों कीं, मी जें जें काय म्हणेन तें लिहून घ्यावयास नेमलेला, किंवा लिहून घेईल असा, कोणीहि मनुष्य माझ्याजवळ नसतो. महादेव देसाई नांवाचे माझे एक सहकारी आहेत, ते बॉसवेलवरहि ताण करण्याचा यत्न करीत आहेत. म्हणून जेव्हां जेव्हां ते माझ्याजवळ असतात, तेव्हां माझ्या तोंडांतून जें काय त्यांच्या समजुतीनें ज्ञानामृत येतें तें ते टिपून घेतात. त्यांना दूर ढकलणें माझी इच्छा असली तरी मला शक्य नाहीं. कारण, आमचा संबंध हिंदु विवाहग्रंथीप्रमाणें न तुटणारा असा आहे. परंतु मिस् मेयोनें माझ्यासंबंधानें खरा गुन्हा केला आहे तो ३८७–८८ पृष्ठांवरील वर्णनांत. 'पाश्चात्य शास्त्रांतलें काय पाहिजे तें आणा, त्याहून आयुर्वेदिक शास्त्र केव्हांहि वरचढच होय असें अगदीं अंतःकरणाच्या कळवळ्यानें सांगितल्याचें' तिनें कविराजांच्या माथीं मारलें आहे. (*ह्या प्रसंगीं मात्र तिनें आधारासाठीं कांहीं प्रत्यक्ष तोंडचे शब्द दिलेले नाहींत!*). पुढें हॉस्पिटलें म्हणजे पापप्रवर्तक संस्था असें तिनें माझें मत दिलें आहे. आणि नंतर ब्रिटिश शस्त्रवैद्यांना भूषणावह आणि मला वाटतें पुढें मलाहि भूषणावह असा एक पवित्र प्रसंग तिनें मुद्दाम ओळखतां येणार नाहीं असा करून टेविला आहे. मिस् मेयोच्या पुस्तकांत दिलेला तो संबंध उतारा मी देत आहें याबद्दल वाचकांनीं क्षमा करावीः

"त्या वेळीं ते तुरुंगांत असल्यामुळें, एक इंडियन् मेडिकल सर्व्हिसमधला ब्रिटिश सर्जन् तावडतोब त्यांना तपासावयास आला. (त्यासंबंधाची हकीकत प्रसिद्ध झाली आहे तिजवरून) सर्जन म्हणाले, 'मि. गांधी, सांगावयाला मला वाईट वाटतें कीं, आपणास अॅपेंडिसायटीस् झाला आहे. आपण जर माझ्या हातांतले रोगी असतां, तर मी तावडतोब शस्त्रक्रिया केली असती. पण आपणास कदाचित् आपला आयुर्वेदिक वैद्यच बोलाविणें बरें वाटत असेल.'

"पण गांधींच्या मनांत निराळेंच दिसलें.

"सर्जन पुढें म्हणाले, 'मला ऑपरेशन् न करणेंच बरें वाटतें. कारण परिणाम-जर वाईट झाला तर तुमचे स्नेही आमच्यावर आरोप करतील कीं चांगली काळजी घेण्याचें यांचें काम असतांना यांनी गांधींबद्दल द्वेषबुद्धि मनांत घरून हें काम केलें.'

"'तुम्ही नुसतें ऑपरेशन् करावयाचें तेवढें कबूल करा,' गांधी काकुळतीस-येऊन म्हणाले, 'कीं आतां मी माझ्या स्नेह्यांना बोलावून आणून त्यांना हें तुम्ही माझ्या विनंतीवरून करीत आहां असें सांगून टाकतों.'

"अर्थात् गांधीजी जाणूनबुजून 'पापप्रसारक संस्थेत' गेले, इंडियन् मेडिकल सर्व्हिसमधील 'वाईटांत वाईट' म्हणजे 'युरोपियन् डॉक्टराकडून' त्यांनीं ऑपरेशन् करून घेतलें, आणि बरे होतांना त्यांनीं एका इंग्रज भगिनीकडून शुश्रूषा करून घेतली, आणि असेंहि समजतें कीं, एकंदरींत असली माणूस कांहीं फारशी निरुपयोगी नव्हे असें त्यांस वाटलें."

सत्याचा हा भयंकर विपर्यास होय. त्यांतल्या नालस्तीच्या भागापुरतीच मी दुरुस्ती करतों; इतर चुका राहूं यात. प्रस्तुत प्रसंगीं वास्तविक आयुर्वेदिक वैद्य बोलाविण्याचा प्रश्नच नव्हता. ऑपरेशन् ज्यांनीं केलें त्या कर्नेल मॅडॉकनां, पाहिजे असतें तर मला न विचारतां, किंवा माझी संमति नसतां देखील, ऑपरेशन् कर-ण्याचा हक्क होता. पण त्यांच्या व सर्जन-जनरल हूटन यांच्या मनांत, मला काय वाटेल हा विचार येऊन, त्यांनीं मला तुम्ही स्वतःच्या डॉक्टरांची—हे डॉक्टर त्यांना ठाऊक होते आणि शिवाय ते पाश्चिमात्य वैद्यक आणि शस्त्रक्रिया शिकलेले होते—वाट पाहणार काय म्हणून विचारलें. मीहि उलट त्यांच्याशीं तसेंच सौजन्य दाखवावयास मागें पुढें न पाहतां त्यांना म्हटलें कीं, तुम्ही माझ्या डॉक्टरांना तार केली आहे खरी, पण ते येण्यापूर्वी तुम्ही ऑपरेशन् केलें तरी माझी कांहीं

हरकत नाहीं, आणि ऑपरेशन्चा कदाचित् अनिष्ट शेवट झाला तर तुमचा बचाव व्हावा म्हणून मी पाहिजे तर तसें तुम्हांला लिहून देतों. म्हणजे माझा त्यांना एवढेंच दर्शविण्याचा प्रयत्न होता कीं, त्यांची लायकी किंवा त्यांचें शुद्ध मन यांबद्दल माझ्या मनांत काडीमात्र शंका नाहीं. माझी वैयक्तिक सद्भावना दाखविण्याची ती मला अत्युत्कृष्ट संधि मिळालेली होती.

हॉस्पिटलें वगैरे संबंधाचें जें माझें मत, तें कायम आहे. मी स्वतः माझ्यावर आणि माझ्या ताब्यांतल्या माणसांवर जरी पाश्चात्य वैद्यक शिकून तयार झालेल्या हिंदी आणि युरोपियन् औषधीवैद्यांकडून आणि शस्त्रवैद्यांकडून अनेक वेळां उपचार करून घेतले असले, तरी माझें तें वरील मत कायम आहे. तसेंच, मी मोटर आणि रेलवे यांचा उपयोग करतों, आणि तरीदेखील त्या दोषरूप आहेत असें माझें जें पूर्वी म्हणणें होतें तेंच आज कायम आहे. खुद्द मानवदेह हाच मुळीं दोषरूप आहे आणि माझ्या प्रगतीच्या आड येणारा आहे असें मी मानतों. परंतु या मतांत आणि तो देह आहे तोंपर्यंत त्याचा उपयोग करून घेणें आणि त्याच्याच नाशासाठीं त्याचा मला उत्कृष्ट वाटत असलेल्या पद्धतीनें उपयोग करून घेण्याचा प्रयत्न करणें, यांत परस्परविरोध असा मला कांहींच दिसत नाहीं! वर दिलेला हा विपर्यासाचा नमुना माझ्या प्रत्यक्ष माहितीचा झाला.

परंतु या पुस्तकांत अशा कांहीं गोष्टी अगदीं कांठोकांठ भरल्या आहेत कीं, *त्या निदान सामान्य हिंदी माणसाला तरी माहीत नाहींत.* उदाहरणार्थ, प्रिन्स ऑफ् वेल्सचें केवढें तरी मोठें स्वागत झालें आणि जयजयकार झाला, असें तिनें वर्णन दिलें आहे; ही गोष्ट हिंदुस्थानांतल्या हिंदी लोकांच्या मुळींच ऐकिवांत नाहीं, आणि प्रत्यक्ष घडून आली असती तर ती कानाआड कधीं लपून राहिली असती असेंहि नाहीं! मुंबईंत कुठेंशा एका ठिकाणीं प्रिन्स ऑफ् वेल्सच्या गाडीकडे जावयास लोकांची भयंकर दाटी होऊन पुढें पाऊल टाकावयास नुसती अहमहमिका लागून राहिली होती, अशी तिनें माहिती दिली आहे! मिस मेयो म्हणते, "पोलिसांनीं गाडीभोंवतीं गराडा घालण्याची शिकस्त केली, पण व्यर्थ; लोकांचे थवेच्या थवे गाडीभोंवतीं जमा झाले, सारखा जयघोष चालू झाला, गाडी हळू हळू चालत शेवटीं कशीबशी एकदांची रेलवे स्टेशनावर पोंचली!" गाडी निघावयास तीन मिनिटें राहिलीं होतीं, इतक्यांत, मिस मेयो म्हणते, राजपुत्रानें सगळे कठडे काढून टाका, लोकांना आंत येऊं द्या, असा हुकूम केला. मग काय विचारतां! मिस मेयो म्हणते, "जशी एखादी महापूर आलेली नदी घों घों करीत

घुसावी, तसा तो असंख्य लोकांचा महापूर लोटला ! आनंदानें बेहोष झालेले ते लोक ओरडले, हंसले खिदळले, आनंदाश्रूंनीं न्हाले ! इतक्यांत गाडी सुटली, त्याबरोबर गाडीबरोबर धांवत चालले, शेवटीं थकले तेव्हांच काय ते थांबले." आणि हें सर्व १९२१ सालीं नोव्हेंबरच्या २२ तारखेस संध्याकाळीं, दंग्याची धुगधुगी निवालेली नसतांना घडून आलें आहे ! असल्या या नवलकथा ह्या प्रकरणांत, वर 'हा प्रकाश पहा' असा मथळा देऊन, खालीं किती तरी भरून टाकल्या आहेत !

एकोणिसावें प्रकरण म्हणजे ब्रिटिश सरकारनें केलेल्या कामगिरीच्या स्तुतिपर अशा आधारांचा संग्रह होय. यांतला बहुधा एकूण एक आधार संशयातीत सचोटीच्या इंग्रज व हिंदी अशा दोन्ही लेखकांनीं खोडून काढलेला आहे. सतरावें प्रकरण आम्ही 'जगाला मारक' आहों हें दाखविण्याकरितां लिहिलें आहे. समजा, मिस मेयोच्या खटपटीचा उपयोग झाला; आणि लीग ऑफ् नेशन्सनें हिंदुस्थान देश झटला जावयास नालायक आहे असें ठरवून त्यास वाळींत टाकलें; तर मला वाटतें पूर्व आणि पश्चिम या दोघींचाहि फायदाच होईल. मग कदाचित् आमच्या आपापसांत लढाया सुरू होतील; त्यांत मिस मेयो भीति घालीत आहे तशी वायव्येकडून आणि मध्य-एशियांतून टोळधाड येऊन हिंदु लोकांचा कदाचित् फन्ना उडेल— पण तें क्षणोक्षणीं वाढत जाणाऱ्या पौरुषनाशाहून शतपट बरें. जिवंत भाजून मारण्याच्या दिरंगाई पद्धतीहून सरळ एकदम विजेच्या धक्क्यानें मारण्याची पद्धत जशी जास्त दयाशीलतेची, तद्वत् आम्ही हे मिस मेयोनें वर्णिल्याप्रमाणें प्रतिकारशून्य, घाणेरडे, भोळसर, आणि कामशय्येवर लोळणारे लोक, आज या क्षणीं जें अपमानास्पद जिवंत मरण भोगीत आहों, त्याहून मध्य-आशियांतल्या प्रचंड वीरसमूहाच्या एका झेंपेनें जर आम्ही स्वर्ग गांठला, तर केवढे उपकार बरें ! परंतु दुर्दैव असें कीं, मिस मेयोला हें व्हावयास नको आहे. तिला, हिंदुस्थान स्वराज्याला नालायक आहे या मुद्यावर गोऱ्या लोकांची हिंदुस्थानावर अक्षय्य सत्ता रहावयास पाहिजे आहे.

ह्या चलाख बाईनें निरनिराळ्या व्यक्तींच्या तोंडीं जीं विचित्र विधानें घातली आहेत तीं वाचून आपण एखादी संक्षोभक कादंबरी—कीं जिच्यांत सत्यदृष्टी ठेवलीच पाहिजे असें नाहीं—वाचतों आहों कीं काय असें वाटतें. त्यांतली बरींचशीं विधानें सर्वथैव अविश्वसनीय अशीं असून, ज्यांच्या तोंडीं तीं घातलीं आहेत

णारे जर बरेच इंग्रज स्त्री पुरुष असतील तर मोठी शोचनीय गोष्ट म्हटली पाहिजे. ह्या वर्गांतल्या इंग्रज स्त्रीपुरुषांची नजर, जर मिस मेयोच्या या खराट्यानें उपसलेल्या कचऱ्याच्या ढीगावर कदाचित् पडली, तर मी कोणत्या विधानांसंबंधानें बोलत आहे हें ते ओळखतीलच. हिंदुस्थानच्या तोंडास काळें फांसण्याचा प्रयत्न करण्यांत तिनें ज्या लोकांना गोष्टी सिद्ध करण्याकरितां—त्या खोडल्या जाणें किंवा कमकुवत पाडणें शक्य नाहीं अशी तिची बढाई आहे—हातीं धरलें आहे त्यांच्याहि तोंडास नकळत कालिमा लावलेला आहे. तिच्या ह्या बऱ्याचशा गोष्टी, एक एक निरनिराळी घेऊनसुद्धां, कशा खोट्या पडताहेत ह्याबद्दल मी ह्या लेखांत बराच कामचलाऊ पुरावा दिला आहे असें मला वाटतें. मग त्या सगळ्या जर एकत्र केल्या तर अजीबातच खोटें चित्र कसें उभें होतें हें सांगावयास नकोच !

पण ह्या लेख मी कोणासाठीं लिहीत बसलों आहें बरें ? हिंदी वाचकांसाठीं नव्हे, तर जे अमेरिकन आणि इंग्रज वाचक हें साप्ताहिक नियमानें लक्षपूर्वक आणि सहानुभूतिपूर्वक वाचतात, त्यांच्यासाठीं. त्यांना माझी अशी सूचना आहे कीं, ह्या पुस्तकावर त्यांनीं मुळीच विश्वास ठेवू नये. मिस् मेयोनें मी जो संदेश दिल्याचें सांगतलें आहे तसा संदेश मी पाठविल्याचें मला स्मरत नाहीं. कोणी ढोंचण केलेंच असेल तर तें एकानें, आणि त्या गृहस्थासहि या माझ्या तोंडी घातलेल्या संदेशाची आठवण होत नाहीं. परंतु कोणीहि अमेरिकन् भेटावयास आला म्हणजे मी जो त्याला संदेश देतों तो मात्र मला ठाऊक आहे. तो संदेश हा कीं " वर्तमानपत्रांवर आणि अमेरिकेंत मिळणाऱ्या सुलभाकर्षक लिखाणावर विश्वास ठेवूं नका. तुम्हांला जर हिंदुस्थानची कांहीं माहिती हवी असेल तर तुम्ही हिंदुस्थानांत ज्ञानार्थी म्हणून या, आणि स्वतः हिंदुस्थानची माहिती काढा. हिंदुस्थानांत तुम्हांला येणें शक्य नसेल, तर हिंदुस्थानाबद्दल जें जें काय अनुकूल प्रतिकूल कोणी लिहिलें असेल तें वाचा आणि मग तुम्ही आपला काय तो निष्कर्ष काढा. तुमच्या हातीं जें सर्वसाधारण वाङ्मय येतें त्यांत हिंदुस्थानची फाजील निंदा किंवा फाजील स्तुति केलेली असते. " मिस मेयोचें अनुकरण करूं नका, अशी मी अमेरिकन आणि इंग्रज लोकांना सूचना देत आहें. मिस् मेयो ही, ती म्हणते त्याप्रमाणें, शुद्ध अंतःकरणानें न येतां पूर्वग्रह आणि अगोदरच ठरविलेल्या कल्पना घेऊन आली, हें तिच्या प्रत्येक पृष्ठावरच नव्हे तर ज्या प्रास्ताविक प्रकरणांत तो हें आपलें शुद्धांतःकरणाचें शिफारसपत्र वाचीत आहे त्यांतहि दिसून येत आहे. हिंदुस्थानांत ती प्रत्यक्ष स्वतःच्या डोळ्यांनीं सर्व गोष्टी पहाण्या म्हणून

त्यांजबद्दल फारसा अनुकूल ग्रह करून देतील अशीं नाहींत. उदाहरणार्थ, एका संस्थानिकाच्या तोंडीं घातलेलें हें विधान पहाः—

" आमचे तह इंग्लंडच्या राजाबरोबर झालेले आहेत," एक संस्थानिक शांतपणें परंतु भेदकपणें मला म्हणाले. "हिंदी राजेरजवाड्यांनीं बंगाली बाबू असलेल्या सरकारशीं कांहीं तह केलेला नाहीं! आम्ही या हुद्देदारी मिरविणाऱ्या फाटक्या लोकांशीं कधींच व्यवहार करणार नाहीं. ब्रिटिश लोक जोंपर्यंत आहेत तोंपर्यंत ते बादशहाच्या वतीनें ब्रिटिश शिष्ट पाठवितीलच आणि सर्व व्यवहार बरोबरच्या मित्रांमित्रांमध्यें व्हावा तसा चालेल. ब्रिटिश गेले तर मग आम्ही राजे आहोंच; हिंदुस्थानाला सरळ कसें करावें हें आम्हांला चांगलें ठाऊक आहे!" (पृ. ३१६).

हिंदी राजे कितीहि अधोगतीला पोंचलेले असोत, पण कोणी राजा अशा प्रकारचें विधान करण्याइतक्या अधोगतीला पोंचलेला असेल, असें मी तरी निरपवाद पुरावा पुढें आल्याशिवाय कधींहि म्हणणार नाहीं. ह्या राजाचें नांव मिस मेयो देत नाहीं हें सांगावयास नकोच.

याहूनहि निंद्य असें एक विधान ३१४ पृष्ठावर आहे, तें येणेंप्रमाणेंः—

दिवाण म्हणाले, " राजेसाहेबांना वाटत नाहीं कीं ब्रिटिश लोक निघून जातील. पण इंग्लंडच्या नव्या सरकारच्या अंमलांत त्यांना कदाचित् असा सल्ला मिळेलहि! म्हणूनच राजेसाहेब आपल्या सैन्याची जुळवाजुळव करीत आहेत, दारूगोळा जमवीत आहेत, आणि रुप्याचें नाणें पाडताहेत. इंग्लिश लोक जर खरोखरच निघून गेले, तर मग तीन महिन्यांनीं सगळ्या बंगालमध्यें एक तरी रुपया किंवा कुमारिका शिल्लक राहते कीं काय पहा!!"

हे संस्थानिक आणि त्यांचे हे सुसंस्कृत दिवाण कोण हें वाचकांपासून गुप्त ठेवण्यांत आलें आहे.

मिस मेयोनें हिंदुस्थानांत राहणाऱ्या इंग्रज स्त्रीपुरुषांच्या तोंडीं देखील पुष्कळ विधानें घातलेलीं आहेत. त्यांसंबंधानें मला इतकेंच म्हणावयाचें कीं, हीं विधानें जर त्या माणसांनीं खरोखरीच केलेलीं असतील तर तीं माणसें त्यांजवर ठेवलेल्या विश्वासास मुळींच पात्र नाहींत, आणि त्यांनीं आपल्या हातांत दिलेल्या रोग्यांचा, मुलांचा, तसेंच स्वतःच्या समाजाचाहि, हा मोठा अन्याय केलेला आहे. अशा तऱ्हेनें आपल्या हिंदी मित्रांना एक, आणि पाश्चात्य मित्रांना गुप्त दुसरें सांग-

यारे जर बरेच इंग्रज स्त्री पुरुष असतील तर मोठी शोचनीय गोष्ट म्हटली पाहिजे. ह्या वर्गांतल्या इंग्रज स्त्रीपुरुषांची नजर, जर मिस मेयोच्या या खराट्यानें उपसलेल्या कचऱ्याच्या ढीगावर कदाचित् पडली, तर मी कोणत्या विधानांसंबंधानें बोलत आहे हें ते ओळखतीलच. हिंदुस्थानच्या तोंडास काळें फांसण्याचा प्रयत्न करण्यांत तिनें ज्या लोकांना गोष्टी सिद्ध करण्याकरितां—त्या खोडल्या जाणें किंवा कमकुवत पाडणें शक्य नाहीं अशी तिची बढाई आहे—हातीं धरलें आहे त्यांच्याहि तोंडास नकळत कालिमा लावलेला आहे. तिच्या ह्या बऱ्याचशा गोष्टी, एक एक निरनिराळी घेऊनसुद्धां, कशा खोट्या पडताहेत ह्याबद्दल मी ह्या लेखांत बराच कामचलाऊ पुरावा दिला आहे असें मला वाटतें. मग त्या सगळ्या जर एकत्र केल्या तर अजीबातच खोटें चित्र कसें उभें होतें हें सांगावयास नकोच!

पण हा लेख मी कोणासाठीं लिहीत बसलों आहें बरें? हिंदी वाचकांसाठीं नव्हे, तर जे अमेरिकन आणि इंग्रज वाचक हें साप्ताहिक नियमानें लक्षपूर्वक आणि सहानुभूतिपूर्वक वाचतात, त्यांच्यासाठीं. त्यांना माझी अशी सूचना आहे कीं, ह्या पुस्तकावर त्यांनीं मुळींच विश्वास ठेवू नये. मिस् मेयोनें मी जो संदेश दिल्याचें सांगतलें आहे तसा संदेश मी पाठविल्याचें मला स्मरत नाहीं. कोणी टांचण केलेंच असेल तर तें एकानें, आणि त्या गृहस्थासहि या माझ्या तोंडीं घातलेल्या संदेशाची आठवण होत नाहीं. परंतु कोणीहि अमेरिकन् भेटावयास आला म्हणजे मी जो त्याला संदेश देतों तो मात्र मला ठाऊक आहे. तो संदेश हा कीं "वर्तमानपत्रांवर आणि अमेरिकेंत मिळणाऱ्या सुलभाकर्षक लिखाणावर विश्वास ठेवूं नका. तुम्हांला जर हिंदुस्थानची कांहीं माहिती हवी असेल तर तुम्ही हिंदुस्थानांत ज्ञानार्थी म्हणून या, आणि स्वतः हिंदुस्थानची माहिती काढा. हिंदुस्थानांत तुम्हांला येणें शक्य नसेल, तर हिंदुस्थानाबद्दल जें जें काय अनुकूल प्रतिकूल कोणी लिहिलें असेल तें वाचा आणि मग तुम्ही आपला काय तो निष्कर्ष काढा. तुमच्या हातीं जें सर्वसाधारण वाङ्मय येतें त्यांत हिंदुस्थानची फाजील निंदा किंवा फाजील स्तुति केलेली असते." मिस मेयोचें अनुकरण करूं नका, अशी मी अमेरिकन आणि इंग्रज लोकांना सूचना देत आहें. मिस् मेयो ही, ती म्हणते त्याप्रमाणें, शुद्ध अंतःकरणानें न येतां पूर्वग्रह आणि अगोदरच ठरविलेल्या कल्पना घेऊन आली, हें तिच्या प्रत्येक पृष्ठावरच नव्हे तर ज्या प्रास्ताविक प्रकरणांत ती हें आपलें शुद्धांतःकरणाचें शिफारसपत्र वाचीत आहे त्यांतहि दिसून येत आहे. हिंदुस्थानांत ती प्रत्यक्ष स्वतःच्या डोळ्यांनीं सर्व गोष्टी पहाण्या म्हणून

आली होती असें नसून, जी तीन-चतुर्थांश सामग्री तिला अमेरिकेंत राहूनहि मिळाली असती ती येथें येऊन गोळा करण्याकरितां ती आली होती !

मिस् मेयोच्या असल्या या पुस्तकाचा फार मोठा प्रसार होत आहे, यांत पाश्चात्य वाङ्मय आणि संस्कृति यांची मात्र किंमत होत आहे, दुसरें कांहीं नाहीं !

मी हा लेख दुसऱ्याहि एका, दूरच्या कां होईना, आशेनें लिहीत आहें. ती आशा ही कीं, मिस् मेयोनें—नक्कीत असेल तर ठीकच आहे—हा जो एका पुरातन राष्ट्राचा भयंकर अन्याय केलेला आहे, आणि त्याचबरोबर, निःसंशय आपल्या ठायीं असलेलें जें कौशल्य त्याचा दुरुपयोग करून हिंदुस्थानाबद्दल अमेरिकनांच्या मनांत विनाकारण किल्मिष आणून जो तिनें अमेरिकनांचाहि भयंकर अन्याय केलेला आहे, त्या अन्यायाबद्दल तिला वाईट वाटून तिला कृतकर्मांचा पश्चात्ताप कधीं ना कधीं व्हावा.

या सर्व गोष्टींत विपरीत घटना ती ही कीं, तिनें हें पुस्तक "हिंदुस्थानच्या नाना जातींस नाना पंथांस" अर्पण केलें आहे !! तिनें तें सुधारणा करण्याच्या हेतूनें किंवा प्रेमबुद्धीनें प्रेरित होऊन लिहिलेलें नाहीं हें तर खचित. पण कदाचित् हा माझा अंदाज चुकतहि असेल! तसें असल्यास मग मिस् मेयोनें परत एकदां हिंदुस्थानांत यावें, उलट तपासणी करून घेण्यास सिद्ध व्हावें आणि त्या दिव्यांतून जर तिचीं विधानें सदेह बाहेर पडलीं, तर तिनें मग आमच्यांत राहून आमची सुधारणा करावी. असो. मिस् मेयो आणि तिचे वाचक यांच्या संबंधानें इतकें पुरे.

आतां मी चित्राच्या दुसऱ्या बाजूकडे वळतों. माझ्या मतें हें पुस्तक अमेरिकन् आणि इंग्रज लोकांच्या हातीं देण्याच्या लायकीचें नाहीं ( कारण त्यांत त्यांचा कांहींच फायदा नाहीं ). परंतु प्रत्येक हिंदी इसमानें तें वाचावें, त्यांत त्याला थोडा तरी फायदा झाल्याशिवाय राहणार नाहीं. तिनें ज्या स्वरूपाचा आरोप बनविलेला आहे, त्याचें आपण निराकरण करावें. पण तिच्या बऱ्याच दोषारोपांच्या बुडाशीं जें सर्वसाधारण तत्त्व आहे त्याचें आपण निराकरण करणें इष्ट नाहीं. दुसरे आपल्याकडे ज्या दृष्टीनें पाहतात, त्या दृष्टीनें आपण आपल्याकडे पाहिल्यानें फायदा होतो. पुस्तक कोणत्या बुद्धीनें प्रेरित होऊन लिहिलें आहे तेंदेखील पाहण्याचें आपणास कांहीं कारण नाहीं. विचारवंत सुधारणेच्छु इसम त्याचा थोडा तरी उपयोग करून घेईल.

ह्यांत कांहीं विधानें अशीं आहेत कीं, त्यांची नीट चवकशी झाली पाहिजे. उदाहरणार्थ, ती म्हणते कीं, वैष्णव चिन्हांत अश्लील अर्थ आहे. मी जन्मतः वैष्णव आहें. वैष्णव देवळांत मी जात असें त्याची मला चांगली आठवण आहे. आमचें कुटुंब जुन्या मताचें होतें. लहान असतांना मी स्वतः तें चिन्ह धारण करीं, पण मला किंवा आमच्या घरांत दुसऱ्या कोणाला हें निरुपद्रवी आणि कांहींसें सुरेखहि दिसणारें चिन्ह अश्लीलार्थसूचक आहे अशी कधीं कल्पनाहि आली नाहीं. मी मद्रास येथें ( तेथेंच हा लेख मी लिहीत आहें ) कांहीं वैष्णव मंडळीजवळ त्यावद्दल पृच्छा केली. त्यांनाहि असा कांहीं अश्लील अर्थ असल्याची माहिती नव्हती. म्हणजे असें सांगण्याचा माझा भाव नाहीं कीं, त्याला मुळींच कधीं असा अर्थ नव्हता! मला सांगावयाचें तें हें कीं, लक्षावधि लोकांना त्याच्या बुडाशीं आहे म्हटलेल्या ह्या अर्थाची कल्पनाहि नाहीं! असे आम्ही आजवर अनेक आचार सहज म्हणून पाळीत आहों कीं ज्यांत अश्लीलपणा आहे हें आमच्या पाश्चात्य पाहुण्यांनींच आम्हांला सांगावें लागलें आहे. शिवलिंगांत कांहीं तरी अश्लील अर्थ आहे हें मी प्रथम एका मिशनरी पुस्तकांत वाचलें. परंतु, आजहि जरी मी शिवलिंगाकडे पाहिलें, तरी त्याची आकृति, किंवा त्या आकृतीकडे ज्या संबंधी गोष्टी लक्षांत आणून मी पाहतों त्या गोष्टी, माझ्या मनांत अश्लील अर्थ आणून सोडीत नाहींत. तसेंच पुनः दुसऱ्या एका मिशनरी इसमाच्याच पुस्तकावरून मला कळलें कीं, ओरिसा प्रांतांतल्या देवळांत बीभत्सतासूचक पुतळे आहेत. मी जेव्हां पुरी येथें गेलों तेव्हां ते पाहिले; परंतु त्यांतला बीभत्स प्रकार लक्षांत यावयास मला प्रयासच पडला! परंतु हजारों लोक जे त्या देवळांत जातात, त्या बिचाऱ्यांना त्या ठिकाणीं कांहीं बीभत्सता आहे अशी कधीं कल्पनाहि येत नाहीं. लोकांच्या मनाची तयारी नसते हें एक, आणि ते पुतळेहि तुमच्या नजरेंत येऊन भरण्यासारखे नाहींत हें दुसरें.

परंतु चित्राची काळोखी बाजू खरोखर जिथें असेल तिथें ती आहे म्हणून कोणी सांगितलें तर आपण रागावतां नये. आरोग्यविघातक राहणी, बाल-विवाह, इत्यादींचीं तिचीं वर्णनें अतिशयोक्तिपूर्ण आहेत यांत मुळींच संशय नाहीं. परंतु त्यांचा आपण प्रोत्साहक म्हणून उपयोग करून घेऊन, समाज कसल्याच दोषाला पात्र राहूं नये याकरितां आपण आजवर केले त्याहून अधिक प्रयत्न केले पाहिजेत. कोणी परकी मनुष्य आमचा देश पहावयास आला, आणि त्याला आमच्याबद्दल प्रामाणिकपणें दोन चांगले शब्द सांगतां आले तर ठीकच आहे, आम्ही त्याचे फार

आभारी होऊं; पण आम्ही जर राग धावरून धरला, तर आम्हांला चांगलें म्हणणाऱ्यापासून जितकें शिकतां येईल त्याहून दोष देणाऱ्यापासून अधिक शिकतां येईल, असा माझा प्रत्यक्ष अनुभव आहे. या नालस्तीखोर पुस्तकाबद्दल आपण संताप व्यक्त करणें हें आपलें कामच आहे, पण त्या संतापामुळें, आम्ही आमच्या मधली वैगुण्यें पहावयाचें टाळतां नये. आमच्या संतापानें मिस मेयोचें काडीमात्र नुकसान होणार नाहीं, उलट तो आमच्या स्वतःवरच येऊन मात्र आदळावयाचा! पाश्चात्य देशांतल्याप्रमाणें आमच्या इकडेहि अविचारी वाचक कांहीं कमी नाहींत, आणि मिस मेयोनें लिहिलेली प्रत्येक गोष्ट खोटी ठरविण्याचा आपण प्रयत्न केल्यास, वाचकवर्गास वाटूं लागेल कीं, आम्ही अगदीं पूर्णावस्थेस पोंचलेले मनुष्य असून आमच्यांत कोणालाहि कांहीं दोष आढळणार नाहीं, कोणाचीहि एक शब्द बोलण्याची छाती नाहीं. सदरहू पुस्तकाविरुद्ध काढण्यांत आलेली मोहीम मर्यादेच्या बाहेर जाण्याची भीति आहे. खवळून जाण्याचें कांहींच कारण नाहीं. इतकें लिहून मी हा अगदीं निरुपायानें आणि पुष्कळ काम पडलेलें असतांहि लिहावयास घेतलेला परीक्षण-लेख, भगवद्भक्त तुळशीदास यांच्या एका दोहऱ्याचें रूपांतर देऊन संपवितों:—

" प्रभूच्या अखिल सजीव निर्जीव सृष्टीला चांगली वाईट अशा दोन्ही बाजू आहेत. हंस जसा दूध तेवढें घेऊन पाणी टाकून देतो, तद्वत् शहाण्या मनुष्यानें चांगलें तेवढेंच घेऊन वाईट दूर लोटून दिलें पाहिजे."

---

## परिशिष्ट २ रें.

## डॉ. रवींद्रनाथ टागोर यांचें पत्र.



'मदर इंडिया' संबंधानें डॉ. रवींद्रनाथ टागोर यांचें पुढील पत्र 'मँन्चेस्टर गार्डियन्' मध्यें प्रसिद्ध झालें होतें:—

*हिंदुस्थानचा एक प्रतिनिधि या नात्यानें, मला एका अत्यंत अन्याय्य आघातापासून बचाव करण्याकरितां हें पत्र लिहावें लागत आहे, त्यास आपण न्यायबुद्धीस स्मरून स्थळ देण्याची कृपा करावी.*

ह्या वली वेटांत प्रवास करीत असतां, माझ्या हातीं नुकताच जुलई १६ चा न्यू स्टेट्स्मन् पडला. त्यांत एका अमेरिकन् प्रवासी बाईनें हिंदुस्थानासंबंधानें लिहिलेल्या पुस्तकाचें परीक्षण आलें आहे. परीक्षणकारानें आमच्या लोकांवर लेखिकेनें केलेल्या निंदेच्या वर्षावाला अगदीं मोठ्या आवडीनें पुष्टि दिलेली आहे, आणि हिंदु लोकांमध्यें अगदीं मोठ्यांतल्या मोठ्या माणसांतहि सत्यनिष्ठेचा अभाव सार्वत्रिक आहे या विधानाकडे पुनः पुनः लक्ष वळवीत असतां, दुसरीकडे स्वतः त्यानें मात्र एक अत्यंत दुष्टपणानें बनावट रचलेली गोष्ट जाहीर केली आहे. ही गोष्ट सदरहू पुस्तकांत किंवा दुसऱ्या कोणत्या तरी पुस्तकांत रचून संग्रहीत केलेल्या शिव्यागाळींचा नमुना म्हणून मांडलेली नसून, लेखक स्वतः आपणहून ती न विचारतां सांगत आहे, आणि तिला प्रत्यक्ष आपलाच पुरावा असें हळूच आडून सुचवीत आहे.

ती गोष्ट मांडली आहे ती अशीः "कविवर्य सर रवींद्रनाथ टागोर यांनीं अशी आपली दृढ समजूत म्हणून छापून प्रसिद्ध केली आहे कीं, स्त्रियांची कामेच्छा भलत्या मार्गानें भरकटूं नये म्हणून, त्यांचें लग्न त्यांना यौवनदशा येण्यापूर्वी पूर्णपणें उरकून टाकलें पाहिजे."

पाश्चिमात्य देशांत शत्रु-राष्ट्रांबद्दल कसकशा खोट्यानाट्या कंड्या पिकविल्या जातात हें पाहून वाईट वाटत असलें तरी त्याची आतां आम्हांला संवय होऊन गेली आहे; परंतु व्यक्तींच्या देशबांधवांच्या राजकीय आकांक्षांनीं चिडून जाऊन त्या व्यक्तींविरुद्धहि तशाच प्रकारची मोहीम त्यांनीं चालविलेली पाहून मी तर आश्चर्यचकित होऊन गेलों आहें! समजा कीं, युनायटेड् स्टेट्सचे लोक इंग्लंड देशाला राजकीय दृष्ट्या अप्रिय झाले; तर मग, वरच्या सारखा एखादा इंग्रज लेखक अमेरिकन पत्रांतल्या बातम्या घेऊन अमेरिकन लोकांमध्यें गुन्ह्यांकडे प्रवृत्ति फार आहे असें सिद्ध करण्यांत अगदीं ब्रह्मानंद मानील, आणि सिनेमांत गुन्ह्याच्या गोष्टी पाहून अमेरिकन लोकांना अगदीं हर्षवायु होतो असा आपल्या त्या विधानाला पुरावा म्हणून देईल, हें एक वेळ साहजिक असें म्हणावयास हरकत नाहीं.

परंतु तो लेखक आपल्या त्या वक्तृत्वाच्या उन्मादवायूनें भरकटत जाऊन, उदाहरणार्थ, परलोकवासी प्रेसिडेंट विल्सन् यांच्या विरुद्ध असें खोटें विधान करावयास धजेल काय कीं, प्रेसिडेंट विल्सन हे आपली सात्विक दृढ समजूत म्हणून असें

ओरडूं शकत नाहीं. परंतु वाचा न फुटलेले असे आमचे मनोविकार मनाच्या खोल तळघरांत दाटी करून राहिले कीं अत्यंत ज्वलनशील होतात, हें कोणास माहीत नाहीं ?

असले हे दाहक पदार्थ पौर्वात्यांच्या कोठारांत भरावयास पाश्चात्य टीकाकार प्रत्यहीं साहाय्य करीत आहेत. हे टीकाकार आपले पूर्वग्रह बेलाशक व्यक्त करून कृतकृत्य झाल्याचें सुख अनुभवीत आहेत. त्यांची सदसद्विवेकबुद्धि नाजूक झाली आहे. आणि ते हेंहि विसरून गेले आहेत कीं, पाश्चात्य राष्ट्रांतहि नीतिभ्रष्टता आहे–फक्त निराळ्या वेषात, एवढेंच काय तें ! मग तो वेष थोरांच्या वाड्यांतला असो नाहीं तर गरिबांच्या झोपड्यांतला असो !

तथापि मी माझ्या इंग्रज व इतर पाश्चात्य वाचकांना अगदीं खात्री देऊन सांगतों कीं, इंद्रियसौख्याच्या भलभलत्या प्रकारांचें शिक्षण देण्याची जी काय पद्धत म्हणून असल्याचें हा लेखक सांगत आहे, तसलें कांहीं देखील माझ्या ऐकिवांत नाहीं; तसेंच माझ्याबरोबर येथें असलेल्या माझ्या मित्रांच्याहि तें ऐकिवांत नाहीं—त्यांचा तर ही गोष्ट वाचून संताप झाला आहे !

या पाश्चात्य वाचकांनीं, आपल्या युरोपियन् आणि अमेरिकन समाजांत, तशांत मनुष्यत्वाच्या खालच्या पायरीच्या संस्कृतीची निदर्शक नव्हे म्हणून मानल्या जाणाऱ्या परिस्थितींत देखील, लोकांना ज्यांचा कधीं संशयहि नाहीं असले पद्धतशीर इंद्रियविषयक विपरीत निशाचरी प्रकार कसे मधून मधून अकस्मात् लोकांच्या थोडेबहुत नजरेस पडतात हें लक्षांत घेतल्यास, मला हिंदुस्थानासंबंधाच्या उल्लेखिलेल्या कांहीं गोष्टी साफ नाकबूल करणें कसें कठीण आहे, हें त्यांना सहज समजेलसें मला वाटतें.

"न्यू स्टेट्स्मन्" मधल्या या लेखकानें जगाच्या कल्याणासाठीं म्हणून अशी सूचना केली आहे कीं, या प्रवासी बाईनें दुराचारी म्हणून दोषी टरविलेल्या या हिंदुस्थानच्या लोकांना जिवंत रहावयास आणि वंश पुढें चालवावयास दयाळु ब्रिटिश शिपायांनीं मुळींच मदत करूं नये. अर्थात् त्यानें एक गोष्ट स्वीकार केली आहे ती ही कीं, या लोकांनीं आपलें जीवित आणि संस्कृती ब्रिटिश शिपायांच्या मदतीशिवाय या लेखकाच्या जातिबांधवांहून अधिक शतकें, रक्षण करीत आणलेली आहे.

तें कसेंहि असो, या असल्या ज्ञानझऱ्यांतून मला शहाणपण नको आहे! आणि तीच सूचना मी त्या जातीचे जे निरनिराळ्या मानववंशांत परस्परद्वेष पसरविणारे लेखक आहेत त्यांजबद्दलहि करीत आहें. कारण, कितीहि संतापजनक गोष्टी होवोत, मनुष्यस्वभावामध्यें सुधारत जाण्याची अनंत शक्ति भरलेली आहे यावर आपण अखंड विश्वास ठेवून रहावें, आणि मनुष्य प्राण्यामध्यें जो पाशवी गुण राहत आला आहे, त्यापासून मुक्त होण्याची आशा, त्यांतल्या हानिकारक घटकांना शारीरिक नाशाच्या द्वारें उडवून देण्यांत नसून, मनाला वळण लावण्यांत आणि खऱ्या संस्कृतीची शिस्त लावून घेण्यांत आहे, हें समजून वागावें.

---